


श्रीमंत राजराजेश्वर

# सयाजीराव महाराज गायकवाड,

जी. सी. एस्. आय्., सेनाखासखेल समशेरबहादर,

बडोदें राज्याचे अधिपति,

यांचे,

परम थोर औदार्य, असामान्य गुणग्राहकत्व, आणि विशेषेंकरून
आपल्या प्रजेच्या कल्याणाविषयीं व शिक्षणाविषयीं
अश्रांत परिश्रम, व देशभाषेच्या उन्नतीकरितां
पराकाष्ठेची कळकळ, इत्यादि अनेक
सद्गुण मनांत आणून
हा ग्रंथ,

त्यांचे सेवेशीं परमादरपूर्वक
अर्पण केला असे.

मुक्काम पुणें, ता० १८ माहे नवंबर, सन १८९३ इसवी.

महाराजांचा नम्र सेवक,
ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.



प्रस्तुत ग्रंथ आमचे भाषेमध्यें तयार होण्याचें बहुतेक श्रेय आमचे पुण्यांतील विद्वान् दक्षिणा प्राईझ कमिटीस दिलें पाहिजे. सदर ग्रंथ दुसरे कोणीं यापुढें लिहिला नसता असें माझें ह्मणणें नाहीं, परंतु मजसारख्या मनुष्यानें तो लिहिण्यास प्रवृत्त व्हावें या गोष्टीला तरी निदान दक्षिणा प्राईझ कमिटी मुख्यतः कारणीभूत झाली हें मला प्रांजलपणें कबूल केलें पाहिजे. कमिटीनें सन १८९० सालीं ह्या ग्रंथाच्या संबंधानें प्रसिद्ध केलेल्या जाहिरातीवरून तो लिहावा असें माझे मनांत आलें, व कमिटीनें दिलेल्या मुदतींत ग्रंथ लिहिण्यास जेवढी सामग्री मिळवितां आली तेवढी मिळवून व तिचा करतां आला तितका उपयोग करून सदरचा ग्रंथ कमिटीचे अवलोकनार्थ मीं पाठविला.

प्रस्तुत विषयावर कमिटीकडे जे ग्रंथ आले होते त्यांत हा ग्रंथ पसंत ठरून त्यास कमिटीच्या ठरावाप्रमाणें २०० रुपयांचें पहिलें बक्षीस मिळालें. शिवाय ग्रंथपरीक्षण करीत असतां कमिटीनें कांहीं सूचना केल्या व असें ठरविलें कीं, सदरहू सूचना ग्रंथ प्रसिद्ध करण्याचे वेळीं अमलांत आणल्यास ग्रंथकारास आणखी १०० रुपयांचें बक्षीस द्यावें. त्या सूचना ह्मणजे विशेषतः ग्रंथांतील ऐतिहासिक स्थळांचा नकाशा—अर्थात् हिंदुस्थानाचा नकाशा—ग्रंथास जोडणें, प्रत्येक भागाचे आरंभीं त्या भागांतील मुख्य गोष्टींची अनुक्रमणिका घालणें, व शेवटीं सूची देणें, ह्या होत. ह्या व इतर सर्व बारीकसारीक सूचना हल्लीं ग्रंथ प्रसिद्ध करते वेळीं अमलांत आणल्या आहेत. खेरीज छत्रपति शाहू महाराज यांची रंगीत तसबीरही ग्रंथाचे आरंभीं जोडली आहे. सदर तसबिरीची अस्सल प्रत माझे परम मित्र रा. रा. केशव रावजी गोडबोले यांनीं महत्प्रयासानें मिळवून देण्याची तसदी घेतली याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहें.

आमचे मराठी भाषेंत ऐतिहासिक ग्रंथांची फार उणीव आहे. ही उणीव दूर करण्याकडे विद्वान् लोकांचें व कांहीं संस्थानिकांचेंही लक्ष लागत चाललें आहे ही मोठी अभिनंदनीय गोष्ट आहे. आमचे देशाचे इतिहासाकडे पाहिलें तर त्याची पूर्वीपासून इतकी हेळसांड झालेली आहे कीं, व्यवस्थित असा कोणताच ऐतिहासिक लेख आपणास बहुतकरून उपलब्ध नाहीं. वास्तविक पाहिलें तर ज्या देशांत फार प्राचीन काळीं **व्यास-वाल्मिकींसारखे** जगद्विख्यात विद्वान् ऋषि होऊन गेले, जो देश एकदां केवळ विद्येचें आदिपीठ ह्मणून गाजत होता, ज्या देशांत शेंकडों नामांकित राजघराणीं होऊन गेलीं, व अर्वाचीन काळीं ज्या देशामध्यें **शिवाजी महाराज,** पहिले **बाजीराव** साहेब व **रावसाहेब पेशवे** यांसारखे पराक्रमी शूर मराठे वीर नुकतेच थोड्या वर्षांपूर्वी होऊन गेले—ज्यांच्या अमलांत मराठ्यांनीं आपले झेंडे **अटकेच्याही** पलीकडे फडकविले—त्या देशांत एकादा हुशार व निःपक्षपाती अखबरनवीस निपजून त्याजकडून त्या देशाचा संगतवार इतिहास लिहिला न जावा ही मोठी खेदाची गोष्ट आहे! मराठ्यांच्या इतिहासाच्या संबंधानें माहिती कांहीं थोड्या लोकांनीं बखरींच्या रूपानें लिहून ठेविली होती, परंतु तीही कोठें सांदीकोंदींत पडलेली होती. पण अलीकडे तिचा जीर्णोद्धार करण्याचें काम 'काव्येतिहास-संग्रह'-कारांनीं अंगावर घेऊन तें शेवटास नेलें हे त्यांचे महाराष्ट्र देशावर फार मोठे उपकार समजले पाहिजेत. तसें झालें नसतें तर आजपर्यंत त्यांपैकीं किती बखरी कीटकांचे भक्ष्यस्थानीं पडल्या असत्या व वाण्यांचे दुकानीं रद्दीऐवजीं गेल्या असत्या तें सांगवत नाहीं!

प्रस्तुत ग्रंथ तयार करतांना ज्या ग्रंथांचा व बखरींचा उपयोग केला त्यांची यादी दुसरीकडे दिली आहे. सदर ग्रंथांपासून मला जो उपयोग झाला त्याबद्दल मी त्या सर्व विद्वान् ग्रंथकारांचा अत्यंत आभारी आहें. **क**मिटीच्या जाहिरातीअन्वयें निराधार व भ्रांतिमूलक असा लेख या ग्रंथांत मीं कोठेंही लिहिलेला नाहीं.

# छत्रपति थोरले शाहू महाराज यांचें चरित्र.

## भाग १.

### उपक्रम.

भोंसले वंशाची पूर्वपीठिका.–मालोजी व त्याचा पुत्र शाहाजी यांची हकीकत.–शिवाजीचा जन्म व त्याची बाल्यावस्था.–दादाजी कोंडदेव याचा अंतकाळचा शिवाजीस उपदेश.–शिवाजीच्या कारकीर्दींचें दिग्दर्शन व त्याचा मृत्यु.–शिवाजीच्या मागून गादीविषयीं उपस्थित झालेले तंटे.–संभाजीस राज्याभिषेक होतो.–त्याचीं दुष्ट कृत्यें.–त्याच्या कारकीर्दींत मराठी राज्याची शोचनीय स्थिति.–कलुशा याच्या हातांत सर्व राज्यसूत्र जातें.–शिवाजी उर्फ शाहू याचा जन्म.–औरंगजेब बादशाहाची दक्षिणेवर स्वारी.–मोंगलांचा सरदार तकरीबखान हा संभाजीस संगमेश्वर एथें कैद करतो.–तुळापूर एथें सन १६८९ त औरंगजेब त्याचा शिरच्छेद करतो.

मुसलमान लोकांनीं सर्व हिंदुस्थानदेश पादाक्रांत करून टाकला असतां उदेपुरच्या राजघराण्याची एक शाखा डोंगरपूर एथें राज्य करीत होती. त्या शाखेपैकीं तेराव्या पुरुषाचा एक पुत्र, आपल्या बापाची गादी आपल्याला न मिळाल्यामुळें, विजापुरच्या बादशाहाच्या पदरीं नोकरी करावयास गेला. त्यानें मोठा पराक्रम करून बादशाहापासून ८४ गांवांची जहागीर व 'राजे' हें पद संपादन केलें. त्याचें नांव सजनसी. त्याचा नातू भोंसाजी. त्याला १० पुत्र होते. त्यांपैकीं ज्येष्ठपुत्राचें नांव मालोजी असें होतें. तो इ०स० १५५० त जन्मला. त्याला जगपाळराव नाईक निंबाळकर याची बहीण दिपाबाई दिली होती.

---

१ ही मूळपीठिका मालेसनकृत हिंदुस्थानांतील एतद्देशीय संस्थानांच्या इतिहासांत दिली आहे. काव्येतिहाससंग्रहांत या वंशाची जी हकीकत दिली

मालोजीला प्रथमतः सन १५७७ त निजामशाहींत एक लहा-नशी नोकरी मिळाली. ह्या वेळीं अहमदनगरचे गादीवर मूर्तिजा निजामशाहा ( इ० स० १५६५-१५८८ ) हा होता. मालोजीला बरेच दिवस मूल झालें नाहीं; तेव्हां त्यानें दानधर्म वगैरे पुष्कळ केला; तथापि पुत्रप्राप्ति झाली नाहीं. पुढें शाहासरिफजी म्हणून कोणी एक मोठा मुसलमान साधु होता त्याची तो सेवा करूं लागला. त्याच्या कृपाप्रसादानें त्याला दोन मुलगे झाले. आपणास हे पुत्र शाहासरिफजीच्या प्रसादानें झाले म्हणून त्यानें वडील मुलाचें नांव शाहाजी व धाकट्याचें नांव सरिफजी असें ठेविलें. शाहाजीचा जन्म इ० स० १५९४ त झाला. त्याला लखुजी जाधव शिंदखेडकर याची कन्या जिजाबाई ही दिली होती[1]. मालोजीनें निजा-

---

आहे ती एणेंप्रमाणें:—मूळपुरुष शिवराव चितोडकर हा उदेपूर एथें राहत असे. त्याला रामराव, उदेसिंग व भीमसिंग असे तीन पुत्र होते. त्यांपैकीं पहिले दोन अकबरबादशाहाशीं लढत असतां एका लढाईत ठार झाले. नंतर भीमसिंगानें चितोडचा राणा उदेसिंग याला भोंसच्या किल्ल्यांत नेऊन ठेविलें. त्यावरून त्या वंशाचें पुढें भोंसले असें उपनांव पडलें. भीमसिंगाला विजयभान व रायभान असे दोन पुत्र होते. विजयभानाचा पुत्र खेळकर्ण राजा, त्याचा पुत्र जयकर्ण, त्याचा महाकर्ण. त्याला राजा शिव म्हणून एक मुलगा होता. तो भीमानदीच्या डोहांत पडून बुडून मेला. त्याला बाबजी भोंसले म्हणून एक वेडसर मुलगा होता. त्याला दोन पुत्र होते—एक मालोजी व दुसरा विठोजी. ग्रांटडफ, भोंसले वंशाचा मूळपुरुष बाबजी भोंसले हा दौलताबादेजवळ वेरूळ म्हणून गांव आहे तेथें राहत असे व त्याला मालोजी व विठोजी असे दोन पुत्र होते, अशी हकीकत देतो. भोंसाजी हें नांव मालेसनशिवाय दुसरे कोणाचे ग्रंथांत आढळत नाहीं.

१ ह्या लग्नाची गोष्ट फार चमत्कारिक आहे. एकदां मालोजी शाहाजीस बरोबर घेऊन शिमग्याचे सणाकरतां लखुजी जाधव याचे घरीं आला होता. त्या वेळीं शाहाजीचें वय फक्त ५ वर्षांचें होतें; व लखुजीची मुलगी जिजाबाई इचें वय ३।४ वर्षांचें होतें. एके दिवशीं जेवणखाण आटपल्यावर सर्व मंडळी दिवाणखान्यांत बसली असतां तीं दोन मुलें तेथें जवळच खेळत होतीं. जाधवास त्या गोष्टीचें मोठें कौतुक वाटून त्यानें "जिजा, तुला हा नवरा आवडतो का ?"

मशाहींत मोठमोठीं पराक्रमाचीं कृत्यें केलीं; व त्यांबद्दल त्याला **पुणें** व **सुपें** या प्रांतांची जहागीर व **शिवनेरी** व **चाकण** हे दोन किल्ले व त्यांच्या आसपासचा मुलूख यांची सुभेदारी मिळाली होती. **मालोजी** इ० स० १६१९ त मरण पावला.

**मालोजी**च्यामागें **शाहाजी**ही **निजामशाहींत** नोकरीस राहिला. तें राज्य सुरळीत चालावें ह्मणून **शाहाजी**नें कायावाचामनेंकरून अश्रांत परिश्रम केले, परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. **निजामशाही**चा इ० स० १६३७ त शेवट झाला. पुढें **विजापुर**चा

---

असें सहज थट्टेनें विचारलें; व नंतर मंडळीकडे वळून "हा जोडा किती चांगला दिसतो!" असें तो बोलला. इतक्यांत तीं मुलें एकमेकांवर गुलाल उधळूं लागलीं. हें पाहून **मालोजी**ला मोठें आश्चर्य वाटलें व आनंदही झाला. नंतर उभें राहून त्यानें, "आजपासून **जाधव** आमचे व्याही झाले," असें सर्व मंडळीस सांगितलें. **जाधव** हा त्या वेळीं श्रीमंत असून एक बडा जहागीरदार होता, व **मालोजी** थोर घराण्यापैकीं खरा, परंतु गरीब होता. **मालोजी**च्या वरील भाषणाचें **जाधव**ाला फार आश्चर्य वाटलें, परंतु त्या वेळीं तो कांहीं बोलला नाहीं. दुसरे दिवशीं **जाधव**ानें **मालोजी**स जेवणास बोलाविलें; तेव्हां **मालोजी**नें त्याला असा परत निरोप पाठविला कीं, "तुह्मी आमचे व्याही होण्याचें कबूल करीत असाल तर जेवणास येतों." पुढें ही गोष्ट **जाधव**ाची स्त्री **म्हाळसाबाई** हिला कळली तेव्हां तिला फार राग आला, व "असल्या भिकाऱ्याच्या पोराला मी आपली मुलगी कधीं देणार नाहीं," असें तिनें निक्षून सांगितलें. **मालोजी**ला ही गोष्ट कळली तेव्हां त्याला पराकाष्ठेचें वाईट वाटलें. त्यानें त्याचवेळीं निश्चय केला कीं, "**शाहाजी**ला बायको करीन तर **जाधव**ाची कन्याच करीन, नाहीं तर त्याचें लग्नच करणार नाहीं!" पुढें त्यानें **निजामशाहींत** मोठमोठीं पराक्रमाचीं कृत्यें करून पुष्कळ संपत्ति मिळविली; शिवाय त्याला ५००० स्वारांची मनसबदारी मिळाली; तसेंच त्याला **पुणें** व **सुपें** या प्रांतांची जहागीर व **शिवनेरी** व **चाकण** हे प्रांत व त्यांच्या आसपासचा मुलूख यांची सुभेदारी मिळाली. नंतर **जाधव**ाचे मुलीस मागणी घालण्याचे योग्यतेचे आपण झालों असें **मालोजी**स वाटल्यावर त्यानें पुनः मागणी घातली. **जाधव**ानेंही ती गोष्ट मान्य केली. पुढें **शाहाजी** व **जिजाबाई** यांचें लग्न इ० स० १६०४ त मोठ्या थाटानें झालें.–**ग्रांटडफ**.

१ **ग्रांटडफ** व **काव्येतिहाससंग्रह**.

दिवाण मुरारपंत याचे मार्फत त्यानें अदिलशाहींत नोकरी पतकरली. त्यानें स्वपराक्रमानें कर्नाटकांत मंगळूर, कोल्हार, होसकोटा, बाळापूर, व सेरा या प्रांतांची आणखी जहागीर संपादन केली[1]. त्यानें इ० स० १६३९ त मोहिल्याची कन्या तुकाबाई ही दुसरी बायको केली. जिजाबाईच्या पोटीं शाहाजीला दोन पुत्र झाले. वडील पुत्राचें नांव संभोजी[2] व धाकट्याचें नांव शिवाजी[3] असें होतें. तुकाबाईचे पोटीं त्याला आणखी एक पुत्र झाला त्याचें नांव व्यंकोजी[4] असें होतें. वर सांगितलेला शिवाजी हाच मराठ्यांच्या राज्याचा स्थापनकर्ता होय.

पूर्वीं बहुतेक मराठे सरदार अक्षरशत्रु असल्यामुळें त्यांचा कारभार विशेषतः ब्राह्मण लोक पाहत असत. शाहाजीनें आपल्या पुण्याकडील जहागिरीचें काम दादोजी[5] कोंडदेव यास सांगितलें; व आ-

---

१ ग्रांटडफ. २ शाहाजीची संभाजीवर फार प्रीति होती; व त्याला तो नेहमीं आपणाबरोबर ठेवीत असे. शिवाजीच्या बंडखोर वर्तणुकींत शाहाजीचें अंग असावें असा विजापुरच्या बादशाहास संशय आल्यावरून त्यानें शाहाजीस कोंडून ठेविलें होतें. पुढें तेथून सुटल्यावर, कर्नाटकांत बंडें झालीं होतीं म्हणून तो संभाजीस बरोबर घेऊन तिकडे गेला. त्या ठिकाणीं कनकगिरी किल्ल्याच्या वेढ्यांत संभाजी पडला. (इ० स० १६५३ )—काव्येतिहाससंग्रह. ३ मोंगलांनीं एकदां शाहाजीचा पाठलाग केला त्या वेळीं त्यानें, जिजाबाई गरोदर होती म्हणून तिला शिवनेरी किल्ल्यांत ठेविलें, व आपण विजापुरास निघून गेला. जिजाबाईनें किल्ल्यांतील शिवाबाई देवीस नवस केला कीं, "मला जर पुत्र झाला तर त्याला तुझें नांव ठेवीन". पुढें सन १६२७ च्या मे महिन्यांत तिला तेथें मुलगा झाला; तेव्हां पूर्वीं नवस केल्याप्रमाणें त्या मुलाचें नांव तिनें शिवाजी असें ठेविलें. ४ हा, शाहाजी इ० स० १६६४ त निवर्तल्यावर, कर्नाटकांत शाहाजीची जी जहागीर होती तिचें काम पाहूं लागला. ५ काव्येतिहाससंग्रहांत दादाजी हा हिंगणी बेरडी धुळेंगांव एथील कुळकर्णी असें दिलें आहे; परंतु क्यांबेल साहेब, तो पुणें जिल्ह्यांतील पाटस तालुक्यांपैकीं मलठण गांवचा कुळकर्णी असें ह्मणतो. त्यानें मावळ, जुन्नर वगैरे प्रांत चांगल्या स्थितीस आणला, त्या प्रांतांत लांडगे वगैरे हिंस्रपशु फार होते ते ठार मारून मुलूख निरुपद्रवी केला, मलिकंबराच्या धाऱ्याची पद्धत सुरू करून जहागिरीचें उत्पन्न

पण विजापुरास गेला तेव्हां, जिजाबाई व शिवाजी शिवनेरी किल्ल्यांत होतीं त्यांना पुण्यास आणावें ह्मणून त्याला आज्ञा केली. त्याप्रमाणें इ० स० १६३७ त तो त्यांना पुण्यास घेऊन आला. त्या ठिकाणीं दादाजीनें निरनिराळे पंतोजी ठेवून त्यांच्याकडून शिवाजीला दांडपट्टा, कुस्ती, बोथाटी फेंकणें, घोड्यावर बसून निशाण मारणें, शिकार करणें, लष्करी कवाईत इत्यादि कला शिकवून हुशार केलें; व त्या वेळच्या मराठे सरदारांच्या मुलांस शिकविण्याची विद्या ह्मटली ह्मणजे हीच होय. शिवाजी मोठा हूड व तीव्रबुद्धि असल्यामुळें तो या कलांत फारच लौकर निष्णात झाला. पुणें प्रांत हा सपाट प्रदेश व पहाडी प्रदेश यांच्या सरहद्दीवर असल्यामुळें त्या ठिकाणीं शाहाजी नेहमीं आपले कांहीं घोडेस्वार ठेवीत असे. त्यांचा व शिवाजीचा चांगला स्नेह जमला. शिवाय त्या प्रांतांत जे लुटारू लोक असत त्यांच्याशींही त्यानें स्नेह केला. त्यांच्या संगतीनें त्याला साहस करण्याची गोडी लागली. शिवाय दादाजी त्याला जहागिरीचा कारभार पाहण्यांतही आपल्या मदतीस घेत असे, यामुळें तिकडचीही माहिती त्याला झाली. पुढें लौकरच शिवाजी दादाजीच्या कैदेंत राहीनासा झाला. तेव्हां त्यानें त्याला "आतां हे ढंग सोडून द्या, ह्यांत तुमचें व तुमच्या वडिलांचें कल्याण आहे" वगैरे पुष्कळ बोध करून पाहिला; परंतु शिवाजी आपला पुंडाईचा क्रम बंद करीना. त्यानें त्याला धमकी देऊन पाहिलें, व दुसऱ्या पुष्कळ उपायांनीं त्याला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला; परंतु त्यापासून कांहींएक उपयोग झाला नाहीं. दादाजीचें शिवाजीवर पुत्रवत् प्रेम असल्यामुळें त्याची ती दांडगाईची वर्तणूक पाहून त्याला फार वाईट वाटे. शेवटीं निरुपाय होऊन त्यानें विष खाऊन आपला अंत करून

---

वाढविलें, व मावळे लोकांस प्रथमतः लष्करी नोकरींत ठेवून त्यांची सुधारणा केली. कयांवेल आदिकरून इतिहासकार दादाजी असें नांव देतात; व ग्रांटडफ, काव्येतिहाससंग्रह, दादोजी असें नांव लिहितात. परंतु मराठी भाषेच्या सरणीच्या मानानें पाहिलें तर दादोजी लिहिण्यापेक्षां दादाजी लिहिणें बरें दिसतें; त्या अनुरोधानें आम्हीं दादाजी असेंच नांव लिहिलें आहे.

घेतला[1]. अंतकाळीं त्यानें शिवाजीस जवळ बोलावून, "गोब्राह्मणांचा प्रतिपाल करण्याचा जो क्रम तुह्मीं सुरू केला आहे तो तसाच चालवून धर्मस्थापना करा, यांत देव तुह्मांस यश देईल," असा आशीर्वाद देऊन त्या ह्मातार्‍यानें प्राण सोडला.

शिवाजीनें आपल्या वयाच्या केवळ .१९ व्या वर्षी ह्मणजे इ० स० १६४६ त तोरणा किल्ला घेतला. नंतर कोंडाणें, पुरंदर, कांगोरी, तुंग, तिकोना, लोहगड, राजमाची, भोरूप, वगैरे किल्ले व त्यांच्या आसपासचा मुलूख सर करून तो हळू हळू आपली सत्ता दृढ करूं लागला. आज हा किल्ला घे, उद्यां तो प्रांत काबीज कर, अशा रीतीनें त्यानें मराठी राज्याचा पाया घातला, व सन १६६४ त शाहाजी वारल्यावर त्यानें आपणास 'राजा' हा किताब घेतला. पुढें सन १६७४ त त्यानें आपणास रायगड एथें राज्याभिषेक करून घेतला, व आपल्या नांवाचें नाणें पाडलें. त्यानें स्वपराक्रमानें गोंवळकोंडें व विजापूर ह्या राज्यांवर आपला चौथाईचा हक्क बसविला, औरंगजेबासारख्या बलिष्ट बादशाहाकडून आपणास राजा असें ह्मणवून घेतलें, मराठे लोकांची एक जूट केली, स्वराज्याचा बळकट पाया घातला, हिंदुद्वेष्ट्या यवनांना कित्येक प्रसंगीं 'दे माय धरणी ठाय' ह्मणायाला लाविलें, व आपल्या स्वतःच्या व अन्य देशच्या लोकांकडून आपणास गाजी ह्मणवून घेतलें. हा अद्वितीय व शौर्यशाली पुरुष आपल्या वयाच्या ५३ व्या वर्षी ह्मणजे इ० स० १६८० त रायगड एथें मृत्यु पावला.

शिवाजीला संभाजी[2] व राजाराम[3] असे पुत्र होते. शिवाजी मृत्यु पावला त्या वेळीं त्याच्या हुकुमावरून संभाजीस पन्हाळा कि-

---

१ मराठी साम्राज्याची छोटी बखर–( काव्येतिहाससंग्रह ). २ संभाजीच्या आईचें नांव सईबाई; ही निंबाळकरांची कन्या. हिचा विवाह इ० स० १६३७ त झाला. संभाजी इ० स० १६५७ त जन्मला. सईबाई इ० स० १६५९ त मरण पावली. ३ राजारामाच्या आईचें नांव सोयराबाई. ही शिरक्यांची कन्या. हिला संभाजी गादीवर आल्यावर त्यानें इ० स० १६८० त ठार मारविलें.

ल्यावर कैदेंत ठेविलें होतें; व **राजाराम** **रायगड** एथें होता. **संभाजी** आपल्या बापाप्रमाणें मोठा शूर होता, परंतु स्वभावानें क्रूर व दुर्व्यसनी होता. **आपल्यामागें संभाजी** गादीवर बसला तर तो मराठी राज्याची लौकरच वाताहत करील असें **शिवाजी** नेहमीं आपल्या सरदार व मानकरी लोकांजवळ ह्मणत असे. तो वारल्यावर **राजारामाची** मातुश्री **सोयराबाई** इनें बहुतेक सरदार व मानकरी मंडळी आपल्या पक्षास अनुकूल करून घेतली व "आपल्या मागें **राजारामास** गादीवर बसवून त्याच्या नांवानें राज्यकारभार चालवावा" अशी **शिवाजी** महाराजांची आज्ञा होती असें गृहीत धरून **राजारामास** गादीवर बसविलें. तसेंच **संभाजीचा** बंदोबस्त करण्याकरतां **खंडूजी** नाईक याच्याबरोबर पत्रें देऊन त्याला, **सोमाजी** नाईक, **बहिरजी** फर्जंद, **जनार्दनपंत** सुमंत वगैरे मंडळी **पन्हाळ्यास** होती त्यांच्याकडे रवाना केलें. परंतु **संभाजीला** संशय आल्यावरून त्यानें तीं पत्रें धरलीं व अशा रीतीनें **सोयराबाईचें** कारस्थान बाहेर पडलें. त्यानें कांहीं लोक गोळा करून **जनार्दनपंत** वगैरे मंडळीचा पराभव करून त्यांस कैद केलें[1]. सेनापति हंबीरराव **मोहिते** त्याला येऊन मिळाला; तसेंच **मोरोपंत** पिंगळे **पेशवे** व **अण्णाजी दत्तो** सचिव यांच्यामध्यें कांहीं कारणावरून कलागत लागून **मोरोपंतही सोयराबाईचा** पक्ष सोडून **संभाजीस** येऊन मिळाला. अशा रीतीनें आपल्या पक्षास बराच जोर आला असें पाहून **संभाजी पन्हाळ्याहून रायगडास** येण्याकरतां निघाला. तेथें येऊन पोहोंचल्यावर किल्ल्यांतील सर्व शिबंदी त्याला येऊन मिळाली. तो इ० स० १६८० च्या जून महिन्यांत गादीवर बसला[2].

**शिवाजीच्या** मृत्यूपासून तो गादीवर बसेपर्यंत **संभाजीची** वर्तणूक फार उत्तम प्रकारची होती, व त्यानें आपला कारभार मोठ्या हुशारीनें, दक्षतेनें व सुयंत्रपणें चालविला होता. त्याची ती वर्तणूक तशीच कायम राहिली असती तर तो आपल्या बापाप्रमाणें नांव गा-

---

१ **काव्येतिहाससंग्रह.** २ **ग्रांटडफ.**

जवून गेला असता. परंतु गादी प्राप्त होतांच त्याची वृत्ति पालटली. त्याच्या पूर्वीच्या सौम्यवृत्तीचा लोप झाला व त्या ठिकाणीं क्रौर्यानें आपला पूर्ण अंमल बसविला. प्रथमतः त्यानें **रा**जाराम व त्याची आई **सो**यराबाई यांस कैद केलें. त्यांपैकीं **रा**जाराम यास त्यानें **रा**यगड एथें प्रतिबंधांत ठेविलें, व **सो**यराबाईवर **शि**वाजीला विषप्रयोग केल्याचा आरोप ठेवून इ० स० १६८० त भिंतींत चिनून ठार मारलें. तसेंच **अ**ण्णाजी **द**त्तो सचिव, व **मो**रोपंत **पिं**गळे **पे**शवे यांसही त्यानें कैद केलें, व त्यांच्या जहागिरी, घरेंदारें वगैरे जप्त केलीं. नंतर **स**चिवास हत्तीच्या पायीं देऊन ठार मारलें, व **पे**शव्याच्या हातापायांत मोठमोठ्या बिड्या ठोकून त्याला प्रतिबंधांत ठेविलें. अशा रीतीनें **सो**यराबाईच्या पक्षास जी मंडळी अनुकूल होती, तीपैकीं कांहींचीं डोकीं उडविलीं, कांहींना हत्तीच्या पायीं दिलें, कांहींचा कडेलोट केला व कांहींच्या हातापायांत शृंखळा घालून त्यांना किल्ल्यांतील अंधारकोठड्यांचे धनी करून ठेविलें ! ह्याप्रमाणें **सं**भाजीच्या कारकीर्दीला जो आरंभ झाला तोच अशुभ रीतीनें झाला असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. याच वेळेच्या सुमारास **सं**भाजीस **ये**सूबाईचे पोटीं, कोंकणांत **गां**गोली एथें पुत्र झाला. त्याचें नांव **शि**वाजी असें ठेविलें. हाच पुरुष आमच्या प्रस्तुतच्या चरित्राचा नायक होय. तो इ० स० १६८० च्या डिसेंबर महिन्यांत जन्मला. त्याचें **शा**हू हें नांव कसें पडलें याचें कारण पुढें समजून येईल.

नंतर **सं**भाजीनें **शि**वाजीच्या वेळचे जुने, अनुभवशीर व हुशार असे जे थोडेसे मुत्सद्दी व कामगार शिलक राहिले होते त्यांना नोकरींतून दूर करून **क**लुशा किंवा **क**वि **क**वजी ह्मणून एक **क**नोजा ब्राह्मण होता त्याला आपला **पे**शवा अथवा मुख्य प्रधान नेमिलें. या मनुष्याला राज्यकारभार चालविण्याचें मुळींच ज्ञान नव्हतें. **सं**भाजी नेहमीं दारूमध्यें धुंद असे व **क**लुशाशिवाय दु-

---

१ मराठी साम्राज्याची छोटी बखर-(**का**व्येतिहाससंग्रह.)

सऱ्या कोणास त्याची भेट घेण्याची सक्त मनाई होती. मग काय विचारतां! हे कलुशेबुवा करतील ती पूर्वदिशा! ह्या अव्यवस्थेमुळें राज्यांत हळू हळू बेबंदशाई माजत चालली, शिवाजीच्या वेळचीं सर्व शिस्त नाहींशी झाली, लष्करी खात्यांतील नियम मोडले, लढाईवर जातांना शिपाई लोक आपलीं बायकामुलें बरोबर घेऊं लागले, फौजेस पूर्वींप्रमाणें वेतन मिळेनासें झालें, वेतन न मिळाल्यामुळें शिपाई लोक भडाभड नोकऱ्या सोडून जाऊं लागले, व त्यामुळें सैन्याचा तोटा पडत चालला. संभाजीच्या उधळेपणामुळें शिवाजीच्या वेळचा अपार[2] खजिना रिता पडला, कर्नाटकांतून राज्याचा वसूल येईनासा झाला; पैशाची टंचाई झाल्यामुळें कलुशानें जमिनीवरचा धारा वाढविला, प्रजेला तितका धारा देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें लोक घरेंदारें, जमीनजुमला सोडून जाऊं लागले, गांवचे गांव ओसाड पडत चालले, व मराठी राज्य लयाला जाण्याचीं ढळढळीत चिन्हें दिसूं लागलीं; व अशा ऐन नातवानीच्या प्रसंगीं औरंगजेबानें आपल्या अवाढव्य सैन्यासह दक्षिणदेश जिंकण्याचे हेतूनें बऱ्हाणपुरास येऊन तळ दिला.

औरंगजेबानें प्रथमतः गोवळकोंडें व विजापूर हीं दोन दक्षिणेंतील मुसलमानी राज्यें खालसा करण्याचा निश्चय केला, व त्या हेतूनें तो बऱ्हाणपूर सोडून औरंगाबादेस येऊन दाखल झाला. पुढें इ० स० १६८६-८७ या सालांत त्यानें तीं राज्यें जिंकून आपल्या राज्यांत कायमचीं सामील केलीं. नंतर तो मराठ्यांकडे वळला व त्यांना

---

१ शिवाजीच्या वेळीं लष्करी खात्याच्या संबंधानें असा एक कडक नियम होता कीं, कोणी लष्करी शिपाई अगर अंमलदार यानें लढाईचे वेळीं आपणाबरोबर आपलीं बायकापोरें घेतल्यास त्याला देहान्त प्रायश्चित्त मिळत असे—ग्रांटडफ.

२ शिवाजी वारला त्या वेळीं त्याच्या खजिन्यांत १० कोट रुपये, ५१००० तोळे सोनें, २०० तोळे माणीक, १००० तोळे मोतीं, ५०० तोळे हिरे, इतका ऐवज होता. याशिवाय नानाप्रकारचीं हत्यारें, उंची जरतारी कापड, व रुपेरी सामान अतोनात होतें. त्याची संपूर्ण हकीकत बेरिंग साहेबानें केलेल्या मराठ्यांच्या इतिहासांत व काव्येतिहाससंग्रहांत दिली आहे.

पादाक्रांत करून टाकण्याचा त्यानें प्रयत्न चालविला. तो मराठ्यांचा मुलूख भराभर काबीज करीत चालला. तथापि **संभाजीनें** त्याच्या प्रतीकाराचा कांहींच प्रयत्न केला नाहीं. मोगल लोक मराठ्यांचे राज्यावर चोहोंकडून घिरट्या घालूं लागले, व **शिवाजीच्या** वेळीं जो मुलूख मराठ्यांचे ताब्यांत होता[1] त्यापैकीं बहुतेक मुलूख **संभाजीच्या** हातून गेला. त्याच्या खास अमलाखालीं फक्त **कोंकणपट्टी** व **दक्षिण-महाराष्ट्राचा** थोडासा भाग एवढाच मुलूख काय तो शिल्लक राहिला. इतकें झालें तरी त्याचे डोळे उघडले नाहींत! जसजशीं त्याच्यावर अधिक अधिक संकटें येऊं लागलीं तसतसा तो अधिक अधिक बेफाम व व्यसनी होत चालला, व त्यामुळें त्याच्या अंगच्या शौर्याचा अगदीं लोप होऊन गेला. कदाचित् **शिवाजीचे** जुने सरदार **डफळे, घाटगे, माने, निंबाळकर** वगैरे यांनीं एखादा प्रयत्न करण्याचा विचार मनांत आणलाच तर तो हाणून पाडण्याविषयीं **कलुशे** सरकार हातांत तिलांजलि घेऊन तयार! त्यामुळें त्यांना प्रयत्न करण्याची संधिच मिळाली नाहीं.

पुढें पुढें तर **संभाजी** आपण कोण, व करतों काय याची पर्वाच बाळगीनासा झाला. शेवटीं तो **कलुशासह कोंकणांत संगमेश्वर** एथें ऐषआरामांत व मोठ्या चैनींत कालक्रमणा करीत असतां मोंगलांचा सरदार **तकरीबखान** यानें बातमी ठेवून **कोल्हापुराहून** येऊन अक-

---

१ **शिवाजी** मरण पावला त्यावेळीं त्याच्या ताब्यांत जो मुलूख होता तो:- **गावें, चौल, साष्टी, वसई, जंजिरा, मुंबईबेट;** याशिवाय सर्व **कोंकणपट्टी, कारवार, अंकोला** वगैरे ठिकाणीं त्यानें आपलीं ठाणीं वसविलीं होतीं; **सुंदच्या** राजानें त्याचें स्वामित्व कबूल केलें होतें, **बेदनूरचा** राजा त्याला खंडणी देत असे; तसेंच **बल्लारी, कोफाळ, द्रविडदेश, तंजावर,** एथें त्याचा चांगला अंमल बसला होता, दक्षिणेस **हरणकाशी** व उत्तरेस **इंद्रायणी** यांच्यामधील मुलूख त्याच्या ताब्यांत होता; **पुणें, सुपें, बारामती, इंदापूर** हे प्रांत तर त्याचे जहागिरीचे होतेच; शिवाय **खानदेश, संगमनेर** या प्रांतांतील बराच प्रदेश त्याच्या ताब्यांत होता. एवढा मोठा मुलूख मराठ्यांच्या ताब्यांत असतां **संभाजीच्या** गैरशिस्त वर्तनामुळें त्यापैकीं बहुतेक मुलूख त्याच्या फक्त ९ वर्षांच्या कारकीर्दींत त्याच्या हातून गेला! वरील मजकूर **ग्रांटडफ** साहेबांच्या इतिहासांत दिलेला आहे.

स्मात् त्यांच्यावर छापा घातला. प्रथमतः त्यानें **क**लुशास कैद केलें. ह्या गर्दीत **सं**भाजी वेष पालटून एका देवळांत दडून बसला; परंतु मोंगलांनीं त्याच्या अंगावरील मौल्यवान कपडे पाहून हाच **सं**भाजी असावा अशा संशयावरून त्याला पकडलें. नंतर **सं**भाजी व **क**लुशा यांसह तो सरदार मोठ्या डौलानें **औ**रंगजेबाच्या छावणींत आला[2]. आतां बादशाहा **सं**भाजीस खचीत ठार मारील असें **औ**रंगजेबाच्या सरदारांस वाटल्यावरून त्यांनीं **सं**भाजीस ठार मारूं नये, त्याच्यावर रहीमनजर करावी अशी बादशाहास विनंति केली. तेव्हां बादशाहानें "तूं आमचा धर्म स्वीकारशील तर तुला आह्मी जीवदान देतों" असें सांगितलें. **सं**भाजी कसा झाला तरी शूराचा बच्चा होता, तेव्हां त्याला हे शब्द ऐकून मोठा त्वेष आला. दुसऱ्याचे, त्यांतून आपला पुरा हाडवैरी **औ**रंगजेब याचे कैदेंत राहण्यापेक्षां मरण बरें असें त्याला वाटूं लागलें. त्यानें बादशाहास असा खडखडीत जबाब दिला कीं, "जहापन्हा तकसीर माफ. आपनी बेटी बेगम **पा**दशाहजादी इनायत होय तो मैं कबूल." शिवाय त्यानें बादशाहाच्या तोंडावर त्याच्या पैगंबराची अतोनात निंदा केली. अगोदरच **औ**रंगजेबासारखा मानी बादशाहा, त्यांतून त्याच्या तोंडावर त्याच्या पैगंबराची निंदा; मग काय विचारतां! त्याची तळपायांची आग मस्तकास गेली. तो रागानें बेफाम होऊन गेला व त्यानें **सं**भाजीला ठार मारण्याविषयीं तत्काळ हुकूम केला. नंतर **तु**ळापूर एथें भरबाजारांत, प्रथमतः तापवून लाल केलेल्या सांडसानें त्याचे डोळे काढले, व ज्या जिव्हेनें त्यानें पैगंबराची निंदा केली होती ती जिव्हा छाटून टाकली, आणि शेवटीं त्याचा शिरच्छेद केला.—डिसेंबर इ० स०[3] १६८८.

---

१ **क्यां**बेल व **ग्रां**टडफ. २ ह्या वेळीं औरंगजेबाची छावणी **सो**लापूर जिल्ह्यांत अकुज एथें होती.—**क्यां**बेल. ३ **का**व्येतिहाससंग्रहांत असें आहे. **ग्रां**टडफ आदिकरून इंग्लिश ग्रंथकार **सं**भाजीस इ० स० १६८९ त मारलें असें म्हणतात.

संभाजी शिवाजीप्रमाणें मोठा शूर व शहाणा होता; परंतु त्याचा स्वभाव मोठा क्रूर पडला; शिवाय कलुशासारख्या आपमतलबी, महत्वाकांक्षी, कुलकलंकी, नीच व व्यसनी अशा राहूनें त्याला ग्रासून टाकल्यामुळें त्याच्या अंगीं जे कांहीं थोडेसे चांगले गुण होते त्यांचा लोप झाला होता. त्याच्या कारकीर्दीचा प्रारंभ जसा अशुभ रीतीनें झाला होता तसा तिचा शेवटही अशुभच झाला. तो आणखी कांहीं वर्षें असता तर त्याच्या हातून एकादें शूरत्वाचें काम किंवा सत्कृत्य होणें लांबच राहिलें असतें, पण उलट दुसरीं अनर्थाचीं व निंदास्पद कृत्यें पुष्कळच घडलीं असतीं असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

---

# भाग २.

## संभाजीला मारल्यानंतरची मराठ्यांच्या राज्याची हकीकत, व औरंगजेबानें मराठ्यांस जिंकण्याकरतां केलेला प्रयत्न. सन १६८९ पासून १७०७ पर्यंत.

**संभाजीच्या** मृत्यूमुळें **मराठ्यांच्या** मनावर घडलेला परिणाम.—**राजाराम हा** लहान **शिवाजी** ऊर्फ **शाहू** याच्या नांवानें राज्यकारभार पाहूं लागतो.—**प्रल्हाद निराजीनें** मराठी राज्याच्या बंदोबस्ताकरतां केलेला प्रयत्न.—**संभाजीची** बायको **येसूबाई** व तिचा पुत्र **शिवाजी** ऊर्फ **शाहू** यांस तो **रायगड** एथें ठेवितो.—**शाहूचें** बालपणचें शिक्षण.—**औरंगजेबाचा** सरदार **झुलपिकारखान रायगडास** वेढा देतो.—तो **येसूबाई** व **शिवाजी** यांना कैद करतो.—**औरंगजेबाची** त्यांच्याशीं वागणूक.—**शिवाजीचें शाहू** हें नांव पडण्याचें कारण.—**औरंगजेबाची** मुलगी **बेगमसाहेब** इचें **शाहूवरील** प्रेम.—**रायगड** मोंगलांचे हातीं पडल्यावर **राजाराम जिंजीस** जातो.—**औरंगजेबाकडील** बातमी कळण्याकरतां **राजारामानें** ठेवलेले गुप्त हेर.—**औरंगजेबाच्या** दक्षिणेंतील मोहिमीचें वर्णन.—**राजाराम जिंजीस** आपले अष्टप्रधान नेमतो.—मोंगल **जिंजीस** वेढा देतात.—**धनाजी जाधव, संताजी घोरपडे** व **शंकराजी नारायण** हे मोंगलांचे मुलखास हैराण करतात.—**राजाराम जिंजीहून** पळून जातो.—**साताऱ्यास** मराठ्यांची गादी स्थापन होते.—**राजाराम शाहूस** सोडविण्याकरतां **बादशाहाचे** छावणीवर हल्ला करतो.—मराठे मोंगलांच्या मुलखास फार त्रास देतात.—**बादशाहा** मराठ्यांशीं तह करण्यास कबूल होतो.—मराठ्यांच्या औद्धत्यामुळें तो तह होत नाहीं.—मोंगल **राजारामाचा** पाठलाग करतात.—त्याचा सन १७०० त **सिंहगड** एथें मृत्यु.—त्याचा स्वभाव.—**औरंगजेब सातारा** घेतो.—**राजारामाचे** मृत्यूमुळें **शाहूस** झालेलें दुःख.—**राजारामाचे** पाठीमागें **ताराबाई** आपला मुलगा **शिवाजी** याचे नांवानें राज्यकारभार चालविते.—**शाहूचीं** मोंगलांचे छावणींत दोन लग्नें होतात.—**औरंगजेब** मराठ्यांचे बहुतेक किल्ले घेतो.—त्याचे राज्यांत बखेडे उत्पन्न होतात.—मराठे पुनः डोकें वर उचलतात.—**औरंगजेबाच्या** छावणींतील बखेडे.—मराठे त्याची दुर्दशा करतात.—तो मोठ्या संकटानें **अहमदनगर** एथें येऊन पोहोंचतो.—त्याचा सन १७०७ त **अहमदनगर** एथें मृत्यु.—त्याचीं धर्मसंबंधी मतें.—त्याच्या अंतकाळीं त्याच्या अवाढव्य राज्याची स्थिति.—त्याची राजनीति.

संभाजीला त्याचे सर्व लोक कंटाळले होते ही गोष्ट खरी होती. परंतु औरंगजेबानें तुळापूर एथें जो त्याचा मोठ्या क्रूरपणानें वध केला, त्यामुळें संपूर्ण मराठे लोकांना अतिशय राग आला व सर्व लोक त्याचा अतिशय द्वेष करूं लागले. मराठे लोकांस दहशत बसावी अशा हेतूनें औरंगजेबानें हें निंद्य कृत्य केलें होतें. परंतु त्यापासून मराठ्यांस दहशत बसणें तर लांबच राहिलें, पण उलट त्यांचा मोंगलांविषयींचा द्वेष मात्र दुणावला !

संभाजीनें राजारामास रायगडास कैदेंत ठेविलें होतें ह्मणून पूर्वी सांगितलें आहे. परंतु संभाजीनें त्याला कोणत्याही तऱ्हेनें वाईट रीतीनें वागविलें असावें असें दिसत नाहीं. राजारामाची पहिली बायको जानकीबाई ही वारल्यावर संभाजीनें त्याचीं आणखी दोन लग्नें केलीं. थोरल्या बायकोचें नांव ताराबाई—ही मोहित्यांची कन्या—व धाकटीचें नांव राजसबाई—ही कागलकर घाटगे यांची कन्या. संभाजीची बायको येसूबाई व पुत्र शिवाजी हीं नेहमीं रायगडासच असत. राजाराम वारंवार येसूबाईच्या भेटीस जात असे; यामुळें येसूबाईच्या मनांत राजारामाविषयीं बरें वागत असे. संभाजी मरण पावल्यानंतर पुढें राज्य कसें तरी हांकून शिवाजी महाराजांचें नांव राखलें पाहिजे असा हेतु मनांत धरून सर्व जुने कारभारी एकत्र मिळाले व त्यांनीं येसूबाईच्या सल्ल्यानें असें ठरविलें कीं, "लहान शिवाजी वयांत येईपर्यंत सर्व राज्यकारभार मुलाच्या नांवानें राजारामानें चालवावा." ह्या वेळीं शिवाजीचें वय फक्त ८।९ वर्षांचें होतें. वर सांगितलेल्या मंडळींत प्रल्हाद निराजी, जनार्दनपंत हणमंते, रामचंद्रपंत भुतकर, खंडो बल्लाळ चिटणीस, महादजी नाईक पानसंबळ, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे वगैरे मंडळी प्रमुख होती.

त्या वेळीं संपूर्ण राज्याचीं कामें प्रल्हाद निराजीच्या सल्ल्यानें चालत असत. त्यानें प्रथमतः मराठ्यांकडे जे कांहीं किल्ले होते त्यांवर शिबंदी वगैरे ज्यास्त ठेवून पूर्वी शिवाजीनें घालून दिलेल्या नियमांप्रमाणें जिकडेतिकडे बंदोबस्त केला. त्यानें आणखी असें केलें कीं,

मोंगलांस ठिकाण न लागावा ह्मणून राजारामानें निरंतर एके ठिकाणीं न राहतां रायगड व विशाळगड यांचे दरम्यान आलटून पालटून रहावें. नंतर राजारामानें आपलें सर्व कुटुंब विशाळगडास ठेविलें, व रायगडावर आणखी शिबंदी ठेवून त्या ठिकाणीं येसूबाई व तिचा पुत्र शिवाजी यांस ठेविलें.

लहान शिवाजी नेहमीं जोत्याजी केसरकर ह्याच्या शिक्षेखालीं असे. त्यानें त्याला घोड्यावर बसणें, तो भरधांव काढणें, निशाण मारणें वगैरे गोष्टी थोडथोड्या शिकविल्या होत्या; परंतु तो फार लहान असल्यामुळें ह्या विद्यांत विशेष प्रवीण झाला होता असें नाहीं.

औरंगजेब बादशाहानें आपलें सर्व सैन्य कोंकण जिंकण्याकरितां पाठविलें होतें; व मराठ्यांच्या राज्यांत त्यानें आपले गुप्त हेर ठेविले होते. संभाजीचें सर्व कुटुंब रायगडास आहे ही बातमी त्याला कळतांच त्यानें प्रथमतः रायगडास वेढा घालण्याचा हुकूम केला. तेव्हां त्याचा प्रबल सरदार झुलपिकारखान ह्यानें बरोबर मोठें सैन्य घेऊन सन १६९० त किल्ल्यास वेढा घातला, व कोंकणांतून जंजिऱ्याचा हबशी त्याच्या मदतीस येऊन त्यानें किल्ल्यास मोर्चे लाविले. मोंगलांनीं किल्ला सर करण्याविषयीं आपली शिकस्त केली; परंतु आंतील लोकांनीं १० महिनेपर्यंत मोंगलांस दाद दिली नाहा. बाहेरून धान्यसामग्री येण्याचें बंद झालें, धान्याचा तोटा पडल्यामुळें किल्ल्यांत लोकांची उपासमर होऊं लागली, व त्यामुळें किल्ल्यांतील शिबंदी पटापट मरूं लागली. राजारामाकडून मदत येण्याचें कांहींच चिन्ह दिसेना; कारण, ह्या वेळीं राजारामाला आपल्या स्वतःचेंच रक्षण करण्याची पंचाईत होती; मग तो दुसऱ्याला मदत काय करणार हें सहजच दिसत होतें. अशा स्थितींत किल्ला शत्रूच्या हवालीं करण्याखेरीज दुसरी तोडच उरली नाहीं.

झुलपिकारखान यानें किल्ल्यांतील मंडळीस असें कळविलें कीं, "राजाराम व तुमचे सर्व सरदार निघून गेले आहेत, तेव्हां तिकडून तुह्मांला मदत येणें कठीणच. बरें कदाचित् मदत आली, तर तिचा

तुह्मांला फारसा उपयोग होईल असें वाटत नाहीं. शिवाय बेगमसाहेब[1] यांचें असें ह्मणणें आहे कीं, 'लहान शिवाजी याला मीं आपल्या पुत्राप्रमाणें मानिलें आहे, व संभाजी महाराजांच्या सर्व कुटुंबास माझ्या कुटुंबांतील मनुष्यांप्रमाणें वागविण्याचा मीं निश्चय केला आहे; व बादशाहाचेंही या गोष्टीस पूर्ण अनुमोदन आहे.' तेव्हां मला असें वाटतें कीं, हट्टास पेटून विनाकारण मनुष्यांचे बळी पाडणें ही गोष्ट रास्त होणार नाहीं. तेव्हां किल्ला आमचे हवालीं करून बादशाहा व बेगमसाहेब यांची मर्जी संपादन करावी हें मला बरें दिसतें, व यांतच तुमचें कल्याण आहे." किल्ल्यांत येसूबाईच्या कानीं हा निरोप जातांच तिनें आपले सर्व लोक एकत्र बोलाविले व त्यांना सांगितलें कीं, "योउपर किल्ला आपण मोंगलांचे हवालीं केला नाहीं तर, बादशाहा मुसलमान असून हिंदूंचा पूर्णद्वेष्टा असल्यामुळें तो पुढें काय अनर्थ करील याचा नियम नाहीं. याकरितां सध्या प्राप्त झालेल्या प्रसंगास डोकें देऊन खान व बेगम यांच्या बोलण्यावर विश्वास ठेवावा; व दैवावर हवाला ठेवून किल्ला मोंगलांचे स्वाधीन करावा हें मला बरें दिसतें." ही मसलत सर्व मंडळीस पसंत पडली व त्यांनीं किल्ला तत्काळ झुलपिकारखानाचे स्वाधीन केला. खानानें किल्ल्यांतील सर्व लोकांस—विशेषतः येसूबाई व शिवाजी यांस—फार चांगल्या तऱ्हेनें वागविलें. येसूबाईनें मुलास खानाचे स्वाधीन केलें व "याचे वडील, चुलते वगैरे सर्व मंडळी याला टाकून गेली, तेव्हां आतां सर्व भार आपणावरच आहे" असें ह्मणाली. असे शब्द उच्चारतांना येसूबाईची काय स्थिति झाली असेल याची वास्तविक कल्पना वाचकांनींच करावी! तिच्यापुढें शिवाजी महाराजांच्या वेळचें

१ ही औरंगजेबाची मुलगी. "आपली मुलगी मला बायको देशील" असें जिच्या संबंधानें संभाजीनें ह्मटलें होतें ती हीच. आपणानिमित्त संभाजी प्राणास मुकला हें पाहून तिनें जन्मभर अविवाहित राहण्याचा निश्चय केला व तो शेवटासही नेला. संभाजीच्या बायकोवर व मुलगा शिवाजी ह्यांजवर ती फार प्रेम करीत असे. शिवाजीला तर तिनें आपला मुलगा असें ह्मटलें होतें. काव्येतिहाससंग्रह. २ काव्येतिहास संग्रह–(शाहूमहाराजांचें चरित्र.)

सर्व वैभव दळदळीत उभें राहिलें, कंठ दाटून आल्यामुळें तिच्यानें पुढें एक शब्दही बोलवेना, आणि ती जागच्या जागीं चित्राप्रमाणें तटस्थ राहिली! बरोबरच आहे, असें कां नाहीं होणार? ज्या शिवाजी महाराजांनीं अडाणी व गरीब पण शूर व इमानी अशा मावळ्यांच्या ज़ोरावर स्वराज्याचा पाया घातला, ज्यांनीं अव्याहत परिश्रम करून देशचे देश काबीज केले, ज्यांनीं विजापूर, गोवळकोंडें एथील राजांस जेरीस आणून त्यांच्याकडून खंडण्या घेतल्या, ज्यांनीं स्वराज्य उभारून हिंदुधर्माची संस्थापना केली, ज्यांनीं औरंगजेबासारख्या बलिष्ठ योद्ध्याला घाबरवून सोडलें, त्याच शूर शिवाजी महाराजांच्या सुनेला त्याच औरंगजेबाच्या सरदारापुढें करुणा भाकण्याचा प्रसंग यावा यापरता दुःखदायक प्रसंग तो कोणता? येसूबाईची ती स्थिति पाहून खानासही फार वाईट वाटलें. त्यानें "आतां या मुलाविषयीं तुह्मी कांहीं काळजी करूं नका, याच्या अब्रूस व जिवास कदापि धक्का लागूं देणार नाहीं" असें ह्मणून कुराण[1] उचलून दिलें.[2]

नंतर झुलपिकारखानानें रायगडचा किल्ला जंजिऱ्याचा हबशाच्या स्वाधीन करून तो शिवाजी, येसूबाई, जोत्याजी केसरकर, मोरोपंत सबनीस, उद्धव योगदेव वगैरे मंडळीस घेऊन बादशाहाच्या छावणींत निघून गेला. शिवाजीची भवानी तरवार व अफ-

---

१ मुसलमान लोकांत कुराण उचलून देणें ही फार महत्त्वाची शपथ मानितात. २ रायगडच्या संबंधाचा वरील मजकूर मल्हार रामराव यांनीं केलेल्या शाहू महाराजांच्या चरित्रांत दिला आहे; परंतु ग्रांटडफ, एल्फिन्स्टन आदिकरून इंग्रज इतिहासकार असें ह्मणतात कीं, "सूर्याजी पिसाळ या नांवाचा शिवाजीच्या वेळचा एक जुना नोकर होता, त्याला वांईच्या देशमुखीच्या खटल्यासंबंधानें कांहीं राग येऊन "वांईची देशमुखी तुह्मांस देऊं" असा मोंगलांपासून करार करून घेऊन तो त्यांस वश झाला. त्यानें आपल्याबरोबर कांहीं निवडक मावळे लोक व मोंगल लोक घेतले व त्यांस एका चोरवाटेनें किल्ल्यांत घेऊन गेला; अशा रीतीनें त्यांनीं तो किल्ला सर केला, व शिवाजी व त्याची आई येसूबाई यांस कैद करून ते त्यांस औरंगजेबाच्या छावणींत घेऊन गेले.

जुल्खानाची तरवार अशा दोन्ही तरवारी ह्या वेळीं मोंगलांनीं नेल्या. तेथें गेल्यावर खानानें शिवाजीस बादशाहाचे चरणांवर घातलें. त्याला पाहून औरंगजेब फार खुष झाला, व इतर सर्व मराठे राजे 'चोर' व हाच काय तो 'साव' असें तो ह्मणाला. आणि ह्याचप्रमाणें तो नेहमीं शिवाजीस 'साव' अशी हांक मारीत असे. यावरून 'साव' या नांवाचें होत होत 'शाहू' असें नांव झालें; व हेंच त्याचें नांव पुढेंही कायम राहिलें. बादशाहा उत्तरोत्तर त्या मुलावर अधिक अधिक प्रेम करूं लागला. बेगमेनेंही बादशाहास सांगितलें कीं, "हा माझा मुलगा आहे; याकरितां आपलाही त्याच्यावर लोभ असावा." त्यामुळें बादशाहा शाहूवर अधिकच ममता दाखवूं लागला. बेगमेनें येसूबाईसही आपल्याकडे बोलावून नेलें, व तिला आपणाजवळ बसवून घेऊन तिचें पुष्कळ तऱ्हेनें समाधान केलें. तिनें येसूबाईस आपली बहीण असें मानिलें व ह्या भावांत तिनें आपल्याकडून कधींही अंतर पडूं दिलें नाहीं. औरंगजेबानें शाहूच्या तैनातीस दासदासी, हत्ती-घोडे देऊन त्याच्याकरतां निराळी नेमणूक तोडून दिली. तो शाहूस नेहमीं आपणाबरोबर जिकडेजिकडे त्याची छावणी हाले तिकडे तिकडे घेऊन जात असे, व दोन चार दिवसांनीं शाहूच्या समाचाराला जात असे. शाहूच्या शिक्षणाचें काम पूर्वींप्रमाणें जोत्याजी केसरकर ह्याच्याचकडे होतें व त्यानेंही अखेरपर्यंत शाहूची एकनिष्ठपणें सेवा केली.

मोंगलांनीं रायगडचा किल्ला घेऊन आंतील सर्व मंडळीस कैद केलें व ते त्यांना घेऊन औरंगाजेबाकडे गेले, हें वर्तमान राजाराम व त्याचे सरदार यांस कळलें तेव्हां त्यांना अतोनात दुःख झालें. पण उपयोग काय? आतां आपण ह्याच ठिकाणीं राहिलों तर आपलीही तीच अवस्था होईल असें वाटल्यावरून त्या सरदारांनीं

१ झुलपिकारखानानें शिवाजी व येसूबाई यांस बादशाहाकडे दिल्लीस पाठविलें असें कोणी इतिहासकार म्हणतात. परंतु तें चुकीचें आहे; कारण सन १६८३ त औरंगजेब दक्षिणेंत आला तो मरे तोंपर्यंत दक्षिणेंतच होता. दिल्लीस मुळींच गेला नाहीं.

राजारामास चंदी चंदावर (जिंजी तंजावर) एथें जाण्याची मसलत दिली. त्यावरून आपणाबरोबर कांहीं निवडक लोक घेऊन राजाराम मोठ्या कष्टानें जिंजीस जाऊन पोहोंचला. त्या ठिकाणीं हळू हळू त्याचे सर्व सरदारही त्यास येऊन मिळाले. गादीचा खरा मालक शाहू हा औरंगजेबाच्या कैदेंत होता ह्मणून राजारामानें आपणास त्या ठिकाणीं राजा हा किताब घेतला; व अष्टप्रधान* वगैरे नेमून तेथून तो मोंगलांच्या प्रतीकाराचे इलाज चालवूं लागला.

---

* राजारामानें जिंजी एथें आपले अष्टप्रधान नेमले त्यांचा तपशीलः—

१ प्रतिनिधी—प्रल्हाद निराजी.
१ पेशवे अथवा मुख्य प्रधान—निळो मोरेश्वर पिंगळे.
१ अमात्य—रघुनाथराव तिमाजी हणमंते.
१ सचिव—शंकराजी मल्हार नरगुंदकर.
१ पंडितराव—श्रीकराचार्य कालगांवकर.
१ मंत्री—शामजीराव पिंडे. (ग्रांटडफ याचे ग्रंथांत रामचंद्र त्रिंबक पुंडे असें नांव दिलें आहे.)
१ पंडित—निराजी रावजी.
१ सेनापति—संताजी घोरपडे.

याशिवाय दुसऱ्या सरदारांना पदव्या दिल्या त्याः—

परसोजी भोंसले—सेनासाहेब सुभा. याला गोंडवण, देवगड, चांदे व वऱ्हाड यांचा सुभा सांगितला.

सिदोजी नाईक निंबाळकर—सरलष्कर. ह्याला, गोदावरीच्या कांठचा जो प्रदेश त्यानें घेतला होता त्याचा सुभा सांगितला.

खंडेराव दाभाडे—सेना धुरंधर. यानें गुजराथ, वागलाण वगैरे ठिकाणीं मराठ्यांचा अंमल बसविला ह्मणून त्या प्रांतांचा सुभा त्याला सांगितला.

धनाजी जाधव—जयसिंगराव.

परशुराम त्रिंबक—हुकमतपन्हा, व समशेर बहादर शहाजंग.

याशिवाय आणखी दुसऱ्या पुष्कळ सरदारांना निरनिराळ्या पदव्या दिल्या, त्यांची कच्ची हकीकत थोरले राजाराम महाराज यांच्या चरित्रांत पान ३९ मध्यें सांपडेल.—का० सं०

इकडे येसूबाई व शाहू हीं औरंगजेबाच्या कैदेंत होतीं. तेव्हां त्यांच्याकडील वर्तमान कळण्याकरतां राजारामानें गुप्त हेर ठेविले होते. त्यांच्याकडून त्याला तिकडील कच्चें वर्तमान कळत असे. ह्या कामावर त्यानें भक्ताजी हुजरे व बंकी गायकवाड या दोन मनुष्यांची नेमणूक केली होती. ते कधीं गोसाव्याचा, कधीं कानफाट्याचा असे वेष घेऊन इकडचें वर्तमान तिकडे व तिकडचें इकडे आणीत नेत असत. एकदां येसूबाईनें ह्या हेरांबरोबर राजारामास पत्र पाठविलें होतें तें एणेंप्रमाणें:–"एथें आह्मांस आणवून बेगम यांचे पुत्र शिवाजी राजे (झाले तेव्हां) हे आपले नातू असें मनांत आणून ( पातशहांनीं ) मरातब राखून ठेविले आहेत. आपण आपला इलाखा पृथक् करून कबिल्यासुद्धां निघून गेलेत, आणि आमचे निसबतीचा कबिला टाकून गेलां हें पातशाहाच्या मनांत भरून (ते) लोभ बहुत करितात. आपला आमचा संकेत आहे तो परस्परां मनोमन आहे. आह्मांस एथून हरतऱ्हेनें नेऊन नंतर आपले कुटुंबास व आह्मांस एकदांच चंदीस घेऊन जावें तेव्हां एकेठिकाणीं व्हावें, असा मनांत संकेत धरून (तुह्मीं) विशाळगडीं कुटुंब त्रिवर्ग[1] बायका ठेविल्या. त्यास आपण चंदीप्रांतीं, बाया या प्रांतीं, (असें) राहणें हें चांगलें नव्हे. आपल्यास पुत्र[2] झाला त्याचा आह्मांस आनंद वाटला, व आपली व त्यांची भेट नाहीं हें चांगलें नव्हे. आह्मी एथें सर्वोपरि सौख्यांत आहों; परंतु अति विषवत् महान् संकटांत आहों. ईश्वरइच्छेनें व थोरले महाराज यांचे पुण्यप्रभावेंकरून यांतून पार होऊं तो सुदिन. आपले मनोरथ पूर्ण करणार श्रीदेवी व श्रीस्वामी समर्थ आहेत. यास्तव आपण राजचिन्हादिक बाळगून पूर्वील चालीप्रमाणें सर्व व्यवहार करीतच आहां त्याप्रमाणें करून, बाया विशाळगडीं ठेविल्या

---

१ जानकीबाई, ताराबाई, राजसबाई, अंबिकाबाई अशा ४ बायका राजारामास होत्या. परंतु जानकीबाई पूर्वींच मरण पावली असल्यामुळें त्रिवर्ग असें झटलें.–काव्येतिहाससंग्रह. २ राजारामाला ताराबाईचे पोटीं इ० स० १६९० त पुत्र झाला. त्याचें नांव शिवाजी असें ठेविलें होतें. हा वेडा होता.




आहेत त्या घेऊन जाव्या. यास अनुमान करूं नये.[1]" अशा रीतीनें शाहूकडील वर्तमान कळण्याची राजारामानें व्यवस्था करून ठेविली होती.

**शा**हू गादीवर येण्याचे अगोदर **म**राठ्यांची स्थिति कशी होती हें नीट लक्ष्यांत येण्याकरतां **औ**रंगजेबाच्या **द**क्षिणेंतील मोहिमेचें वर्णन देणें अवश्य आहे.

ह्या संबंधाचा इतिहास **सं**भाजीच्या मृत्यूपर्यंत वाचकांस कळलाच आहे. तसेंच **राय**गडचा किल्ला मोंगलांनीं काबीज केल्यावर **रा**जाराम **जिं**जीकडे निघून गेला हेंही मागें सांगितलेंच आहे. तो **जिं**जीस गेला त्या वेळीं त्याचेबरोबर **प्र**ल्हाद **नि**राजी, **सं**ताजी **घो**रपडे, **खं**डेराव **दा**भाडे, **ध**नाजी **जा**धव, **खं**डो बल्लाळ अशीं एकंदर २१ मनुष्यें होतीं. परंतु **जिं**जीस जाण्याचे अगोदर त्यानें **प्र**ल्हाद **नि**राजीचे सल्ल्यानें **नि**ळोपंत **पिं**गळे यास **पे**शवे पद देऊन, **रा**मचंद्रपंत **भु**तकर यास हुकमतपन्हा हें पद दिलें, व त्यांच्याकडे **वि**शाळगड, **रां**गणा आदिकरून जे मराठ्यांचे किल्ले होते त्यांच्या बंदोबस्ताचें काम सांगितलें. **म**हादजी **ना**ईक **पा**नसंबळ यास सेनापतीचा अधिकार दिला. **को**कणांत **सि**धोजी **गु**जर, व **का**न्होजी **आं**ग्रे यांस आरमाराचें काम सांगितलें. **रा**जाराम **जिं**जीस गेल्यावर त्याच्याजवळ हळू हळू पुष्कळ फौज जमली. नंतर **ध**नाजी **जा**धव व **सं**ताजी **घो**रपडे यांजबरोबर बरीच फौज देऊन त्यानें त्यांस **म**हाराष्ट्र देशांत **मों**गलांस त्रास देण्याकरतां व लुटालूट करण्याकरतां पाठवून दिलें.

मध्यंतरीं **मों**गलांनीं **मि**रज, **प**न्हाळा वगैरे बरेच मराठ्यांचे किल्ले घेतले. **औ**रंगजेबाच्या मनांत मराठ्यांचीं पाळेंमुळें खणून काढावयाचीं होतीं. **रा**जाराम **जिं**जीस आहे ही बातमी त्याला लागतांच त्यानें **झु**लपिकारखानाबरोबर मोठें सैन्य देऊन त्यास **जिं**जीस वेढा घालण्याकरतां पाठवून दिलें.

---

१ एथें बखरींतील भाषा कायम ठेविली आहे.

मोंगलांची वरीच फौज तिकडे कर्नाटकांत जिंजी घेण्याच्या कामांत गुतली होती यामुळें इकडे महाराष्ट्रांत मराठ्यांचें चांगलें साधलें. धनाजी व संताजी हे रामचंद्रपंतास येऊन मिळाले. त्यांनीं मोंगलांच्या ठाण्यांवर वारंवार हल्ले करून त्यांची वरीच दुर्दशा करून टाकली. रामचंद्रपंताचा कारकून शंकराजी नारायण यानें सन १६९२ त राजगड मोंगलांपासून परत घेतला. नंतर राजारामानें त्याच्या मर्दुमकीबद्दल त्यास सचिव ही पदवी देऊन तो किल्ला व वांई आदिकरून तिकडील मुलूख त्याच्या ताब्यांत देऊन त्याच्या बंदोबस्ताचें काम त्यालाच सांगितलें. नंतर मराठ्यांनीं पन्हाळा, मिरज वगैरे आपले किल्ले मोंगलांपासून परत जिंकून घेतले, व संताजी व धनाजी हे बरोबर बरेंच सैन्य घेऊन गोदातीरीं मोंगलांचा मुलूख लुटण्याकरतां निघून गेले. औरंगजेबानें आपलें सैन्य त्यांच्यावर पाठविलें, परंतु त्यांनीं तीन वेळां त्या सैन्याचा पराभव केला, व तो मुलूख लुटून अगदीं उद्वस्त करून टाकला. मराठे अशा रीतीनें उत्तरेकडील मुलखास उपद्रव देऊं लागले, तेव्हां औरंगजेबास मोठी चिंता उत्पन्न झाली. त्यानें आपला मुलगा कामबक्ष याजबरोबर मोठें सैन्य देऊन त्याला जिंजी घेण्याकरतां पाठवून दिलें. ह्यामध्यें बादशाहाचा हेतु असा होता कीं, जिंजी आपण लवकर घेतली ह्मणजे तिकडे गुंतलेलें आपलें सैन्य मोकळें होईल व नंतर मराठ्यांचा सूड घेण्याला बरें पडेल.

पूर्वीं जिंजी सर करण्याचें काम झुलपिकारखान यास सांगितलें होतें, परंतु कामबक्ष यास आपल्याजागीं बादशाहानें नेमिलें असें जेव्हां त्याला कळलें, तेव्हां बादशाहानें हा आपला अपमान केला असें त्यास वाटून त्याला त्याबद्दल फार खेद झाला. त्यानें कामबक्षाची खोड मोडण्याकरितां अंतून गुप्त रीतीनें मराठ्यांशीं तह केला, व कामबक्षाचे सर्व बेत हाणून पाडण्याचा निश्चय केला. ह्या वेळीं औरंगजेबाची छावणी भीमेच्या कांठीं ब्रह्मपुरी येथें होती.

संताजी घोरपडे यानें महाराष्ट्रांत अगदीं कहर करून दिला होता.

त्याला जेव्हां ही गोष्ट कळली तेव्हां त्यानें **औ**रंगजेबाचें थोरलें लष्कर पूर्वेकडे टाकिलें व तो **सा**ताऱ्यावरून एकदम **क**र्नाटकांत उतरला. त्यानें अकस्मात् **जिं**जीस येऊन मोंगलांवर हल्ला करून त्यांची दाणादाण उडवून दिली. **का**मबक्ष यानें तहाचें बोलणें लाविलें. परंतु **औ**रंगजेबास तह करणें ही गोष्ट मुळींच पसंत पडली नाहीं. त्यानें **का**मबक्ष यास परत बोलावून पुनः **झु**लपिकारखानासच त्याचें काम सांगितलें. ह्या वेळीं **औ**रंगजेबाची छावणी **वि**जापुराकडे होती.

**झु**लपिकारखानानें वेढ्याचें काम सुरू केलें; परंतु मराठ्यांचें व त्याचें आंतून एक असल्यामुळें त्यानें तें काम आळसत आळसत चालविलें होतें. **औ**रंगजेबासारख्या दूरदृष्टि बादशाहापुढें हें ढोंग फार दिवस चालणें कठीण होतें हें **खा**न जाणून होता, व आपण आतां **जिं**जी घेतली नाहीं तर दरबारीं आपलें महत्त्व रहाणार नाहीं असें त्यास वाटलें. त्यानें **रा**जारामास पळून जाण्याविषयीं सांगितलें, व हें शेवटलें स्नेहाचें कृत्य करून त्यानें वेढ्याचें काम मोठ्या सपाट्यानें चालविलें, व थोडक्याच दिवसांत ह्मणजे इ० स० १६९८ च्या जानेवारी महिन्यांत तो किल्ला घेतला.

**रा**जाराम **जिं**जीहून निघाला तो इ० स० १६९७ च्या डिसेंबर महिन्यांत **वि**शाळगडास येऊन तेथून **सा**ताऱ्यास आला, व तेथें राहून सर्व कारभार पाहूं लागला. इ० स० १६९९ त **रा**मचंद्रपंताचे सांगण्यावरून **रा**जारामानें **सा**तारा हें आपलें राजधानीचें शहर केलें. नंतर मोठें सैन्य जमा करून तो **गो**दावरीच्या उत्तरेकडील मोंगलांच्या मुलखावर स्वारी करण्याकरितां निघून गेला. पुढें **औ**रंगजेबानें आपल्या लष्कराचे दोन भाग केले. एका भागावर आपण स्वतः मुख्य झाला व मराठ्यांचे दरोबस्त किल्ले घेण्याकरितां निघाला. दुसऱ्या भागाचें आधिपत्य त्यानें **झु**लपिकारखानास देऊन त्याला जिकडेजिकडे मराठे आढळतील तिकडेतिकडे त्यांच्यावर हल्ला करून त्यांचा नाश करण्याचें काम सांगितलें.

**रा**जारामानें **गो**दावरीच्या उत्तरेकडे स्वारी केली त्या वेळीं त्याला

गंगथडी, वऱ्हाड प्रांत इत्यादि ठिकाणीं जे मराठे सरदार तिकडील मुलखास उपद्रव देत होते ते येऊन मिळाले. त्यांत परसोजी भोंसले, हैबतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे, आटोळे समशेर बहादर वगैरे प्रमुख होते. ह्या प्रसंगीं राजारामाजवळ शिवाजी महाराजांच्या वेळीं होती त्याच्यापेक्षांही ज्यास्त फौज जमा झाली. बादशहाची छावणी त्या वेळीं औरंगाबादेस होती. तेव्हां एकवार त्याच्या छावणीवर छापा घालून शाहूला मुक्त करण्याचा प्रयत्न करावा असा त्यानें निश्चय केला. त्यानें आपणाबरोबर एकंदर ९०००० फौज घेतली, व तो परत साताऱ्यास आला. नंतर तेथून सिंहगडास गेला; व मग राहोरीबोरीवरून पुणतांब्याजवळ गंगानदी उतरून औरंगाबादेजवळ खंडोबाचें सातारें एथें त्यानें आपल्या सैन्याचा तळ दिला. मोंगलांचें सैन्य ह्या वेळीं इतकें धुंदींत होतें कीं, मराठे इतके नजीक येऊन ठेपले याची त्यांस दादही नव्हती! दुसऱ्या दिवशीं रात्रीस राजारामानें एकदम मोंगलांच्या छावणीवर छापा घातला. मोंगल लोक अगदीं बेसावध होते, तेव्हां हें अरिष्ट पहातांच ते सैरावैरा रानोमाळ पळत सुटले. मराठ्यांनीं मोंगल लोकांच्या सैन्याची अगदीं दाणादाण उडवून दिली, व बादशाहाचा खजिना लुटला. परंतु ह्या छाप्याचा जो मूळ उद्देश तो सिद्धीस गेला नाहीं. याचें कारण असें झालें कीं, त्या दिवशीं बेगमेनें बादशाहास मेजवानी दिली होती, यामुळें बादशाहा शाहूस बरोबर घेऊन बेगमेचे गोटांत गेला होता. आपला हेतु सिद्धीस गेला नाहीं ह्मणून राजारामास फार वाईट वाटलें; पण उपयोग काय? नंतर राजाराम औरंगाबादेहून निघाला तो गंगथडींत शिरला व तेथें त्यानें आपले चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल केले. वाटेनें ज्या ज्या ठिकाणीं त्यास मोंगलांच्या टोळ्या भेटत त्या त्या ठिकाणीं त्यानें त्यांचा पराभव केला व

---

१ का० सं०-( शाहू महाराज यांचें चरित्र. ) २ छावणीपासून बरेच अंतरावर बादशाहा आपला जनानखाना ठेवीत असे, व ह्या गोष्टीमुळेंच त्या दिवशीं तो वांचला.

त्यांस पिटाळून लाविलें. त्यानें नांदेड, वऱ्हाड, खानदेश वगैरे मुल्ख अगदीं उजाड करून टाकला. त्यानें परत येतांना बागलाण मुलखाचा वसूल आणण्याकरतां खंडेराव दाभाडे यास तेथेंच ठेविलें, नेमाजी शिंदे यास खानदेशांत ठेविलें, परसोजी भोंसले यास वऱ्हाडांत ठेविलें, व हैबतराव निंबाळकर यास गंगथडींत ठेविलें. नंतर तो जालना शहरास आला व त्यानें तें शहर लुटून जाळून टाकलें. इतक्यांत झुलपिकारखान त्याच्यावर येऊन पडला. त्यानें मराठ्यांवर हल्ला करून त्यांस पिटाळून लाविलें, व राजारामाचा पाठलाग सुरू केला. राजारामाच्या मागून झुलपिकारखान लगट करून येत होता तरी त्यानें वाटेनें आंबेड, पैठण, बीड वगैरे शहरें लुटलीं, व बादशाहाचा मुल्ख जाळीत पोळीत तो पुण्यास येऊन पोहोंचला.

ह्या वेळीं धनाजी जाधव, सिदोजी निंबाळकर, परसोजी भोंसले वगैरे सरदारांच्या हाताखालीं एकंदर ६०००० फौज होती. शिवाय मराठ्यांची फिरती फौज सुमारें २०००० होती. त्यांनीं मोंगलांच्या मुलखावर हल्ला करून खंडण्या घ्याव्या, लूट करावी, बादशाहाचे छावणीवर छापे घालावे, त्याचे हत्ती, घोडे, उंट धरून न्यावे, धान्यसामग्री चोरावी, बादशाहाचीं ठाणीं उठवावीं व त्याचा खजिना मधल्यामध्येंच लुटावा. अशा रीतीनें त्यांनीं त्याला अगदीं जेरीस आणिल. मराठ्यांची फौज चोहोंकडे पसरली होती, कांहीं साताऱ्याकडे होती, कांहीं कर्नाटकांत होती, कांहीं देवगड, बागलाण वगैरे प्रांतांत होती. यामुळें बादशाहास मराठ्यांच्या फौजेचा कांहींच ठिकाण लागेना, व त्यांचा मोड कोणत्या तऱ्हेनें करावा त्याची कांहींच युक्ति सुचेना. धनाजी जाधव याची तर मोंगलांस इतकी जरब बसली होती कीं, तो त्यांना ध्यानीं मनीं स्वप्नीं काळासारखा वाटूं लागला! एखादे वेळीं मोंगलांनीं आपले घोडे पाण्यावर नेले, व त्यांपैकीं एखादा पाणी प्याला नाहीं तर त्यांनीं त्याला ह्मणावें, "क्यौं बेटा, पानी क्यौं नहीं पीते, उसमें धनाजी नजर आता

है ? कैसा क्या ?" अशा रीतीनें मराठ्यांनीं मोंगलांस अगदीं जेरीस आणलें होतें. इतकें झालें तरी औरंगजेब काडीइतका डगमगला नाहीं, व मराठ्यांना जिंकण्याचा त्याचा निश्चय त्यानें ढळूं दिला नाहीं. त्यानें मराठ्यांचे बहुतेक किल्ले घेतले, व मराठ्यांकडे काय ते सह्याद्रींतील थोडेसे किल्ले राहिले. इतकें झालें तरी त्याला मराठ्यांचा समूळ नाश करतां आला नाहीं, व ते दिवसेंदिवस ज्यास्तच जोरावत चालले. तेव्हां औरंगजेबास आतां पुढें काय करावें हें कांहींच सुचेना. त्या वेळीं बादशाहाच्या वजिरानें त्यास विनंति केली कीं, " हजरत पॅन्हा[1], मराठे लोक कैजाखी[2], बहुत नेकजात[3], एकदील. ज्याचें निमक[4] खातात त्याची चाकरी हलाल[5] करितात. आज पंधरा सोळा वर्षें खुदावंत त्यांची खामी[6] करितात तरी ते मोडत नाहींत, यास्तव तह करून चाकर असें ठरवून चाकरी घ्यावी. कर्नाटकचा बंदोबस्त करतील. मोठमोठे ठिकाणीं आपले सरदार सुभे करून ठेवावे. हे व ते मिळून दक्षिण साडेसहा सुभेचा बंदोबस्त करतील. साहेबीं असें करवावें. दिल्लीहून येऊन बहुत वर्षें जहालीं, दिल्लीस स्वारी जावी." हें ऐकून बादशाहा बोलला कीं, "फार चांगलें बोलतां. आमच्या मनांत नाहीं असें आहे कीं काय ? शिवाजीपासोन आह्मी उद्योग करीत आहों. ह्मराठी यांनीं चाकर ह्मणवावें, यांचें राज्य राखावें, यांच्या हातून चाकरी घ्यावी असा आमचा इरादा. परंतु ते चाकर ह्मणवीत नाहींत सबब त्यांचें पारिपत्य करावें, असा आरंभ केला. संभाजी राजे मारले, संभाजीचा बेटा शाहू आह्मांजवळ आहे. दौलत दरोबस्त बुडविली असतां संभाजीचा भाऊ राजाराम यांनीं पुन्हा दौलत मिळवून फंद करीत आहेत. त्याजकरितां तुह्मीं त्यांचें पारिपत्य करावें, आणि शाहूची स्थापना करून त्याच्या हातून चाकरी घेऊं. नाहीं तर राजाराम याशीं तह करून त्यांनीं

---

१ सरकार, खावंद. २ लढाऊ. ३ प्रामाणिक, सचोटीचे. ४ मीठ, अन्न. ५ नेकीनें. ६ नाश.

चाकरी करावी. शाहू व ते एकरूप होऊन आह्मांशीं सरळ चालावें. याप्रमाणें करावें.[1]"

नंतर बादशाहाच्या हुकमाप्रमाणें तह करण्याच्या संबंधानें निरोप आला. त्यावर धनाजी जाधव यानें उत्तर सांगून पाठविलें कीं, "चाकर ह्मणवावयाचें नाहीं. तथापि तुमची मर्जी, तर शिवाजी राजे आमचे तुह्मांपाशीं आहेत तेच आमचे आह्मांकडे पाठवावे. ते व आह्मीं एकत्र होऊन याचा विचार करून सांगूं." हा मजकूर वजिरानें बादशाहास सांगतांच त्याला अतिशय राग आला. त्यानें तत्काळ राजारामाबरोबर लढाई सुरू करून त्याचें पारिपत्य करावें ह्मणून हुकूम दिला.[2]

मागें सांगितल्याप्रमाणें राजाराम पुण्यास आल्यावर त्या ठिकाणीं तो कांहीं दिवस स्वस्थ बसला होता. नंतर तो सिंहगडास निघून गेला. त्या ठिकाणीं त्याला नवज्वर होऊन तो इ० स० १७०० त मरण पावला.[3]

राजाराम शूर होता, परंतु मुलकी कारभाराचें चातुर्य त्याच्या अंगीं कमी होतें. त्यानें सर्व काम प्रल्हाद निराजीवर सोंपविलें होतें, व तोच मनुष्य त्या कामाला योग्य होता. राजाराम दयाळू व उदार होता. परंतु संताजी घोरपडे यास घालवून दिलें ही गोष्ट त्याच्या कारकीर्दींत फार वाईट घडली.[4]

---

१ एथें मूळ बखरींतील भाषा कायम ठेविली आहे. २ मराठ्यांचें हें शिरजोरपणाचें बोलणें ऐकून बादशाहानें तहाचें बोलणें तहकुब केलें. या वेळीं दक्षिणच्या साडेसहा सुभ्यांची सरदेशमुखी मराठ्यांस देऊन त्यांस आपले अंकित म्हणून ठेवावें असा औरंगजेबाचा मनसुबा होता.—काफी खान व ग्रांटडफ. ३ झुलपिकारखान पाठीस लागल्यामुळें राजारामास दौड फार पडली यामुळें त्याचें फुप्फुस सुजून तोंडावाटे रक्त पडूं लागलें होतें. तो एक महिनाभर दुखणेकरी होता असें ग्रांटडफ म्हणतो. ४. संताजी घोरपडे याचें व राजारामाचें नीट नव्हतें, तथापि प्रल्हाद निराजी जिवंत होता तोंपर्यंत संताजीच मराठे सरदारांत प्रमुख होता. पुढें धनाजीचें व त्याचें वांकडें आलें तेव्हां राजारामानें धनाजीचा पक्ष स्वीकारून संताजीला हांकून लाविलें. संताजी भटकत फिरत असतां त्याचा हाडवैरी ह्मसवडचा देशमुख नागोजी माने यानें तो एका ओढ्यांत स्नान करीत असतां त्याचें डोकें कापलें. (इ० स० १६९८)—का० सं०

त्याच्या मरणाचें वर्तमान **औ**रंगजेबाच्या छावणींत कळलें त्या वेळीं मोंगलांना मोठा आनंद झाला, व आतां मराठ्यांस आपण हां हां ह्मणतां जिंकूं असें त्यांस वाटूं लागलें. परंतु हा त्यांचा निवळ भ्रम होता हें पुढील हकीकतीवरून दिसून येईल.

**रा**जाराम वारला त्या वेळीं **औ**रंगजेबानें **सा**तारच्या किल्ल्यास वेढा दिला होता. **प्र**यागजी **प्र**भू ह्यानें तो किल्ला मोंगलांबरोबर पुष्कळ महिने लढविला. मोंगलांनीं किल्ला घेण्याकरतां होते तेवढे प्रयत्न केले, सुरुंग तर लावले, वारंवार हल्ले तर केले, परंतु **प्र**यागजीनें त्यांचें कांहीं चालूं दिलें नाहीं. शेवटीं किल्ल्यांत अन्नपाण्याचा तोटा पडत चालल्यामुळें **प्र**यागजीनें तो किल्ला **अ**जिमशाहाचे द्वारें मोंगलांस दिला. त्यावरून **औ**रंगजेबानें त्या किल्ल्याचें नांव **अ**जिमतारा असें ठेविलें.

**रा**जारामाचे मृत्यूचें वर्तमान **शा**हूला कळलें त्या वेळीं त्याला अतोनात दुःख झालें. केव्हां ना केव्हां तरी **रा**जाराम आपली सुटका करील असें त्यास वाटत होतें. परंतु या अकल्पित मृत्यूमुळें त्याची ती आशा समूळ नष्ट झाली. आतां मराठ्यांचें राज्य खात्रीनें विलयाला जाणार, आपणास शेवटपर्यंत या मोंगलांच्या अटकेंत रहावें लागणार, व अशा दुःखद स्थितींतच आपला अंत होणार, असे नानाप्रकारचे विचार त्याच्या मनांत घोळूं लागले, व त्यामुळें त्याच्या चित्ताची स्वस्थता नाहींशी झाली. त्यामुळें शेवटीं **शा**हूला मोठा ताप येऊं लागला. ताप दिवसेंदिवस ज्यास्त वाढत चालला यामुळें **ये**सूबाई व **बे**गमसाहेब फारच घाबरल्या; **बे**गम तर **शा**हूचा बिछाना सोडीनाशी झाली, व आपल्या मुलाला देवानें लवकर गुण पाडावा ह्मणून ती रात्रंदिवस त्याची करुणा भाकूं लागली. बादशाहाला ही गोष्ट कळली तेव्हां त्यालाही फार वाईट वाटलें. तो **शा**हूच्या समाचाराला गेला. त्यानें जवळ बसून त्याच्या अंगावरून हात फिरविला. तो त्यास ह्मणाला, "तुमारा चिच्या मरगया उसवास्ते तबियत बिघड गयी, आजार हुवा?" **शा**हूनें उत्तर केलें, "[1]आमचा बाप, चिच्या आबू खुदावंत, दुसरें

१ एथें मुळांतील मजकूर तशाचा तसा घेतला आहे.

कोणी नाहीं. ते जर आमचे काका असते तर आमचा कबिला[1] रायगडीं ठेवून कां जाते?" बादशाहा ह्मणाला, "अच्छा, तुम चिंता मत् करो. दखनमें सब चोर, तुम साहू, तुमारा राज्य तुमकूं देऊंगा. तुम हमारे बेटीके बेटे हो, कुच फिकीर मत् करो."

अशा तऱ्हेनें शाहूचें समाधान करून बादशाहा आपल्या मुलीस ह्मणाला, "आपके बेटेकूं जलदी अच्छा करना." असें बोलून तो निघून गेला. पुढें चांगले औषधी उपचार केल्यामुळें व बेगमेच्या सुश्रूषेमुळें शाहूस लवकरच गुण पडत चालला, व तो थोडक्याच दिवसांत चांगला बरा झाला. पुढें शाहूनें भक्ताजी हुजरे[2] याच्या बरोबर पत्रें[3] पाठविलें तें येणेंप्रमाणें:—"उभयतां आईसाहेबांचे[4] पायांवर डोई ठेविली, आणि उभयतां बंधूंस[5] आशीर्वाद सांगावा. काकांचे ठिकाणीं तुह्मी आहां. सर्व कार्यकर्ते मोठमोठे त्यांस तुह्मी काकासाहेबच आहां. काकासाहेबांचे मागें आपण लढाई[6] केली हें वर्तमान कळून बहुत संतोष झाला. काकासाहेबांचे व थोरले महाराजांचे पुण्यें यश आलेंसें खचित वाटलें. आह्मांस नेण्याचा उद्योग करीतच आहांत. श्रीइच्छेनें घडेल तो सुदिन. तथापि काकासाहेब यांनीं राज्य रक्षण केलें तें आपण करावें. श्रीकृपें सुदिवस प्राप्त होईल." हें पत्र मराठी दरबारांत आलें त्या वेळीं सर्वांनीं शाहूची फार स्तुति केली, व अशा प्रकारचा आपला सद्गुणी राजा आज मोंगलांचे अटकेंत आहे असें पाहून त्यांस अतोनात दुःख झालें.

राजारामाचे पाठीमागें त्याची थोरली बायको ताराबाई हिनें रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण सचिव, धनाजी जाधव सेनापति वगैरे मंडळीस अनुकूल करून घेऊन त्यांच्या विचारानें आपला मुलगा शिवाजी यास गादीवर बसविलें; व राजसबाई व तिचा मु-

१ कुटुंबांतील मनुष्यें. २ राजारामानें गुप्त हेर ठेविले होते त्यांपैकीं एक. ३ हें पत्र बहुधा रामचंद्रपंत अमात्य याला लिहिलें असावें. ४ ताराबाई व सोयराबाई. ५ शिवाजी व संभाजी. ६ ही कोणती लढाई तें कळत नाहीं. ७ एथें मूळबखरींतील मजकूर कायम ठेविला आहे.

लगा संभाजी ( याचें वय या वेळीं फक्त ३ वर्षांचें होतें ) यांस कैदेंत ठेविलें. शिवाजीचें वय तरी १० वर्षांचेंच होतें. ह्मणून राज्याचा सर्व कारभार स्वतः ताराबाई पाहूं लागली. ताराबाई ही एके ठिकाणीं स्थाइक न राहतां आलटूनपालटून निरनिराळ्या किल्ल्यांत राहून राज्यकारभार पहात असे.

ह्या वेळीं शाहूचें वय १७।१८ वर्षांचें होतें. तेव्हां बेगमेनें त्याच्या लग्नाविषयीं औरंगेजबाजवळ गोष्ट काढली. त्यास बादशाहानें रुकार देऊन जोत्याजी केसरकर व मोरोपंत सबनिस यांस उच्च प्रतीच्या मराठ्यांच्या घराण्यांतील दोन मुली पाहण्यास सांगितलें. त्यांनीं दोन मुली पसंत करून त्याची वर्दी बादशाहास दिली. एक रुस्तुमराव जाधव याची कन्या अंबिकाबाई, व दुसरी कण्हेरखेडचे शिंदे यांची कन्या सावित्रीबाई. लग्नसमारंभ मोठ्या थाटाचा झाला व बादशाहानें अतोनात पैसा खर्च केला. पुढें बादशाहानें शाहूस पत्नीसह आपल्या भेटीस बोलाविलें. येसूबाईला ती गोष्ट समजली तेव्हां मोठें संकट येऊन पडलें; कारण उच्च प्रतीच्या मराठ्यांच्या बायका नेहमीं पडदपोशींत असतात, व आपल्या बायका दुसऱ्याच्या नजरेस पडणें ही गोष्ट मोठी लांछनाची आहे असें ते समजतात. अजूनही हा मराठमोळा मराठे लोकांत बराच दृष्टीस पडतो. असो, तेव्हां ह्या प्रकारचें संकट येसूबाईवर येऊन पडलें. तिनें तें सर्व वर्तमान बेगमेस सांगितलें. नंतर त्या दोघींनीं मिळून त्या संकटांतून पार पडण्याची निराळीच युक्ति काढिली. ती अशी कीं, शिंदे यांनीं आपल्या मुलीस ज्या दासी आंदण दिल्या होत्या त्यांपैकीं अत्यंत सुरेख अशी एक दासी त्यांनीं निवडून काढिली, व तिच्या अंगावर चांगले दागदागिने घालून तिला नवरीसारखी सजवली, आणि तिला व शाहूला बादशाहाचे दर्शनास पाठवून दिलें. बादशाहा त्यांना पाहून खुष झाला, व त्या दोघांस आपल्या शेजारीं बसवून तो शाहूस ह्मणालाः—“राजे, तुमचे आजे शिवाजी, वडील संभाजी, यांचें आमचें तर हाडवैर. असें असून तुह्मी कोणत्याही तऱ्हेनें फंदफितूर न

करतां आमच्याशीं मोठ्या नेकीनें चालतां, व 'माझें मोठें राज्य आहे' वगैरे कांहींच विचार तुमचे मनांत येत नाहींत हें पाहून माझे मनाला फार संतोष होत आहे." असें ह्मणून त्यानें त्या दोघांच्या मस्तकीं आपला वरदहस्त ठेविला, व "तुमचें राज्य तुह्मी उभयतां बहुत दिवस कराल" असा त्यांस आशीर्वाद दिला. त्याच वेळीं बादशाहानें **शाहूस** **अक्कलकोट**, **इंदापूर**, **सुपें**, **बारामती** व **नेवासें** या पांच परगण्यांची जहागीर करून दिली, व एक सोन्याची तरवार, **शिवाजीची** भवानी तरवार, व **अफजुलखानाची** तरवार अशा तीन तरवारी बक्षिस दिल्या.[1] ह्यामुळें **शाहूला** फार आनंद झाला, व तेव्हांपासून त्या दासीवर[2] त्याची विशेष मर्जी बसली, आणि आपल्या दोन्ही राण्यांपेक्षांही तो तिच्यावर विशेष ममता करीत असे.

**औरंगजेब** आपल्या निश्चयाप्रमाणें मराठ्यांचे किल्ले घेत चाललाच होता, व लवकरच त्यानें त्यांचे बहुतेक किल्ले घेतले. मराठ्यांनींही त्यास बराच अडथळा केला, व त्याचें अतोनात नुकसान केलें; कारण कांहीं कांहीं बिकट किल्ले घेत असतां त्याचे पुष्कळ शूर सरदार व शिपाई पडले.

ज्या वेळीं **औरंजेब** आपल्या **दक्षिणेंतील** **मोहिमेकरतां** **दिल्ली** सोडून **नर्मदानदी** उतरला त्या वेळीं त्याचें वय ६५ वर्षांचें होतें, व जेव्हां तो **ब्रह्मपुरी** एथील छावणींतून मराठ्यांचे किल्ले घेण्याकरतां निघाला त्या वेळीं त्याचें वय ८१ वर्षांचें होतें. अशा वयांत जातीनें जाऊन वेढे देणें, लढाईची व्यवस्था पाहणें, कूच करणें, ह्या गोष्टी फार कठीण होत्या. अशा दगदगीमुळें एखादा तरुण जवानही थकून गेला असता. परंतु **औरंगजेब** एवढा वृद्ध झाला असून त्यानें तें काम मोठ्या दक्षतेनें चालविलें, ह्याबद्दल त्याची तारीफ करावी

---

१ **ग्रांटडफ.** ह्या तरवारींपैकीं **शिवाजीची** भवानी तरवार व **अफजुलखानाची** तरवार ह्या **झुलपिकारखानें** **रायगड** घेतला त्या वेळीं आणलेल्या होत्या.

२ हिचें नांव **विरूबाई** असें होतें.—**काव्येतिहाससंग्रह.**

तितकी थोडीच आहे. परंतु त्याच्या कारकीर्दीच्या अखेर अखेर त्याच्या राज्यांत चोहोंकडे बखेडे उत्पन्न झाले; व ते नाहींतसे करण्याकरतां त्यानें जे जे उपाय योजिले त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. वर उत्तरहिंदुस्थानांत रजपूत, शीख, जाट वगैरे लोक बळावत चालले होते, व ते उघड उघड मोंगलांचें स्वामित्व झुगारून देऊं लागले. बादशाहाची फौज कमी कमी होत चालली. मोंगलांची फौज जसजशी कमी होत चालली तसतसे मराठे ज्यास्त प्रबळ होत चालले. ते सर्व दक्षिणभर पसरले व मोंगलांचा मुलूख जाळूंपोळूं लागले. त्यांनीं गुजराथेपर्यंत[१] आपल्या स्वाऱ्यांचा धडाका चालविला, व वाटेनें प्रांतचे प्रांत लुटून सर्व प्रदेश उद्वस्त करून टाकला.

औरंगजेबाची प्रचंड सेना अद्याप किल्ले घेत चाललीच होती. बादशाहाला शेवटचा जय कर्नाटकांत वाकिनखेडें एथें मिळाला. परंतु हा जो त्याला जय मिळाला त्याला जय न ह्मणतां 'अपशकुन' ह्मटलें तर फार चांगलें. कारण ह्या वेळेपासून औरंगजेबाच्या सद्दीचा ओघ फिरला व त्याच्या राज्यास उतरती कळा लागली. मराठे हळू हळू डोकें वर उचलूं लागले. रामचंद्रपंत अमात्य यानें पन्हाळा व पावनगड हे किल्ले मोंगलांपासून परत घेतले, व परशुराम त्रिंबक यानें सातारा व वसंतगड हे किल्ले सर केले. ह्या वेळेपासून ताराबाई पन्हाळ्यावर राहूं लागली. जे किल्ले औरंगजेबानें लाखों मनुष्यांच्या प्राणांची आहुती देऊन घेतले होते ते किल्ले मराठे लोक एकामागून एक घेत चालले. जसजशी औरंगजेबास सैन्याची आवश्यकता ज्यास्त पडूं लागली तसतसें तें कमी होत चाललें, व जे लोक सैन्यांत होते ते लढाईची होतां होईल तितकी टाळाटाळ करूं लागले. अशा स्थितींत कसें तरी करून एकदा अहमदनगरास जाऊन पोहोंचावें अशा उद्देशानें औरंगजेब तिकडे जाण्यास परत फिरला. वाटेनें जात असतां त्याचा खजिना रिता पडला, व संपूर्ण देश उद्वस्त झाल्यामुळें त्याच्या सैन्यास धान्यही मिळेनासें झालें. त्यानें कदाचित्

१ ह्या वेळीं गुजराथेंत खंडेराव दाभाडे हा होता.

दिल्लीहून खजिना मागविलाच तर मराठे त्यावर मध्येंच छापा घालून तो पळवून नेत. जसजशी पैशाची तूट पडत चालली तसतसा त्याच्या सैन्यांत ज्यास्त गोंधळ माजत चालला. फौजेच्या पगाराची बाकी थकली व ते लोक पगाराकरतां बादशाहास वारंवार त्रास देऊं लागले. त्यांना पाहिलें ह्मणजे बादशाहाचा अतिशय संताप होई व त्यांनीं पगार मागितला ह्मणजे कपाळाला आंठ्या घालून तो त्यांना उत्तर देई कीं, "मला लष्कराची गरज नाहीं, याकरतां चाकरी करण्याची तुमची खुषी नसेल तर तुह्मीं खुशाल निघून जावें." शिवाय ही हाकाहाक कमी व्हावी ह्मणून त्यानें आपण होऊन आपले बरेच लोक कमी केले. फौजेंतील लोकांस नियमित पगार मिळणें अवश्य आहे, व तो जेव्हां त्यांस मिळेनासा झाला तेव्हां ते उघड बंडावा करूं लागले. बादशाहा ह्या सर्व गोष्टींमुळें अतिशय त्रासून गेला. एकदां तर त्यानें झुलपिकारखानास असें लिहिलें कीं, "या चांडाळ पायदळाच्या लोकांच्या गोंगाटानें माझे कान किटून गेले. कावळ्यांच्या घरट्यांत कोणी शत्रु आला असतां जसे ते कावकाव करूं लागतात त्याप्रमाणें हे ओरडत आहेत."[१] पुढें जवळ जें काय होतें तें मोडून तोडून त्यानें सैन्याची थोडीशी थावराथावर केली.

मराठे औरंगजेबाच्या पाठीवर होतेच. जसजसे ते बादशाहाच्या फौजेशीं लगट करूं लागले तसतशा त्याच्या अडचणी वाढत चालल्या. मराठे केव्हां केव्हां त्याच्या छावणीच्या हद्दीपर्यंत मुलूख लुटीत व त्याची धान्यसामग्री पळवीत, त्याचे हत्ती, उंट, घोडे धरून नेत, व दाणा वैरण वगैरे आणण्याकरतां एखादी टोळी गेली तर तिची कत्तल करीत. औरंगजेबानें जर त्यांच्यावर एखादी मोठी टोळी पाठविली तर ते एकदम नाहींतसे होत व त्यांचा पाठलाग करीत करीत मोंगलांचें सैन्य चोहोंकडे पसरलें ह्मणजे एकदम पुढें येऊन त्यास कापून काढीत. या वेळीं बादशाहा इतका जेरीस आला होता कीं, त्यानें आपला पुत्र कामबक्ष याच्या सांगण्यावरून मराठे लोकांशीं तहाचें बो-

---

१ एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाचा इतिहास.

लणें लाविलें. पण त्या वेळीं मराठ्यांचीं अचाट मागणीं व औद्धत्य हीं आड आल्यामुळें तें तहाचें प्रकरण फिसकटलें. तसें झालें नसतें तर त्या वेळीं शाहूस मुक्त करून आपल्या अब्रूच्या बचावाकरतां मराठ्यांस दक्षिणेंतील जमाबंदीवर शेंकडा कांहीं टक्के देण्यास तो कबूल झाला[1] असता. शेवटीं औरंगजेब मोठ्या प्रयासानें अहमदनगरास येऊन पोहोंचला. हें त्याचें शेवटचें युद्धकृत्य. त्याचे ओझ्याचे बैल थकून गेले होते, व त्याच्या लष्करचे लोक हतवीर्य झाले होते; यामुळें एवढें मोठें लटांबर त्यानें कसें परत नेलें याचेंच मोठें आश्चर्य वाटतें! वाटेनें त्याचे सर्व लोक अस्ताव्यस्त होऊन वाईवाईनें पळत चालले होते. मराठ्यांचे बर्कंदाज लोक त्यांवर एकसारख्या गोळ्या टाकीतच होते, व भालेवाल्या लोकांनीं भाले मारून त्यांच्यापैकीं पुष्कळ लोक ठार मारले. बादशाहास मराठ्यांची इतकी दहशत बसली कीं, मराठे लोक आपणावर हल्ला करून खात्रीनें आपला फडशा पाडणार असें त्यास वाटूं लागलें, व त्याच्या लष्कराच्या एका भागाची खरोखरच तशी अवस्था झाली होती. ज्या मराठ्यांचा समूळ नाश करावयाचा बेत कांहीं वर्षांपूर्वीं त्याच्या मनांत घोळत होता, त्यांच्याच हातून आपण आतां कसे सुटतों असें त्यास होऊन गेलें! परंतु इतक्याही संकटांतून निभावून तो अहमदनगरास सुरक्षित येऊन पोहोंचला.

याप्रमाणें ज्या अहमदनगराहून २० वर्षांपूर्वीं मराठ्यांना जिंकण्याकरतां आपल्या अवाढव्य फौजेसह तो मोठ्या थाटानें व डामडौलानें निघाला होता, त्याच ठिकाणीं त्याचें महत्व छिन्नभिन्न होऊन त्याला परत यावें लागलें, व त्याच ठिकाणीं त्याचें इतिहास-चरित्र संपलें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्याची प्रकृति हळूहळू क्षीण होत चालली. आपल्या मुलांच्या इमानीपणाविषयीं त्याच्या मनांत नेहमीं काळेंबेरें असे. आपल्या बापाची जी आपण स्थिति केली तीच कदाचित् ते आपलीही करतील अशी त्यास मोठी भीति[2] असे.

---

१ एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाचा इतिहास. २ औरंगजेब यानें आपला बाप शहाजहान यास कैद करून राज्य बळकावलें होतें.

ह्या कारणामुळें अंतकाळापूर्वी कांहीं दिवस त्यानें आपल्या मुलांपैकीं कोणालाही जवळ राहूं दिलें नाहीं. मृत्यु समीप येऊन ठेपला तेव्हां तो अगदीं भयभीत झाला, व कृतकर्माचा त्याला मोठा पश्चात्ताप झाला. त्यानें प्रपंचसंबंधी निरवानिरवीच्या गोष्टी सांगणें त्या तुटक तुटक शब्दांनीं बोलून दाखविल्या. तो भावी सुखाविषयीं निराश होऊन आतां काय व्हावयाचें असेल तें होईल असा मनाचा धडा करून खालीं लिहिल्याप्रमाणें निर्वाणीचे शब्द बोलला:—"मीं आपलें जहाज समुद्रांत लोटलें आहे, आतां जें होईल तें होवो!" तो इ० स० १७०७ च्या फेब्रुवारी महिन्यांत मरण पावला.

औरंगजेब ह्मणजे एक कित्ता घेण्यासारखा बादशाहा झाला असें लोकांनीं ह्मणावें अशा रीतीनें तो वागत असे. त्याची घरगुती राहण्याची रीत अगदीं साधी होती. तो कामकाजांत मेहनती असून धर्मसंबंधी आचारविचारांत मोठा कडकडीत असे. तसेंच तो लिहिण्यांत फर्डा असून कुराणांतील निवडक वेंचे त्यास नेहमीं मुखोद्गत असत. त्यानें आपल्या बापाला पदच्युत केलें, भावांला ठार मारलें, व आपल्या हिंदुप्रजेला 'त्राहि त्राहि' करून सोडलें, ह्या गोष्टी जर त्याच्या हातून झाल्या नसत्या तर त्याला कोणत्याही बाबतींत नांव ठेवण्याला जागा उरली नसती. तो मोठा धर्मवेडा असल्यामुळें ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून त्याचीं धर्मसंबंधी मतें स्वीकारिलीं नाहींत त्या सर्वांशीं त्याचें वैर पडलें. त्यानें आपल्या बंधुवर्गास ठार मारल्यामुळें त्याला आपल्या राज्याचा सर्व कारभार परकी लोकांवर सोंपवावा लागला. त्यानें हिंदूंचा जो छळ केला तो ते कधीं विसरले नाहींत. त्याची कारकीर्द संपतांच शीख, रजपूत, मराठे हे सर्व त्याच्या राज्याला चोहोंकडून घेरूं लागले. त्याच्या अंगांत हिंमत होती तोंपर्यंत त्याचे सरदार व प्रतिनिधि त्याच्याशीं प्रायः इमानानें वागले. परंतु तो मेल्यावर त्याच्या मुलांना न जुमानतां ते आपल्या ताब्यांतील मुलखांत बहुधा स्वतंत्र होऊन बसले. मराठे प्रबळ होत चालले होते, यास्तव त्यांचा पूर्ण नाश करी तोंपर्यंत औरंगजेब दक्षिणेंतील स्वतंत्र मुसलमानी राजांच्या वाटेस न जाता

तर त्यांत त्याचा फायदा झाला असता. एखादा अक्कलवान् राजकारस्थानी पुरुष असता तर त्यानें खचितच उत्तरेकडील व दक्षिणेकडील मुसलमान लोकांच्या मधील पूर्वीपासून चालत आलेले तंटे मोडून टाकून दक्षिणेंत फार त्वरेनें बळावत चाललेल्या हिंदु लोकांच्या जमातीशीं लढण्याकरतां मुसलमान लोकांची सर्व फौज एकत्र केली असती. परंतु दक्षिणहिंदुस्थानांतील मुसलमानी राज्यें मोडून तीं दिल्लीच्या राज्यांत सामील करावयाचींच हा औरंगजेबाचा दृढ निश्चय होता. हा निश्चय त्यानें शेवटास नेला खरा, परंतु त्या कामांत त्याचें सैन्य खलास होऊन मोंगलांच्या राज्यावर मराठ्यांचा हात पडतांच त्याचे तुकडे तुकडे होतील अशी त्या राज्याची दशा होऊन गेली होती.

वरील गोष्ट ही औरंगजेबाच्या राजनीतींत अतिशय गैरसमजुतीची व मोठ्या चुकीची होय असें डाक्टर हंटर साहेबांचें मत आहे.

---

# भाग ३.

## मोंगलांच्या कैदेंतून शाहूराजाची मुक्तता व त्याचें साताऱ्यास आगमन व राज्याभिषेक.

**औरंगजेबाच्या मुलांचे गादीविषयीं आपसांत तंटे.—अजीमशाहा शाहूची कैदेंतून मुक्तता करतो.—शाहूच्या वियोगामुळें बेगमेस दुःख होतें.—शाहू दक्षिणेंत येण्यासाठीं निघतो.—बाहादुरशाहास धोलपूरच्या लढाईत जय मिळून तो दिल्लीच्या तक्तावर बसतो.—शाहूचा बऱ्हाणपूर येथें मुक्काम.—मराठ्यांपैकीं बरेच सरदार आपापल्या फौजेनिशीं त्यास येऊन मिळतात.—तो आपले अष्टप्रधान नेमतो.—शाहूच्या आगमनामुळें ताराबाईस वाईट वाटतें.—ती शाहूविषयीं तिच्या पदरच्या सरदारमंडळीच्या मनांत, तो तोतया आहे अशी कुकल्पना भरवून देण्याचा प्रयत्न करते.—शाहू गोदावरीच्या कांठीं तळ देऊन राहतो.—ताराबाई, परशुराम त्रिंबक व धनाजी जाधव यांना शाहूचें पारिपत्य करण्याकरतां पाठवून देते.—खेडकडूस एथपर्यंत शाहू येऊन पोहोंचतो.—अक्कलकोट संस्थानचा मूळपुरुष फत्तेसिंग भोंसले याची मूळ हकीकत.—खेडकडूसच्या लढाईत धनाजी शाहूस मिळतो व परशुराम त्रिंबक पराभव पावून साताऱ्यास पळून जातो.—शाहू चंदनवंदनाजवळ आर्हिंगांव एथें येऊन पोहोंचतो.—परशुराम त्रिंबक सातारचा किल्ला शाहूस देत नाहीं, परंतु शेखमिरा व प्रयागजी प्रभु हे शाहूस अनुकूळ होऊन किल्ला त्याचे हातीं जातो.—तो परशुराम त्रिंबक यास कैद करतो.—बाहादुरशाहा दक्षिणेंत येतो व दक्षिणेच्या सरदेशमुखीची सनद शाहूस देण्याचा त्याचा विचार.—सन १७०८ त शाहूराजास सातारा एथें राज्याभिषेक होतो.**

**औरंगजेब** इ० स० १७०७ त मरण पावला. त्याला **मोअजीम**, **अजीमशाहा** व **कामबक्ष** असे तीन मुलगे होते. बादशाहा मरण पावला त्या वेळीं थोरला मुलगा **मोअजीम** हा **काबुलांत** एका मोठ्या अधिकारावर होता. **अजीमशाहा** याला **माळव्याचा** सुभेदार नेमिलें होतें; परंतु तो बादशाहाच्या जवळच होता; व **कामबक्ष** यास **विजापुरचा** सुभेदार नेमून तिकडे पाठविलें होतें. **औरंगजेब** मरतांच **अजीमशाहा** आपणास बादशाहा असें ह्मणवूं लागला, व **कामबक्ष** यास **दक्षिणेंतील** राज्य देऊं करून त्यास त्यानें आपल्या प-

क्षास अनुकूल करून घेतलें. वास्तविक रीतीनें राज्याचा खरा मालक **मो**अजीम होता. त्यानें लगेच **बा**हादुरशाहा असा किताब घेतला व आपला हक्क स्थापित करण्याकरतां तो तिकडून मोठी फौज घेऊन निघाला. **अ**जिमशाहा हाही **द**क्षिणेंतून मोठी फौज घेऊन निघाला. त्या वेळीं **शा**हूचें सर्व कुटुंब त्याच्या बरोबर होतें. त्यासह तो **न**र्मदा उतरून पलीकडे गेला.

मोंगलांचें लष्कर **द**क्षिणेंतून उठून गेलें ही गोष्ट **ता**राबाई व तिच्या हाताखालील मराठे सरदार यांस मोठी हितावह झाली. **पु**ण्याचा मोंगलांचा सुभेदार **लो**दीखान यास **ध**नाजी **जा**धव यानें जिंकून त्याच्यापासून **चा**कणचा किल्ला घेतला. त्याचप्रमाणें दुसरेही मराठे सरदार मोंगलांच्या मुलखांत धामधूम करूं लागले. **अ**जीमशाहाला हें वर्तमान समजलें त्या वेळीं तो व **झु**लपिकारखान ह्या दोघांनीं अशी मसलत केली कीं, ह्या वेळीं आपण **शा**हूला कैदेंतून मुक्त केलें तर मराठ्यांत आपसांत दुफळी होऊन तंटे माजण्याचा बराच संभव आहे, व तसें झालें ह्मणजे मराठ्यांना मोंगलांच्या मुलखाला उपद्रव देण्याला सवड मिळणार नाहीं. नंतर **शा**हूस बोलावून आणून त्यांनीं त्याच्याशीं असा करार केला कीं, “ तुह्मी आपणास **दि**ल्लीचे बादशाहाचे अंकित असें ह्मणून राज्य करावें, व तुमची आई, भाऊ[१] व बायका यांस आह्मांपाशीं ठेवावें; तसेंच तुह्मीं आपल्या राज्यांत जाऊन राज्याचा बंदोबस्त करावा, व बखेडा करणारे लोकांचें पारिपत्य करावें. बादशाही लक्षांत वागवून बादशाही मुलखास उपद्रव होऊं देऊं नये. तुह्मी याप्रमाणें निखालस वागतां अशी हुजूर खातरजमा झाली ह्मणजे आह्मी **दि**ल्लीस गेल्यावर, व तेथें सिंहासनाधिरूढ झाल्यावर तुमचीं माणसें तुह्मांकडे लावून देऊं; व तुह्मांस सरदेशमुखीचें उत्पन्न सहा सुभ्यांत चालतें याची सनद, त्याचप्रमाणें सहा सुभ्यांची चौथाईची सनद ह्या तुह्मांस देऊं; तसेंच **ब**तनघाट, व **बा**लाघाटावरील महाल **वि**जापूर, **दौ**लताबादचे पादशाहींतील महाल,

१ ह्याचें नांव **म**दनसींग, हा दासीपुत्र होता.–**का**व्येतिहाससंग्रह.

**भी**मा व **गो**दावरी यांच्यामधील निमा मुलूख, ह्यांतील बादशाही अमलांतील ठाणीं, किल्ले, कोटसुद्धां दरोबस्त तुह्मांस बक्षीस करून देऊं. तूर्त 'यांचें राज्य हे बंदोबस्तानें करतील' अशीं पत्रें आमचे सुभ्यांस देण्याकरतां तुह्मांपाशीं देतों. **क**र्नाटक, **गों**डवण, **गु**जराथ, **तं**जावरचें राज्य ह्यांचा अंमल तुमचेकडे चालत आहे तो तुह्मीं तसाच चालवावा; व नेहमीं बादशाहाचे हुकमांत वागून प्रसंग पडेल तेव्हां आपल्या फौजेनिशीं आह्मांस मदत करावी." शाहूनें ह्या सर्व गोष्टी मान्य केल्यावर त्यास जाण्यास आज्ञा दिली. **अ**जीमशाहानें हत्ती, घोडे, व २०० रांगडे स्वार त्याच्याबरोबर दिले, व "वाटेनें ज्यास्त फौज गोळा करीत जावें" असें सांगितलें. **शाहूनें**, **बे**गम व **झु**लपिकारखान यांचा जाण्यास निरोप मागितला, त्या वेळीं त्यांनीं त्याला लवकर निघून जाण्यास सांगितलें. कारण बादशाहास पुनः कोण काय कसें समजावील याचा नेम नव्हता; नंतर बादशाहानें सुभ्यांस देऊं केलेलीं पत्रें आणण्याकरतां **जो**त्याजी **के**सरकर यास पाठीमागें ठेवून, **शाहू**, **मो**रोपंत **स**बनिस, **कृ**ष्णाजी **ना**ईक जोशी व **ग**दाधरभट यांस बरोबर घेऊन निघाला; व **उ**द्धव **यो**गदेव व कांहीं शागीर्दपेशा यांस आपल्या कुटुंबाच्या तैनातीस तेथेंच ठेविलें. त्यानें आपणाबरोबर फक्त **वि**रूबाईस घेतलें. जावयाचे वेळीं **बे**गमेचा निरोप घेण्याकरतां **शाहू** गेला, त्या वेळीं तिला अतिशय आनंद झाला व वाईटही वाटलें. आपला मुलगा आज कैदेंतून सुटून राज्यावर जाणार ह्मणून तिला आनंद झाला, व आज त्याचा आपला शेवटचा वियोग होणार ह्मणून तिला दुःख झालें. तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले, कंठ दाटला व तिच्यानें एक शब्दही बोलवेना. बरोबरच आहे. जिनें आज १८ वर्षें ज्या **शाहू**ला ज-

---

१. **ग्रांट** डफ आदिकरून इतिहासकार इतका मजकूर देत नाहींत. ते फक्त "**शि**वाजीनें घेतलेला **वि**जापूरचा मुलूख व **भी**मा व **गो**दावरी यांचे मधील कांहीं मुलूख" इतकाच काय तो **शाहू**स देऊं केला होता असें म्हणतात. वरील मजकूर **म**ल्हार **रा**मरावकृत **शाहू**महाराजांचे चरित्रांतून घेतला आहे.

न्मदात्या आईहूनही ज्यास्त ममतेनें वागविलें, जो **शाहू** जरा दृष्टीस पडला नाहीं कीं जिचा जीव खालवर व्हावा, ज्याला पाहिल्याबरोबर जिच्या आनंदसमुद्रास भरती यावी, व ज्याला यत्किंचित् दुखणें आलें तर जिच्या काळजानें आपला ठाव सोडावा; त्या **बेग**मेची, तो आपला आवडता मुलगा आज आपणाला दुःखसमुद्रांत लोटून दूर जाणार असें समजल्यावर अशी अवस्था झाली ह्यांत विशेष तें काय ? सरतेशेवटीं **बेग**मेनें आपलें मन घट्ट केलें, व आज आपण याला मोहपाशांत गुंतवून एथें राहवून घेतलें तर पुढें कदाचित् याचें नुकसान होईल, कारण तें पडलें मुसलमानी दरबार, ना दाद, ना फिर्याद, कोणत्या वेळेस काय लहर फिरेल त्याचा कांहीं नियम नाहीं, व पाठीमागून मग दुःख करीत बसावें लागेल त्यापेक्षां आतांच याला निरोप द्यावा हें बरें, असें मनांत आणून, "मातोश्रीविषयीं कांहीं काळजी करूं नये, लवकरच रवानगी करून देवितें" असें सांगून त्यास जाण्यास निरोप दिला.

अशा रीतीनें इ० स० १७०७ मध्यें आपला गादीवरचा हक्क स्थापित करण्याकरतां **शाहू** **द**क्षिणेंत यावयास निघाला; व **अ**जीमशाहा **बा**हादुरशाहाशीं लढण्याकरतां उत्तरेकडे गेला. त्या दोघां बंधूंचीं **आ**ग्र्यापासून कांहीं मैलांवर **धो**[1]लपूर एथें गांठ पडली. नंतर त्या ठिकाणीं मोठी भयंकर लढाई झाली ( सन १७०७ ), व तींत **अ**जीमशाहाचा पराभव होऊन तो व त्याचे दोघे पुत्र पडले. पुढें **बा**हादुरशाहा सन १७०८ त **दि**ल्लीच्या तक्तावर बसला. **झु**लपिकारखान **बा**हादुरशाहास शरण आला, तेव्हां त्याला एक मोठा अधिकार देऊन, **मो**मीनखान ह्मणून त्याचा एक विश्वासु सरदार होता त्यास त्यानें आपली वजिरी दिली. **औ**रंजेबाचा तिसरा पुत्र **का**मबक्ष हा मोठा गर्विष्ठ व व्रात्य होता. तो **बा**हादुरशाहाचा अधिकार कबूल करीना. प्रथमतः **बा**हादुरशाहानें त्यास समजुतीच्या गोष्टी सांगून त्याचें मन वळविण्याचा प्रयत्न केला; परंतु त्याचा कांहीं उपयोग

१ **मा**लेसन.

झाला नाहीं. तेव्हां **बाहादुरशाहानें झुलपिकारखानास** बरोबर घेऊन त्याच्यावर स्वारी केली. त्या दोघां भावांची **हैदराबादे**जवळ मोठी लढाई होऊन तींत **बाहादुरशाहाचा** जय झाला, व **कामबक्ष** रणांगणीं पडला. अशा रीतीनें **बाहादुरशाहानें** आपली सत्ता दृढ करून घेतली.

**शाहू दक्षिणेंत** यावयास निघाला तो प्रथमतः **भरतपूरदीघ** एथें आला. नंतर **जोधपूर, जयपूर, उदेपूर,** वगैरे ठिकाणीं मेजवान्या घेत घेत, व सैन्य गोळा करीत करीत **उज्जनीमहेश्वरावरून, विंध्याद्रि, सातपुडा** या पर्वतांतून **ब-हाणपुरास** येऊन पोहोंचला. ह्या ठिकाणीं **जोत्याजी केसरकर,** ज्यास सुम्यांस देण्याचीं पत्रें घेऊन येण्याकरतां पाठीमागें ठेविलें होतें, तो येऊन **शाहूस** मिळाला. **शाहू दक्षिणेंत** येत आहे हें वर्तमान मराठ्यांस कळतांच त्यांना अतिशय आनंद झाला; व पुष्कळ सरदार त्यास येऊन मिळाले. **परसोजी भोंसले** त्या वेळीं १५००० फौज बाळगून **वऱ्हाडांत** होता, व **पेशवे** ( **पिंगळे** ) याचा सरदार **चिमणाजी दामोदर** हा ५००० फौजेनिशीं **खानदेशांत** होता. हे दोघेही **शाहूस** येऊन मिळाले. मराठे लोक त्याच्या पदरीं भराभर नोकरी पतकरूं लागले. अशा रीतीनें त्याच्याजवळ थोड्याच वेळांत बरीच फौज जमली. **मोरोपंत सबनीस शाहूबरो-**

---

१. भरतपूर, जोधपूर, जयपूर, उदेपूर, इत्यादि ठिकाणीं जाण्यास **शाहूला** कसा वेळ मिळाला कोण जाणे; कदाचित् हे राजे अगर त्यांचे वकील बादशाहाबरोबर असतील त्यांनीं **शाहूराजास** मेजवान्या केल्या असाव्या. एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, एकंदर ३४ दिवस **शाहूस** मेजवान्या होत होत्या. –**काव्येतिहास-संग्रह**. २ **काफीखान** म्हणतो कीं, **झुलपिकारखानानें शाहूची** मुक्तता करून दिल्यावर तो ५०।६० माणसांनिशीं **बीजागड, नंदुरबार,** व **सुलतानपुर** एथील बंडखोर जमीनदार **मोहनसिंग** याजकडे प्रथमतः गेला. त्यानें **शाहूस** थोडीशी युद्धसामग्री दिली. नंतर **तापीच्या** कांठीं **कोकरमंड** (?) किल्ल्याचा अधिकारी **अंबू पांडे** याजकडे **शाहू** गेला. हा **पांडे सुरतेपासून ब-हाणपुरापर्यंतच्या** प्रांतांत मोठा धुंडावा करीत होता. त्यानें **शाहूबरोबर** बरीच फौज देऊन त्यास स्वदेशीं रवाना केलें.

चर होता त्यास त्यानें सेनापतीचा अधिकार दिला, जोत्याजी केसरकर यास सरदेशमुखीचा मुतालिक नेमिलें, व परसोजी भोंसले यास 'सेनासाहेबसुभा' हा किताब दिला, व वऱ्हाड, गोंडवण वगैरे प्रांतांची जहागीर करून दिली. चिमणाजी दामोदर याला 'पंडितराय' हा किताब देऊन त्यालाही मोठी नेमणूक करून दिली. नंतर हैबतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे, सयाजी भोंसले वगैरे सरदार आपापल्या फौजांसह हळू हळू येऊन मिळाले. निंबाळकर यास 'सरलष्कर' हा किताब दिला, व भोंसले यांचा कारभारी आनंदराव महादेव यास खासनिशीचा[1] व पोतेनिशीचा[2] अधिकार दिला. अशा रीतीनें जे जे सरदार शाहूस येऊन मिळाले त्यांपैकीं कांहींना जहागिरी, कांहींना नेमणुका, कांहींना मोठमोठे अधिकार देऊन त्यांस शाहूनें संतुष्ट करून आपलेंसें करून घेतलें. नंतर गोदावरी उतरून शाहू अलीकडे आला; व तेथून ताराबाईला त्यानें पत्र पाठविलें कीं, "आह्मी बादशाहापासोन निघोन मुक्कामास येऊन पावलों, लवकरच येतों." शाहू येतो हें वर्तमान ताराबाईला कळलें त्या वेळीं तिला फार वाईट वाटलें, व ती शाहूचा गादीवरील हक्क उडविण्याचा यत्न करूं लागली. तिच्या मनांतून शाहूला गादी देण्याचें नव्हतें. तिला वाटलें कीं, आपण आजपर्यंत राज्याचा उपभोग घेतला, तसेंच युक्तिप्रयुक्तीनें त्याचें आजपर्यंत संरक्षण करून तें ज्यास्त वाढविलें; हें सर्व शाहू करतां केलें कीं काय? शाहूला राज्य संपादन करण्यास काडीइतकेही श्रम पडले नाहींत, व तो आतां आयत्या वाढून तयार केलेल्या पात्रावर येऊन बसणार, आणि तसें झालें ह्मणजे मी व माझा मुलगा यांस आपल्या तोंडाकडे पाहात बसवणार हें कांहीं बरोबर नाहीं. तिनें, कांहीं झालें तरी शाहूला गादी द्यावयाची नाहीं असा निश्चय केला. तिनें लोकांत अशी कंडी उठविली कीं, 'हा कांहीं खरा शाहू नव्हे, कोणी तरी तोतया आहे.' परंतु एवढ्या उपायानें तिची

१ खासगीकडील कारभारी. २ जमाखर्च ठेवणारा अधिकारी.

शांतता झाली नाहीं. तिनें **रा**मचंद्रपंत **अ**मात्य, **प**रशुराम[1] **त्रिं**बक प्रतिनिधि, **शं**कराजी **ना**रायण सचीव, **ध**नाजी **जा**धव सेनापति वगैरे आपल्या अष्टप्रधानांस व सरदार लोकांस बोलावून आणून त्यांस सांगितलें कीं, " हल्लीं मराठ्यांच्या गादीवर हक्क सांगण्याकरतां जो येतो आहे तो कांहीं खरा **शा**हू नव्हे असें मला वाटतें; तो कोणी तरी तोतया असावा; बरें, यदाकदाचित् तो खरा **शा**हू असला, तथापि त्याचा **शि**वाजी **म**हाराजांच्या गादीवर मुळींच हक्क पोहोंचत नाहीं. **सं**भाजी राजे यांनीं काय काय क्रूर कृत्यें केलीं, व आपणां सर्वांस विनाकारण कसें गांजलें तो प्रकार अजून तुमच्या स्मरणांतून गेला नसेलच. **शि**वाजी **म**हाराजांची **सं**भाजी राजे यांस गादीवर बसविण्याची मुळींच इच्छा नव्हती. असें असूनही पुढें ते जबरदस्तीनें गादीवर बसले. परंतु त्यांच्यापासून राज्याचा कांहीं तरी फायदा झाला काय? फायदा नाहीं इतकेंच नाहीं, तर त्यांनीं आपली दौलत, हत्ती, घोडे, पागा वगैरे सर्व कांहीं गमाविलें; फार काय सांगावें, प्रत्यक्ष राज्यही घालवलें. पुढें **रा**जाराम राजे आपणां सर्वांस घेऊन तंजावरास गेले, व ११ वर्षेपर्यंत अव्याहत व जिवापाड श्रम घेऊन त्यांनीं मराठ्यांचें नष्ट झालेलें राज्य पुनः संपादन करून **थो**रल्या **म**हाराजांचें नांव राखिलें. आपणां सर्वांस एवढ्या योग्यतेस आणण्यास त्यांचेच श्रम कारण होत असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. ज्या वेळीं **सं**भाजी राजे यांनीं आपलें राज्य गमाविलें त्याच वेळीं त्यांचा व त्यांच्या वंशजांचा या गादीवरचा हक्क उडाला. सांप्रत गादीचे खरे खरे मालक ह्मटले ह्मणजे **रा**जाराम राजे व त्यांचे वंशज हे होत. तेव्हां ज्यांनीं आपणां सर्वांस एवढ्या योग्यतेस चढविलें त्यांच्या वंशजांचा आपणांस अभिमान असलाच पाहिजे. त्या वंशाला अंतर देणें

---

१ **प**रशुराम **त्रिं**बक हा **कि**न्हईचा कुळकर्णी. यानें **रा**मचंद्रपंत **अ**मात्य याचे हाताखालीं असतां मोठमोठीं कामें केलीं होतीं. **रा**जाराम मरण पावल्यावर **ता**राबाईनें त्याला 'प्रतिनिधि' हें पद देऊन सर्व किल्ल्यांची देखरेख त्याच्याकडे सोंपविली होती.

व त्याच्याशीं बेइमानानें वागणें यापेक्षां दुसरा राजद्रोह तो कोणता ? याकरतां सर्वांनीं मोठी फौज घेऊन जावें, व तो **शाहू** खरा असो किंवा खोटा असो; त्याच्याशीं लढाई करून त्याचें पारिपत्य करावें." तिनें आपल्या सर्व सरदारांकडून आपला पक्ष न सोडण्याविषयीं आणा-शपथा घेवविल्या, लढाईची मोठी कडेकोट तयारी चालविली, व "**शाहू**स कोणीं मदत करूं नये व त्याला कोणीं भेटायाला जाऊं नये, गेल्यास त्याला मोठी कडक शिक्षा होईल," असा सक्त हुकूम फर्माविला. तसेंच सर्व किल्ल्यांवर दारूगोळा वगैरे सामान ज्यास्त ठेवून त्यांचाही तिनें नीट बंदोबस्त केला.

**शाहू**ला हें वर्तमान कळलें तेव्हां त्याला फार वाईट वाटलें, व आपल्या खरेखोटेपणाविषयीं लोकांची खात्री व्हावी ह्मणून कांहीं दिवस तो **गो**दावरीच्या कांठींच तळ देऊन राहिला. इकडे **तारा**बाई-कडील मंडळीनें हेर पाठवून बातमी आणविली, तेव्हां **मो**रोपंत **स**ब-नीस, **जो**त्याजी **के**सरकर वगैरे मंडळी **शाहू**बरोबर आहे असें त्यांस समजलें, त्यावरून शंकेला कोठें जागाच उरली नाहीं. तेव्हां **तारा**-बाईकडील मंडळीस मोठा विचार येऊन पडला. त्यांनीं पूर्वी **तारा**-बाईजवळ शपथा वाहिल्या होत्या; परंतु त्यांना हा खरा प्रकार कळ-तांच त्यांच्या मनाची चलबिचल झाली. **तारा**बाईनें आपल्या पक्षास ज्यास्त मंडळी अनुकूल करून घेण्याचा सपाटा चालविलाच होता. **कों**कणांत मराठ्यांच्या आरमाराचा सरदार **का**न्होजी **आं**ग्रे यास तिनें बोलावून आणून त्याच्याकडूनही बेलभंडार उचलून घेतला. नंतर **ध**-नाजी **जा**धव व **प**रशुराम **त्रिं**बक यांस बोलावून आणून त्यांच्याबरो-बर मोठी फौज देऊन त्यांस **शाहू**वर जाण्यास आज्ञा केली. तिनें नि-घायचे वेळीं पुनः त्यांच्याकडून शपथा घेवविल्या. **प्र**तिनिधीनें शपथ घेतली, परंतु **ध**नाजी त्याच्याप्रमाणें शपथ घेईना. त्यानें **तारा**बाईस सांगितलें कीं, "जिवंत जीव आहे तोंपर्यंत एकदां **शाहू** **म**हाराजां-बरोबर लढाई देईन"; व तेवढ्यापुरतीच त्यानें शपथ वाहिली. नंतर

१ **का**व्येतिहाससंग्रह.

प्रतिनिधि व सेनापति हे बरोबर सैन्य घेऊन निघाले. **धनाजीनें** आपणाबरोबर ह्या वेळीं **खंडो बल्लाळ चिटणीस** व **नारोराम रंगराव** शेणवी, त्याचा खासगी कारभारी, यांस घेतलें होतें. **शाहूनेंही** तिकडे लढाईची तयारी चालविलीच होती. त्यानें लढाई देण्याचे उद्देशानें **गोदावरीच्या** कांठावरून आपला तळ हालविला; व तो **पुण्यापासून** १२ कोसांवर **खेड-कडूस** एथें येऊन दाखल झाला. वाटेनें **शिवणें** परगण्यांत **पारद** या गांवीं तो आला, तेव्हां त्या गांवाला लहानशी गढी होती तींतील लोकांनीं **शाहूचे** लोकांवर तोफा सोडल्या. **शाहूला** त्यामुळें फार राग आला, व त्यानें गांवावर हल्ला करून ती गढी जमीनदोस्त करून टाकली व आंतील लोकांची कत्तल केली. त्या गढींत एका बाईनें आपला मुलगा **शाहूचे** चरणांवर वाहिला, व "मीं हा आपल्या सेवेला अर्पण केला आहे, याचें आपण संरक्षण करावें" असें बोलून ती निघून गेली. **शाहूनें** त्या मुलाचा स्वीकार केला, व ह्या ठिकाणीं आपली प्रथमतः फत्ते झाली ह्मणून त्याचें नांव त्यानें **फत्ते-सिंग** असें ठेवून त्यापुढें आपलें उपनांव '**भोंसले**' हें जोडलें. ह्या मुलाचा **शाहूनें** चांगला प्रतिपाळ केला, व तो पुढें मोठा झाल्यावर **अक्कलकोटचें** राज्य त्याच्या स्वाधीन करून त्यास तेथील राजा[1] केलें. हाच **फत्तेसिंग अक्कलकोट** संस्थानचा मूळपुरुष होय.

**धनाजी जाधव** व **परशुराम त्रिंबक** हे बरोबर ४०००० फौज घेऊन **खेडाजवळ** येऊन पोहोंचले. त्यांच्याशीं एकदम लढाईस उभें न राहतां **शाहूनें धनाजीला** आपल्याकडे वश करून घेण्याचा यत्न चालविला; व तो त्याचा बेत सिद्धीस नेण्याला त्याला **धनाजीचा** कारभारी **नारोराम रंगराव** हें पात्र चांगलें सांपडलें. त्यानें आपला सर्व बेत **नारोरामास** कळविला, व त्या संबंधाची मसलत करण्याकरतां **शाहू** एके रात्रीं वेष पालटून एकटा **धनाजीचे** छावणींत **नारोराम** याजकडे आला. **नारोराम** यानें **शाहूस** ओळखिलें; परंतु

१ ह्या मुलाचें मूळचें उपनांव '**लोखंडे**' असें होतें. परंतु या '**परीस**' राजाला तें '**लोखंड**' लागतांच त्याचें सोनें होण्याला काय उशीर?—**ग्रांटडफ**.

त्याचा विश्वासघात केला नाहीं. नंतर काय बोलणें व्हावयाचें होतें तें झाल्यावर त्यानें **शा**हूस त्याचे गोटांत सुरक्षित पोहोंचतें केलें.[1] **ध**नाजीनें **ता**राबाईजवळ शपथ वाहिली होती खरी, परंतु त्याचें मन तिच्या-पक्षाकडून उडालें होतें, व **ना**रोरामाला ही गोष्ट माहीत होती. त्यानें एके दिवशीं बोलण्याच्या ओघांत **ध**नाजीस सांगितलें कीं, "मराठी राज्याचे खरे मालक **शाहू म**हाराज असून त्यांच्यावर शस्त्र चालविणें हें आपणासारख्या वीरास उचित नाहीं. याकरतां आपण खऱ्या पक्षास अनुकूल होऊन आपली स्वामिभक्ति प्रगट करावी हें मला योग्य दिसतें. ह्या प्रसंगासारखा प्रसंग पुनः कधींही प्राप्त होणार नाहीं." **ध**नाजीच्या मनांत हे विचार घोळतच होते, व त्यांत आणखी त्याच्या कारभाऱ्याच्या विचारांची भर पडतांच **शा**हूच्या पक्षास मिळण्याचा त्याचा निश्चय ठरला. नंतर **ता**राबाईजवळ वाहिलेल्या शपथेंतून मोकळें होण्याकरतां त्यानें **शा**हूबरोबर एक लुटुपुटुची लढाई देण्याचें योजिलें, व तो आपला बेत **शा**हूस कळविला. नंतर दोन्ही पक्षांची **खे**ड एथें लढाई सुरू झाली, तींत **जा**धवाच्या लोकांनीं त्याच्या सांगीप्रमाणें पोकळ बार काढिले; व **जा**धव आपल्या लोकांसह **शा**हूस जाऊन मिळाला. **प्र**तिनिधि मोठ्या निकरानें लढला. परंतु **ध**नाजी **शा**हूस जाऊन मिळाला असें पाहतांच त्याचें धैर्य सुटलें, व त्यानें [2]लढाईंतून पळ काढिला, व तो **सा**ताऱ्यास परत आला. **शा**हूनें **ध**नाजीस **से**नापतीचीं वस्त्रें दिलीं, **खं**डो **ब**ल्लाळ यास चिटणीशी दिली, व **ना**रोराम **रं**गराव यास 'मंत्री' पद देऊन त्याला मोठी नेमणूक करून दिली.

नंतर **शा**हू **खे**डाहून निघून **पु**ण्यास आला; व तेथून **श्री**जेजूरीस येऊन त्यानें **खं**डोबाचें दर्शन घेतलें, आणि त्या ठिकाणीं मोठा दान-

---

१. **क्यां**बेल. २ ही **खे**डची लढाई होण्यापूर्वी **अ**हमदनगराजवळ **शा**हू असतां त्यानें **औ**रंगजेबाच्या थडग्याचें दर्शन घेतलें; व त्या ठिकाणीं मोठा दानधर्म केला, असें **का**फीखान ह्मणतो.

धर्म करून कांहीं दिवस तेथेंच मुक्काम करून राहिला. **शाहूनें जे-जूरीहून शंकराजी नारायण** सचिव व **दत्ताजी शिवदेव राजाज्ञा** यांस भेटीस येण्यास पत्रें पाठविलीं.[1] सचिवाला पत्र पोहोंचतांच त्याला काय करावें तें कांहीं सुचेना. 'एकीकडे आड व एकीकडे विहीर' असें त्यास होऊन गेलें. **शाहूस** जाऊन भेटावें तर क्रियाभ्रष्टपणा पदरीं येतो, व न भेटावें तर राजद्रोहाचें पाप माथीं बसतें. तेव्हां त्यानें कांहींच न करतां तो **राजगडास** जाऊन स्वस्थ बसला. **दत्ताजी शिवदेव** मात्र येऊन भेटला, तेव्हां **शाहूनें** त्याचा सन्मान करून त्याचा अधिकार त्याच्याकडे कायम केला. नंतर **शाहू जेजूरीहून** निघून **वीरीस**[2] आला, व त्या ठिकाणीं एक मोठा साधु पुरुष होता त्याचें दर्शन घेऊन त्यानें **वांई** प्रांतांत **चंदनवंदन** किल्ल्यानजीक **दहिगांव** एथें आपल्या सैन्याचा तळ दिला. **शाहूनें** प्रथमतः **चंदनवंदनचा** किल्ला घेतला, व तेथून **साताऱ्यास शेखमिरा, प्रयागजी** प्रभु, **परशुराम त्रिंबक** वगैरे मंडळी होती त्यांना भेटीस येण्यासाठीं पत्र पाठविलें; परंतु ते भेटीस आले नाहींत. त्यांनीं त्या पत्राकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, व **शाहूबरोबर** लढाई करण्याचे हेतूनें किल्ल्यांत मोठी जंगी तयारी चालविली. त्या वेळीं **वांईकर शेखमिरा, प्रयागजी प्रभु** वगैरे जी मंडळी किल्ल्यांतच होती त्यांचीं मुलेंमाणसें धरून आणून, "किल्ला खालीं करून न द्याल तर तुमच्या मुलांमाणसांस आह्मी ठार मारूं" असा **शाहूनें** त्यांना निरोप पाठविला. तेव्हां त्यांनीं प्रतिनिधीस सांगितलें कीं, "**शाहू महाराज** राज्याचे खरे मालक आहेत. याकरतां किल्ला त्यांचे हवालीं करून **महाराजांची** मर्जी सुप्रसन्न करून घ्यावी हें आ-ह्मांस बरें दिसतें. तसें न केलें तर आमचीं बायकापोरें व्यर्थ प्राणास मुकणार." प्रतिनिधीनें त्यांचा निषेध केला. नंतर **शेखमिरा, प्रयागजी** वगैरे प्रमुख मंडळीनें कट करून प्रतिनिधीस फसविण्याचा बेत केला. त्यांनीं **शाहूस** सांगून पाठविलें कीं, " इकडे आह्मीं सर्व

---

१ **थोरले शाहूमहाराज** यांचें चरित्र. २ हा गांव **पुणें** जिल्ह्यांत **सासवड** तालुक्यांत आहे.

तयारी करून ठेविली आहे. खुणेकरतां ह्मणून किल्ल्यावर आमची तरवार झळकली ह्मणजे आपण किल्ल्यावर चालून यावें." शाहूनें तरवारीचा इषारा कळण्याकरतां वंदन किल्यावर आपलीं मनुष्यें ठेविलीं होतीं. तो इषारा होतांच शाहू आपल्या सैन्यासह किल्ल्यावर चाल करून गेला. शेखमिरा वगैरे मंडळीनें किल्ल्यांतील शिबंदी अगोदरच वश करून घेऊन, परशुराम त्रिंबक यास कैद केलें होतें. शाहू येतांच लढाईचा प्रसंग न पडतां किल्ला[1] त्याचे हस्तगत झाला. नंतर शेखमिरा, प्रयागजी वगैरे मंडळी शाहूला येऊन भेटल्यावर त्यांच्या पूर्वींच्या नेमणुका त्यांच्याकडे कायम करून त्यांस आणखीही मोठमोठ्या देणग्या त्यानें दिल्या. प्रतिनिधि परशुराम त्रिंबक याच्यावर मोठा कडक पहारा ठेवून त्यास सातारच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें, व त्याचा अधिकार गदाधर प्रल्हाद यास दिला. बहिरोपंत पिंगळे यास पेशवाईचा अधिकार दिला. नंतर परळी, वर्धनगड, महिमानगड वगैरे बरेच किल्ले शाहूनें घेतले, व हवालदार, दरखदार, किल्लेदार वगैरे लोक नवे जुने करून सांप्रदायाप्रमाणें त्यांस सनदा करून दिल्या, व प्रांताचा नीट बंदोबस्त केला.

ह्याच वेळेच्या सुमारास ह्मणजे सन १७०८ च्या फेब्रुवारी महिन्यांत बाहादुरशाहा झुलपिकारखानास[2] बरोबर घेऊन कामबक्ष याचा नाश करण्याकरतां दक्षिणेंत आला होता. कामबक्ष याचा नाश केल्यावर, बादशाहास आतां आपण मराठ्यांशीं कोणत्या रीतीनें वागावें याचा विचार करणें जरूर पडलें. त्या वेळीं शाहू व ताराबाई यांच्या मधील तंटा मोठ्या जारीनें सुरू होता; परंतु एकंदर गोष्टींवरून त्यांत शाहू जय पावेल असें धोरण दिसत होतें. झुलपिकारखा-

---

१ सातारचा किल्ला हातीं येण्यापूर्वी बरेच दिवस शाहूनें त्या किल्ल्यास वेढा दिला होता.—ग्रांटडफ. २ बाहादुरशाहानें झुलपिकारखानास दक्षिणेंत पाठविलें असें ग्रांटडफ म्हणतो; परंतु एल्फिन्स्टनकृत इतिहासांत बाहादुरशाहा झुलपिकारखानास बरोबर घेऊन गेला होता असें आहे.

नाच्या मनांतून शाहूचें इष्ट व्हावें असें होतें. त्यानें बादशाहास समजाविलें कीं, "जर आपण शाहूला अनुकूल व्हाल तर तो आपला अंकित होऊन राज्य करील; व त्यांत आपला मोठा फायदा होईल." त्यावरून बादशाहा शाहूस दक्षिणेच्या सरदेशमुखीची सनद द्याव-यास तयार झाला. परंतु वजीर मोमीनखान याच्या मनांत ती सनद ताराबाईचा मुलगा शिवाजी याच्या नांवानें करून द्यावी असें होतें, त्यामुळें तें सनदेचें प्रकरण त्या वेळीं तसेंच राहिलें. साताऱ्यास आ-ल्यानंतर सुमुहूर्त पाहून शके १६२९, सर्वजित् संवत्सर, माघ कृष्ण-पक्षीं, ह्मणजे इ० स० १७०८ च्या मार्च महिन्यांत शाहूनें आप-णास विधिपूर्वक राज्याभिषेक करून घेतला; व पूर्वील पद्धतीप्रमाणें स्वस्तिश्रीचीं[1] पत्रें लिहिण्यास प्रारंभ करून आपल्या नांवाचे शिक्के केले, व स्वतः राज्यकारभार पाहूं लागला.[2]

---

१ राजदरबारांतून जीं पत्रें जात असत त्यांच्या आरंभीं 'स्वस्तिश्री' असें लिहिण्याचा त्या वेळीं परिपाठ होता. २ हा मजकूर मल्हार रामरावकृत शाहू महाराजांचे चरित्रांतून घेतला आहे.

५

# भाग ४.

## शाहू सिंहासनारूढ झाल्यानंतर घडलेलीं वर्तमानें.

## सन १७०८ पासून १७१४ पर्यंत.

दक्षिणेचा मोंगलांचा सुभेदार दाऊदखान पन्नी हा शाहूराजाला दक्षिणच्या सहा सुभ्यांची चौथाई देण्याचें कबूल करतो.–बाळाजी विश्वनाथ.–शाहूची ताराबाईवर स्वारी.–धनाजी जाधवाचा मृत्यु.–त्याचा मुलगा चंद्रसेन व बाळाजी विश्वनाथ यांचें वैमनस्य पडतें.–शाहू आणखी दोन लग्नें करतो.–शंकराजी नारायण जलसमाध घेतो.–शाहूराजा शंकराजी नारायणाचा अज्ञान मुलगा नारो शंकर याचे नांवानें सचिवपदाचीं वस्त्रें पाठवून देतो व अशा युक्तीनें सचिवास आपल्या पक्षाकडे ओढतो.–तो सातारा शहरची सुधारणा करतो.–ताराबाईचा मुलगा शिवाजी याचा मृत्यु व राजसबाईचा मुलगा संभाजी हा कोल्हापुरच्या गादीवर बसतो.–रामराजाचा जन्म.–शाहू परशुराम त्रिंबक यास बंदमुक्त करून त्याला आपला प्रतिनिधि नेमतो; परंतु त्याचा मुलगा कृष्णाजीपंत हा कोल्हापुरच्या पक्षास मिळाल्यामुळें त्याच्यावर शाहूची इतराजी होऊन त्याला पुनः शाहू प्रतिबंधांत ठेवतो.–बाहादुरशाहाचा मृत्यु व जाहांदरशाहा गादीवर बसतो.–मोंगलांचे आपसांतील बखेडे.–फिरुक्शियर हा जाहांदरशाहास कैद करून आपण गादीवर बसतो.–झुलपिकारखानाचा मृत्यु.–सय्यद बंधु.–निजामउल्मुल्कास दक्षिणेची सुभेदारी मिळते.–चंद्रसेन जाधव व बाळाजी विश्वनाथ यांच्यांत भांडण लागतें.–तो बाळाजीचा पाठलाग करतो.–शाहूस ती बातमी कळून तो बाळाजीची मुक्तता करतो.–चंद्रसेन निजामास जाऊन मिळतो.–पुरंदरची लढाई.–खटावकर व थोरात यांचें पारिपत्य.–परशुराम त्रिंबक याची कैदेंतून सुटका व त्याला प्रतिनिधिपद पुनः मिळतें.–बाळाजी विश्वनाथ युक्तीनें कान्होजी आंग्र्यास वश करतो.–त्याला पेशवाई मिळते.

शाहू गादीवर बसला त्या वेळीं दाऊदखान[1] पन्नी हा दक्षिणेचा सुभेदार होता. त्यानें झुलपिकारखानाच्या सांगण्यावरून शाहूशीं तह केला व दक्षिणेंतील सहा सुभ्यांची ह्मणजे औरंगाबाद, बेदर,

---

१ बाहादुरशाहा सन १७०८ त दक्षिणेंतून दिल्लीस परत गेला, त्या वेळीं त्यानें दक्षिणेची सुभेदारी झुलपिकारखान यास दिली. परंतु त्या सरदारास दरबारांतून पाठविण्याची सवड नसल्यामुळें औरंगजेबाच्या वेळचा शूर सरदार दाऊदखान पन्नी यास त्याचा दुय्यम ठरवून दक्षिणेंत पाठविलें होतें.

**विजापूर**, **हैदराबाद**, **वऱ्हाड**, व **खानदेश** यांची चौथाई त्यास देण्याचें कबूल केलें; परंतु त्यांत अशी शर्त होती कीं, चौथाई वसूल करावयाची ती मोंगलांनीं वसूल करावी, त्यांत मराठ्यांनीं हात घालूं नये.

त्या वेळीं मराठ्यांचे आपसांत तंटे लागल्यामुळें जमिनीची लागवड वगैरे बरोबर होत नसे, यामुळें वसूलही बरोबर येईना. तेव्हां त्या संबंधानें नीट व्यवस्था करण्याकरतां **शाहूराजानें** **धनाजी जाधव** याची त्या कामावर नेमणूक केली. **धनाजीनें** काम बरोबर चालावें ह्मणून **सासवडचा** कुळकर्णी **अंबाजीपंत** **पुरंदरे**[१], व **श्रीवर्धनचा** कुळकर्णी **बाळाजी विश्वनाथ**[२] हे दोन कारकून ठेविले. हा **बाळाजी विश्वनाथ**, पेशव्यांचा मूळ पुरुष होय. **बाळाजी विश्वनाथ** फार हुशार होता. त्यानें थोडक्याच वेळांत जमाबंदीची शिस्त फार उत्तम तऱ्हेनें लावून दिली. यामुळें **धनाजीची** त्यावर फार मर्जी बसली, व **धनाजी** वारंवार **शाहूराजापुढें** त्याची तारीफ करी, यामुळें त्याचीही त्याच्यावर मर्जी बसत चालली.

---

१ हा **सासवडचे पुरंदरे** यांचा मूळ पुरुष. **ग्रांटडफ** आदिकरून **इंग्रजी** इतिहासकारांनीं याला **आबाजीपंत** असें म्हटलें आहे. परंतु **काव्येतिहाससंग्रहांत** व **पुरंदरे** यांच्या अस्सल वंशावळींत **अंबाजीपंत** असें नांव दिलें आहे.
२ **बाळाजी विश्वनाथ** हा **श्रीवर्धनचा देशमुख**. त्याकडे तेथील कुळकर्णाचें काम होतें. **श्रीवर्धन** त्या वेळीं **हबशाच्या** ताब्यांत होतें. कांहीं कारणामुळें **हबशी** व **आंग्रे** यांच्यामध्यें वैमनस्य आलें, तेव्हां **बाळाजीचा** कोणी शत्रु होता त्यानें "**बाळाजी आंग्र्यास** मिळाला आहे व त्याच्या मसलतीनें **आंग्रे** तुम्हांवर लवकरच स्वारी करणार आहे" असें **हबशास** खोटेंच सांगितलें. **हबशी** हलक्या कानाचा असल्यामुळें त्याला ती खबर खरी वाटली. त्यानें **बाळाजीचा** सूड उगविण्याचा निश्चय केला. त्यानें **बाळाजीचा** थोरला भाऊ **जानोजी** यास गोणत्यांत घालून समुद्रांत बुडविलें. तेव्हां आपलीही वाट **हबशी** अशाच तऱ्हेनें लावणार असें **बाळाजीला** भय पडून तो आपल्या कुटुंबासह **श्रीवर्धनाहून** पळाला. प्रथमतः **बाळाजी सासवडास** आला. तेथें **अंबाजीपंत पुरंदरे** यानें त्यास आश्रय दिला. नंतर ते दोघे तेथून निघून नोकरीच्या उद्देशानें **सातान्यास** आले. पुढें **प्रतिनिधीच्या** शिफारशीवरून **धनाजी जाधव** यानें त्या दोघांसही आपल्या हाताखालीं कारकून ठेविलें.—**ग्रांटडफ**.

ह्या वेळीं **ता**राबाई आपल्या कुटुंबासह **प**न्हाळ्यास होती. परंतु त्या ठिकाणीं राहणें तिला बरोबर वाटेना, सबब ती **प**न्हाळ्याहून **रां**गण्यास निघून गेली. **शा**हूराजानें तिच्यावर स्वारी करण्याचा निश्चय करून सन १७०९ मध्यें **चं**दनवंदन एथें मोठी फौज तयार केली, व दसरा झाल्यावर **ता**राबाईवर स्वारी करण्याचे हेतूनें तो **सा**तान्याहून निघाला. त्यानें प्रथमतः **व**संतगड घेऊन **प**न्हाळ्यास मोर्चे लाविले; व तो किल्ला हस्तगत झाल्यावर **पा**वनगड किल्ला घेतला. नंतर **शा**हूची स्वारी **को**ल्हापुरास गेली व तेथें त्यानें आपल्या छावणीचा तळ दिला. कांहीं दिवस तेथें राहिल्यानंतर **रां**गणा किल्ला घेण्याकरतां स्वारीचा कूच झाला. परंतु **ता**राबाईस ती बातमी कळतांच ती आपल्या परिवारासह **रा**मचंद्रपंत **अ**मात्य यास बरोबर घेऊन **कों**कणांत **मा**लवण एथें निघून गेली. तिनें जातांना **वा**डीकर **खे**म **सा**वंत व **का**न्होजी **आं**ग्रे यांस पत्रें पाठवून **रां**गण्याचा बचाव करावा ह्मणून सांगितलें होतें. **शा**हूराजानें **रां**गण्यास वेढा दिला. पुढें हल्ला करून किल्ला घ्यावा असा विचार करून **शा**हूनें हल्ला करण्यास हुकूम दिला, व आपण स्वतः घोड्यावर बसून बरोबर चालला. ह्या वेळीं **शा**हूराजाच्या जिवावरील एक मोठें संकट टळलें. तो घोड्यावर बसून डोंगरांतून वर जात असतां घोड्याचा पाय अकस्मात् घसरला. जर का दोनचार हात पाठीमागें तो घोडा घसरता तर **शा**हूच्या जिवावरच येऊन बेतली असती. परंतु इतक्यांत **खं**डो **ब**ल्लाळ **चि**टणीस त्याच्या बरोबर होता त्यानें तें अरिष्ट पहातांच एका झाडाला आपल्या पायांचा नेट देऊन घोडा ओढून धरला, व **शे**खमिरा जवळ होता त्यानें **शा**हूराजास एकदम खालीं ओढून घेतलें. ह्या वेळीं **शा**हू **म**हाराज त्या दोघांवर फार खुष झाले, व त्यांनीं **शे**खमिरा यास सरंजामाकरतां कांहीं गांव दिले, व **चि**टणीस यास **प**न्हाळा प्रांतांत **ना**डगौडीचें ५००० रुपयांचें वतन इनाम करूनें दिलें. नंतर हल्ला तहकूब करून किल्ल्याचे मोर्चे कायम ठेविले, व पुढें पावसाळा जवळ आला होता ह्म-

१ **का**व्येतिहाससंग्रह-( **शा**हू **म**हाराज यांचें चरित्र ).

णून स्वारी **को**ल्हापुरास छावणीकरतां परत आली. नंतर **खं**डो **ब**ल्लाळ याचा भाऊ **नि**ळो **ब**ल्लाळ याचे ताब्यांत **वि**शाळगडचा किल्ला होता त्याला पत्र पाठवून भेटीस बोलाविलें, व तो येऊन भेटल्यावर तिकडे सर्व मुलखाचा बंदोबस्त त्याला सांगून स्वारी **सा**ताऱ्यास परत आली.

**शाहू महा**राज **को**ल्हापुरास होते त्या वेळीं त्यांच्या बरोबर **ध**नाजी **जा**धव हाही होता. परंतु तो फार वृद्ध झाल्यामुळें त्याच्या अंगांत पूर्वीप्रमाणें काम करण्याची हिंमत राहिली नव्हती. तो आपलें सर्व काम **बा**ळाजी **वि**श्वनाथ याजकडून करवीत असे. **ध**नाजीच्या पायास पूर्वीं मोठी जखम लागली होती. ती बरी व्हावी ह्मणून त्यानें पुष्कळ इलाज केले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. तिच्यामुळें तो फार हैराण झाला होता. तेव्हां आपण आतां फार दिवस जगत नाहीं असें त्याचें त्यालाच वाटूं लागलें, व तो **सा**ताऱ्यास परत यावयास निघाला. परंतु वाटेंतच **वा**रणेचे तीरीं **व**डगांव एथें त्यास सन १७१० त देवाज्ञा झाली. **ध**नाजी **जा**धव निवर्तल्यावर **शा**हू **म**हाराजांनीं **से**नापतिपदाचीं वस्त्रें **ध**नाजीचा मुलगा **चं**द्रसेन यास दिलीं; परंतु जमाबंदीचा अधिकार पूर्वीं **ध**नाजीकडे होता तो **चं**द्रसेनास न देतां त्यावर **बा**ळाजी **वि**श्वनाथ याची नेमणूक केली. हें पाहून **चं**द्रसेनास फार वाईट वाटलें व तेव्हांपासून तो **बा**ळाजीचा मनांतून द्वेष करूं लागला.[1]

ह्या सुमारास **शा**हू **म**हाराजांनीं आपलीं आणखी दोन लग्नें केलीं. एक लग्न **कु**वरजी **शि**रके यांच्या मुलीशीं केलें, व तिचें नांव **स**कवारबाई असें ठेविलें; व दुसरें लग्न **मो**हिते यांच्या मुलीशीं करून तिचें नांव **स**गुणाबाई असें ठेविलें. यांशिवाय **वि**रूबाई ही त्यांच्या जवळ होतीच. **औ**रंगजेबानें त्यांना दोन बायका करून दिल्या होत्या, त्या दोन्ही **ये**सूबाईजवळ दिल्लीस ठेविल्या होत्या. त्यांपैकीं **शिं**द्यांची कन्या **सा**वित्रीबाई ही **शा**हू **म**हाराज **द**क्षिणेंत आल्यावर लवकरच निवर्तली.

---

१ ग्रांटडफ.

मागें सांगितल्याप्रमाणें शाहू महाराज कोल्हापुराहून सातान्यास [illegible]त आले नाहींत तोंच ताराबाईनें पुनः गडबड चालविली. तिनें प-[illegible]ळ्याच्या किल्लेदारास वश करून घेतलें, व फोंड सावंताच्या मद-[illegible] ती मालवणाहून पन्हाळ्यास आली. नंतर कोल्हापूर ही आपली [illegible]ची कायमची जागा करून तेथून ती सर्व उलाढाली व रा-[illegible]प्रकरणी मसलती करूं लागली. शंकराजी नारायण सचिव हा [illegible] आप तिचा पक्ष सोडीना. तेव्हां शाहू महाराजांनीं त्याला प्रथमतः [illegible]ळीस मिळविण्याचा निश्चय केला. ह्या वेळेच्या सुमारास त्यांच्या मनांत आपली राजधानी अहमदनगर शहर करावी असें आलें[1]; परंतु झुलपिकारखान यास ती गोष्ट आवडली नाहीं ह्मणून त्यांनीं तो बेत रहित केला. पुढें त्यांनीं आपलें सैन्य पुण्याकडे रवाना केलें होतें. त्या सैन्यानें वाटेनें सचिवाचा राजगड किल्ला घेतला. सचिवानें आपल्या बाकीच्या किल्ल्यांवर युद्धोपयोगी सामग्री भरून कडेकोट तयारी केली होती, व सचिवाशीं भांडण्याचा प्रसंग येता तर महाराजांना पदरीं अपयशच बांधून घ्यावें लागलें असतें. परंतु ह्या सर्व काळजींतून ते आपोआप मोकळे झाले. सचिवाला ताराबाईशीं शपथ वाहिल्यामुळें महाराजांकडे मिळतां येईना, व तिचा पक्ष धरून आपल्या खऱ्या यजमानाबरोबर युद्ध करण्यास धैर्य होईना. ह्यामुळें शेवटीं त्रासून त्यानें प्राणत्याग करण्याचा निश्चय केला, व आंबवडें[2] एथें नागतीर्थ आहे तेथें जाऊन त्यानें संन्यास घेतला, आणि लगेच जलसमाध घेऊन मरण पावला[3]. इ० स० १७११.

शंकराजी नारायण वारल्यामुळें ताराबाईच्या पक्षाचा मोठा आधार तुटल्यासारखें झालें. त्या वेळीं शाहू महाराजांनीं मोठ्या चातुर्यानें, आपला भलेपणा व धनीपणा लोकांत प्रगट व्हावा ह्मणून सचिवाचा लहान मुलगा नारो शंकर याच्या नांवानें लगेच सचिवपदाचीं वस्त्रें

---

१ क्यांबेल. २ हें लहानसें गांव भोरापासून सुमारें तीन कोसांवर असून सचिवाची ह्या ठिकाणीं समाध बांधलेली आहे, व तेथें भोरकरांकडून नेमणूक आहे. ३ क्यांबेल.

पाठवून दिलीं, व शंकराजी नारायणाचा जुना मुतालीक राझेकर ह्मणून कोणी होता त्याला, नवीन सचिव फक्त २ वर्षांचा होता ह्मणून, सर्व मुलखाचा बंदोबस्त सांगून सर्व कामें ते त्याचे मार्फत घेऊं लागले. निळकंठ मोरेश्वर पिंगळे पेशवे हा ताराबाईच्या पक्षास मिळाला होता, यामुळें महाराजांनीं त्याचा भाऊ बहिरोपंत यास पेशवाईचा अधिकार दिला, व कल्याण, जुन्नर, राजमाची वगैरे प्रांत त्यास जहागीर दिले. तसेंच पूर्वी गदाधर भट यास अमात्य नेमिलें होतें, परंतु त्याच्याकडून तें पद काढून [१]बाबूराव हणमंते यास त्यांनीं दिलें. अशा रीतीनें अष्टप्रधान, दरखदार, कारखानदार, त्याचप्रमाणें जुने सरदार, पदाधिकारी, मरातबदार वगैरे लोक आले त्यांचा सन्मान करून त्यांस त्यांचे जुने अधिकार देऊन त्यांनीं संतुष्ट केलें. याप्रमाणें लोकांचीं मनें आपल्याकडे ओढून घेण्याकरतां शाहू महाराज हरएक प्रयत्न करीत होते; व ह्यामुळें ते मराठे लोकांस फारच आवडूं लागले.

सातारा हें त्या वेळीं एक लहानसें खेडें होतें; परंतु तेंच आपल्या गादीचें कायमचें ठाणें करण्याचा शाहू महाराजांनीं बेत केला, व [२]किल्ल्याजवळ लोकांस कौलानें जागा देऊन आणखी गुरुवार व शनवार अशा दोन पेंठा वसविल्या; आणि त्या भागास शाहूनगर असें नांव दिलें. त्याचप्रमाणें स्वतःकरतां दोन मोठाले राजवाडे बांधले. अशा प्रकारें त्या ठिकाणास शहराचें रूप आलें. पुढें, तेथें पाण्याची हाकाहाक होती ह्मणून यौतेश्वराहून नळ बांधून पाणी आणविलें, व जागजागीं हौद, तलाव वगैरे बांधून शहरांत पाण्याची विपुलता करून टाकिली.

इ० स० १७१२ च्या जानेवारी महिन्यांत ताराबाईचा मुलगा शिवाजी हा देवी येऊन मरण पावला. तेव्हां राजसबाईचा मुलगा

---

१ रामचंद्र निळकंठ हणमंते हा मूळचा अमात्य. परंतु तो ताराबाईकडे होता; तसेंच तिमाजी रघुनाथ हाही तिकडेच होता; ह्मणून त्याचा भाऊ बाबूराव हणमंते यास बोलावून आणून त्याला अमात्य नेमिलें.–का० सं०. २ कयांवेल.

संभाजी यास रामचंद्रपंत अमात्य यानें गादीवर बसविलें, व ताराबाईला राज्यकारभारांतून काढून टाकलें, आणि तिला व शिवाजीची बायको भवानीबाई हिला नजरकैदेंत ठेवून आपण स्वतः राज्यकारभार पाहूं लागला. शिवाजी वारला त्या वेळीं भवानीबाई गरोदर होती. पुढें तिला मुलगा[1] झाला. त्याला राजसबाईनें ठार मारण्याचा निश्चय केला. तेव्हां ताराबाईनें मुलगा वारला असें उठवून त्याला गुप्त रीतीनें भगवंतराव रामचंद्र[2] ( हा रामचंद्रपंत अमात्य याचा मुलगा असावा ) याचे घरीं बावड्यास पाठवून दिलें.

परशुराम त्रिंबक हा साताऱ्यास कैदेंत होता. त्यानें आपणास मुक्त करण्याविषयीं महाराजांस विनंति केल्यावरून त्यांनीं त्यास कैदेंतून मुक्त केलें; व गदाधर प्रल्हाद यास कमी करून प्रतिनिधीचें पद त्याचें त्यास परत दिलें, व विशाळगड व त्याच्या आसपासचा मुलूख पूर्वीपासून प्रतिनिधीकडे होता तोही त्याचा त्यास दिला. प्रतिनिधीनें त्या प्रांताचा बंदोबस्त करण्याकरतां आपला वडील मुलगा कृष्णाजीपंत यास पाठविलें. परंतु जहागिरीचा मुलूख कृष्णाजीपंताचे ताब्यांत येतांच त्यानें महाराजांचा पक्ष सोडला व कोल्हापुरच्या संभाजीचा पक्ष धरला. संभाजीनें त्यास आपला प्रतिनिधि नेमिलें. शाहू महाराजांना हें वर्तमान कळलें तेव्हां अतिशय राग आला; व ह्या मसलतींत परशुराम त्रिंबक याचें खात्रीनें अंग असलें पाहिजे असा त्यांना संशय आल्यावरून त्यांनीं त्यास पुनः कैद केलें, व प्रथमतः त्याचे डोळे काढून नंतर त्यास ठार मारावें असा हुकूम[3] केला. नंतर

---

१ या मुलाचें नांव राजाराम असें ठेविलें. हा शाहूराजाचे पाठीमागें साताऱ्याच्या गादीवर बसला; त्या वेळीं त्याचें नांव रामराजा असें ठेविलें. २ ग्रांटडफच्या इतिहासांत रामचंद्रपंत अमात्य असें म्हटलें आहे तें चुकीचें आहे असें वाटतें. ३ ह्या वेळीं शाहूराजानें, लांकडी तक्ता त्याच्या उरावर ठेवून डोळे काढावे असा हुकूम केला होता; व तो अमलांत आणण्याकरतां एका मनुष्यानें त्याचे उरावर तक्ताही ठेविला होता. परंतु इतक्यांत खंडो बल्लाळ यास हें वर्तमान समजलें, तेव्हां त्यानें तत्काळ येऊन डोळे काढणारास ढकलून दिलें व शाहूराजापाशीं रदबदली करून प्रतिनिधीचा प्राण वांचविला.–काव्येतिहाससंग्रह.

खंडो बल्लाळ चिटणीस यानें रदबदली करून ती कडक शिक्षा माफ करविली. त्यानें शाहूस सांगितलें कीं, “ब्राह्मणाला इतकी क्रूर शिक्षा महाराजांनीं करूं नये. पूर्वीं संभाजी महाराजांनीं अशाच प्रकारचीं क्रूर कृत्यें केल्यामुळें राज्याची शेवटीं काय स्थिति झाली तें महाराजांस विदित आहेच. राज्याचा आतांशीं कोठें जम बसत चालला आहे. अशा प्रसंगीं अशा क्रूर शिक्षा अमलांत येतील, तर प्रजा हवालदील होऊन जाईल, व प्रजेचें मन महाराजांविषयीं शुद्ध राहणार नाहीं. प्रतिनिधि यांनीं महाराजांचा मोठा अपराध केला हें खरें आहे, परंतु त्यांस एवढें मोठें शासन योग्य नाहीं. शिक्षा करणें असेल तर महाराजांनीं त्यांस जन्मभर कैदेंत ठेवावें. परंतु ही भयंकर शिक्षा माफ करावी अशी माझी महाराजांचे चरणांपाशीं विनंति आहे.” चिटणिसाचें बोलणें महाराजांस सयुक्तिक वाटल्यावरून त्यांनीं ती शिक्षा रद्द केली, व प्रतिनिधीच्या हातापायांत मोठमोठ्या रुप्याच्या बेड्या ठोकून त्यास पुनः साताऱ्याच्या किल्ल्यांत कैदेंत ठेविलें; व प्रतिनिधीचें काम गदाधर प्रल्हाद याचा भाऊ नारो प्रल्हाद यास सांगितलें.

दिल्लीचा बादशाहा बाहादुरशाहा हा सन १७१२ चे फेब्रुवारी महिन्यांत मरण पावला. त्या वेळीं त्याच्या मुलांत गादीविषयीं तंटे लागले. परंतु झुलपिकारखानाच्या साह्यानें त्याचा वडील मुलगा जाहांदरशाहा हा गादीवर बसला. जाहांदर गादीवर बसल्यानंतर त्यानें हळू हळू आपल्या सर्व भावांस ठार मारून टाकलें, व आपली वजिरी झुलपिकारखान यास दिली. जाहांदर स्वतः आळशी, हलकट, व मंदबुद्धि असल्यामुळें सर्व राज्यसत्ता झुलपिकारखानाच्या हातांत होती. तेव्हां तो गर्वानें फुगून जाऊन प्रत्यक्ष बादशाहासही तुच्छ मानूं लागला, व लोकांवर वाटेल तसा जुलूम करूं लागला. शिवाय बादशाहाची एक राख होती ती बादशाहास सांगून आपल्या सोयऱ्याधायऱ्यांस दरबारांत मोठमोठ्या जागा देऊं लागली; ह्यामुळें सर्व दरबार हलकट लोकांनीं भरून गेलें. ते लोक,

दरबारांत जे कांहीं जुने लोक होते त्यांचा उपमर्द करूं लागले. या सर्व गोष्टींमुळें लोकांचीं मनें अगदीं खवळून गेलीं होतीं. इतक्यांत बादशाहावर एक मोठें संकट आलें, त्यामुळें ती त्रस्त झालेली प्रजा त्याच्या जुलमांतून आपोआप मोकळी झाली.

**जा**हांदर गादीवर आला त्या वेळीं ज्यांचा ज्यांचा ह्मणून गादीवर हक्क पोहोंचण्यासारखा होता त्या सर्वांस त्यानें ठार मारून टाकलें होतें. परंतु त्याचा दुसरा भाऊ **अ**झिमुश्शान याचा मुलगा **फि**रुकशियर हा मात्र त्या वेळीं त्याच्या तावडींत सांपडला नाहीं. कारण **बा**हादुरशाहा मरण पावला त्या वेळीं तो **बं**गाल्यांत होता. पुढें **जा**हांदरानें **अ**झिमुश्शान यास मारल्यावर, **फि**रुकशियर **ब**हारचा सुभेदार **हु**सेनअल्ली याच्या आश्रयास जाऊन राहिला. **हु**सेन हा त्याच्या बापाचा मोठा विश्वासू नोकर होता. त्यानें **फि**रुकशियर याचा पक्ष उचलला, व त्याचा थोरला भाऊ **अ**बदुल्ला त्या वेळीं **अ**लाहाबादचा सुभेदार होता त्याला आपल्या पक्षाकडे वळवून घेतलें!

ह्या दोघांच्या साहाय्यानें **फि**रुकशियरनें **आ**ग्र्यास मोठी फौज जमविली. **जा**हांदर व **झु**लपिकारखान यांनीं ७०००० फौज बरोबर घेऊन ते त्याच्याशीं लढाईस आले. परंतु त्यांत त्यांचा पराभव झाला. **जा**हांदर **दि**ल्लीस वेष पालटून पळून गेला, व **झु**लपिकारखान याचा बाप **अ**सदखान याच्या घरीं लपून बसला. **अ**सदखानानें त्याचा विश्वासघात करून त्याला कैद केलें, व **झु**लपिकारखान परत आल्यावर त्यानें त्या दुर्दैवी बादशाहास त्याच्या स्वाधीन केलें, आणि "**फि**रुकशियरच्या क्रोधाग्नीस **जा**हांदर यास बळी देऊन त्याचा राग शांत करून त्याची मर्जी सुप्रसन्न करून घे" अशी त्या निर्दय ह्मातार्‍यानें आपल्या मुलास मसलत दिली!

**फि**रुकशियर पुढें **दि**ल्लीस आल्यावर हे बापलेंक त्यास सामोरे गेले, व त्यांनीं **जा**हांदरास **फि**रुकशियरच्या स्वाधीन केलें. तेव्हां **अ**सदखानास **फि**रुकशियरनें जीवदान दिलें, परंतु **झु**लपिकारखान डेर्‍यांतून बाहेर पडतो आहे तोंच त्याच्या गळ्यावर फांस टाकून

त्याला ठार मारलें, व याप्रमाणें त्याच्या आपलपोटी व विश्वासघातकी वर्तणुकीबद्दल त्याला चांगलें प्रायश्चित्त मिळालें. नंतर **फिरुक्शियरनें जाहांदरशाहासही** ठार मारून टाकिलें, व आपण **दिल्लीच्या**[1] तक्तावर इ० स० १७१३ च्या फेब्रुवारी महिन्यांत बसला.

**फिरुक्शियर** गादीवर बसल्यानंतर त्यानें **अबदुल्ला** यास आपली वजिरी दिली, व **हुसेनअल्ली** यास आपला सेनापति नेमिलें. तसेंच **दाऊदखान दक्षिणच्या** सुभ्यावर होता त्यास **गुजराथचा** सुभेदार नेमून **चिंकिलीजखान** ( **निजामउल्मुल्क** ) यास **दक्षिणचा** सुभेदार नेमिलें. ( सन १७१३. )

**दाउदखान दक्षिणचा** सुभेदार होता तोंपर्यंत **शाहूराजाचा** पक्ष जोरांत होता; व मराठ्यांचा **चौथाईचा** हक्क विनतक्रार त्यांस मिळत होता. परंतु **दाउदखानाची** बदली होऊन **चिंकिलीजखान दक्षिणेंत** आल्यावर त्यानें **संभाजीचा** पक्ष धरला. यामुळें **शाहूचें** पारडें खालीं बसलें व तो हक्क नियमितपणें येण्याचें बंद झालें. तेव्हां आपला हक्क वसूल करण्याकरतां **महाराजांनीं चंद्रसेन जाधव** याजबरोबर मोठी फौज देऊन त्यास रवाना केलें; व **धनाजीचा** जुना विश्वासू नोकर **बाळाजी विश्वनाथ** यास त्याचे बरोबर जावयास सांगितलें. या दोघांचें पूर्वीपासून वैमनस्य होतेंच. **महाराजांनीं बाळाजी विश्वनाथ** यास आपणावर देखरेख करण्याकरतां पाठविलें आहे असें **जाधवास** वाटलें, व त्यामुळें त्याचा वैमनस्याग्नि जास्तच भडकला. त्याच्या मनांतून कांहीं तरी कुरापत काढून **बाळाजीची** चांगली खोड मोडावी असें होतें. एके दिवशीं **बाळाजीच्या** पथकांतील **पिराजी राऊत** ह्मणून कोणी एक **शिलेदार** होता, तो मृगया करीत असतां एका हरणाच्या पाठीमागें लागला. तो हरण पळत पळत **व्यासराव** ह्मणून कोणी एक ब्राह्मण **जाधवाच्या** पदरीं होता त्याच्या राहुटींत शिरला. **पिराजीही** त्याचे मागून त्याला मारण्याकरतां **व्यासरावाचे** राहुटींत शिरूं लागला. त्यानें त्यास अटकाव केला यामुळें त्या दोघांचें भांडण

[1] हा सर्व भाग **एल्फिनस्टनकृत** इतिहासांतून घेतला आहे.

झुंपलें. पिराजीनें हरणास मारण्याकरतां आपला भाला फेंकला. परंतु व्यासराव मध्यें आल्यामुळें तो भाला हरणास न लागतां व्यासरावास लागला, व त्यामुळें त्याला जबर जखम लागली. पिराजी तेथून पळाला व त्यानें आपला धनी बाळाजी विश्वनाथ यास तें एकंदर वर्तमान सांगून जाधवापासून आपलें रक्षण करण्याविषयीं प्रार्थना केली. व्यासरावानें जाधवाकडे फिर्याद केली, तेव्हां पिराजीस कैद करून पाठविण्याविषयीं जाधवानें बाळाजीस निरोप पाठविला. बाळाजी ती गोष्ट कबूल करीना. तेव्हां बाळाजीचा सूड उगविण्यास ही संधि बरी आहे असें जाधवास वाटल्यावरून त्यानें बाळाजीवर आपले स्वार पाठवून दिले. ह्या वेळीं बाळाजीवर मोठें संकट येऊन पडलें. त्यानें आपले दोघे मुलगे बाजीराव व चिमणाजी आपा, अंबाजीपंत पुरंदरे व कांहीं निवडक स्वार असे बरोबर घेतले व तेथून पलायन केलें. बाळाजी प्रथमतः सासवडास आला, व तेथून पुरंदरास गेला. त्यानें आपलें रक्षण करण्याविषयीं सचिवास विनंति केली. सचिवानें त्याला आश्रय दिला असता; परंतु चंद्रसेनानें सचिवास कळविलें कीं, “ तुह्मीं बाळाजीस आश्रय देऊं नये, दिला तर आह्मी तुमच्या मुलखाची धूळधाण करून देऊं.” यावरून सचिवाला मोठें भय पडून त्यानें त्याला आश्रय दिला नाहीं. नंतर बाळाजी परिंच्यास आला. तेथें बाळाजीच्या पथकांतील दोन सरदार पिराजी जाधव व नाथाजी धुमाळ यांनीं पांचसहाशें लोक जमा केले व त्यांसह बाळाजी निरेच्या कांठीं आला. बाळाजीच्या पाठीमागें जाधवाचे स्वार लागलेच होते. जिकडे जिकडे बाळाजी जाई तिकडे तिकडे ते त्याचा पिच्छा सोडीनात. पुढें निरेवर जाधवाच्या लोकांनीं फारच लगट केली. त्या ठिकाणीं एक लहानशी लढाई झाली, व तींत बाळाजीच्या लोकांचा मोड झाला. पुढें पिराजी व नाथाजी ह्या दोघांनीं त्याला मोठ्या कष्टानें पांडवगडानजीक [1]माची येथें नेऊन पोहोंचविलें. आतां महाराजांशिवाय दुसरा को-

---

१ माची हें पांडवगडाजवळ एक लहानसें खेडें आहे.—ग्रांटडफ.

णीही आपलें रक्षण करण्यास समर्थ नाहीं, असें **बाळाजीनें** मनांत आणून **अंबाजीपंत पुरंदरे** त्याचे बरोबर होता त्यास **साताऱ्यास** पाठवून दिलें. त्याचा व **खंडो बल्लाळ चिटणीस** याचा चांगला स्नेह होता, त्याच्या मार्फत **बाळाजीचें** रक्षण करण्याविषयीं त्यानें **शाहू महाराजांपाशीं** विनंति केली. **महाराज बाळाजी विश्वनाथाला** पूर्वीपासून ओळखीत होते, व **बाळाजीवर** त्यांची थोडीशी मर्जीही होती. त्यांनीं लगेच **बाळाजीस** अभयपत्र देऊन **साताऱ्यास** निघून यावें ह्मणून हुकूम पाठवून दिला.

**जाधवाला** हें वर्तमान कळलें तेव्हां त्याला मोठा राग आला; व "**बाळाजीस महाराजांनीं** अभयपत्र दिलें हें बरोबर केलें नाहीं" असें तो ह्मणूं लागला. त्यानें **महाराजांस** असें कळविलें कीं, "स्वामींनीं **बाळाजीस** माझे स्वाधीन करावें, त्यास आश्रय दिल्यास आह्मांस **महाराजांचे** पाय सुटतील." **जाधवाची** ही उद्धट वर्तणूक पाहून **महाराजांस** मोठा राग आला; व त्यांनीं लगेच **हैबतराव निंबाळकर सरलष्कर** त्या वेळीं **अहमदनगराकडे** होता त्याला **चंद्रसेनाचें** पारिपत्य करण्याकरतां जावें अशी आज्ञा केली. **हैबतरावाला** ती गोष्ट इष्टच होती. कारण **धनाजीचे** पश्चात् **सेनापतिपद** आपणास मिळावें असें **हैबतरावाचे** मनांत होतें, परंतु पुढें तें **चंद्रसेनास** मिळालें; या गोष्टीमुळें **हैबतरावाच्या** मनांत **जाधवाविषयीं** पूर्वीपासूनच पुरा द्वेष बाणला होता, व तो सूड उगवावयास त्याला ही आयतीच संधि सांपडली. आज्ञा होतांच तो त्वरेनें **अहमदनगराहून** निघून **फलटणास** येऊन पोहोंचला. **चंद्रसेनास** ही बातमी कळतांच तो **पांडवगड** सोडून त्याचे ईशान्येस १९ मैलांवर **दहींगांव जेऊर** एथें निघून गेला. त्या वेळीं तें प्रकरण तितकेंच मिटविण्याविषयीं व आपसांत लढाईचा प्रसंग न आणण्याविषयीं **महाराजांनीं चंद्रसेनास** कळविलें; परंतु तो कांहीं केल्या ऐकेना. सरतेशेवटीं **हैबतरावाची** व त्याची **जेऊर** एथें मोठी लढाई झाली, व तींत **जाधवाचा** पुरा मोड झाला. नंतर तो तेथून पळाला तो **रहिमतपुरावरून पन्हाळ्यास** गेला. त्या ठिकाणीं

तो संभाजीराजास जाऊन भेटला, व त्याला वडगांव, कुमठें, शिरोळ वगैरे ठाणीं त्यानें घेऊन दिलीं. नंतर त्या ठिकाणीं आणखी फौज गोळा करून तो वालेघाटीं निघून गेला. हैबतरावानें आपला पराभव केला ही गोष्ट त्याच्या मनाला नेहमीं खात होती; व त्यानें अशी प्रतिज्ञा केली कीं, "सरलष्कर याशीं लढाई करून त्यास मोडावें, तर आंगावरी दुसरीं वस्त्रें घ्यावीं; व महाराजांनीं बाळाजीपंत यास हवालीं केलें तरी महाराजांस भेटावें, मुजरा करावा, नाहीं तरी भेटावयाचें नाहीं."[1] नंतर चंद्रसेन निजामउल्मुल्क[2] ह्याला मोंगलाईंत जाऊन भेटला. त्यानें त्यास ६० हजारांची जहागीर देऊन आपल्या पदरीं ठेविलें. चंद्रसेनाबरोबर धारराव प्रभू कळंवेकर हा दुसरा एक शाहूराजाच्या पदरचा सरदार निजामउल्मुल्काकडे गेला. त्यासही त्यानें ९ लाखांची जहागीर दिली व सरनौबत हा किताब दिला. त्याचप्रमाणें रंभाजी निंबाळकर व सर्जेराव घाटगे हेही त्याच्याबरोबर मोंगलांस जाऊन मिळाले.

चंद्रसेनानें अशा प्रकारच्या निंद्य कृतीनें आपल्या महाप्रतापी पित्याच्या उज्वल कीर्तीस, आपल्या कुलास व आपल्या नांवास कलंक लावून घेतला. "हिऱ्याच्या पोटीं गारगोटी!" ज्या धनाजीनें शिवाजी महाराजांचे वेळीं विजापुरकरांवर आपली तरवार गाजवून मोठी कीर्ति मिळविली, ज्या धनाजीनें मोंगलांच्या मुलखांत स्वाऱ्या करून त्यांना "त्राहिं त्राहि" करून सोडलें, ज्या धनाजीचा मोंगलांना एवढा वचक कीं घोडा पाणी पीत नाहींसा झाला तर त्यांनीं त्याला ह्मणावें, "क्यौं बेटा, पानी क्यौं पीते नहीं, उसमें धनाजी नजर आता है? कैसा क्या?" ज्या धनाजीचा लोकोत्तर पराक्रम पाहून राजाराम महाराजांनीं त्यास "जयसिंगराव" हा बहुमानाचा किताब

---

१ एथें मूळ बखरींतील भाषा कायम ठेविली आहे. २ निजामउल्मुल्क हा सन १७१३ मध्यें पहिल्यानें दक्षिणचा सुभेदार होऊन आला होता. त्याला शाहूराजाचें जेणेंकरून वाईट होईल तें इष्टच होतें; कारण त्यानें कोल्हापुरच्या संभाजीचा पक्ष उचलला होता, हें मागें सांगितलेंच आहे.

दिला होता, ज्या धनाजीनें मराठ्यांचें राज्य वृद्धिंगत होण्याकरितां आपलें सर्व आयुष्य खर्ची घातलें, अशा त्या महाप्रतापी सूर्याच्या पोटीं असला हा शनैश्वर चंद्रसेन उत्पन्न होऊन व आपल्या प्रभूशीं निमकहरामपणा करून "कुऱ्हाडीचा दांडा गोताला काळ" ह्या ह्मणीप्रमाणें मराठ्यांचा पक्ष सोडून मोंगलांच्या पदरीं जाऊन राहिला, व पुढें, ज्या प्रभूनें त्याला एवढ्या योग्यतेस चढविलें त्याचाच नाश करण्याचा प्रयत्न करूं लागला, यापेक्षां मनुष्याच्या अंगच्या नीचतेला दुसरी जागाच उरली नाहीं असें ह्मटलें पाहिजे!

चंद्रसेनाच्या मनांत हैवतराव निंबाळकराची खोड मोडावयाची होतीच, व मोंगलांच्या मुलखांत हैवतराव फार लुटालूट करीत असे, यामुळें निजामउल्मुल्क याच्याही मनांतून त्याचा बंदोबस्त करावयाचा होता. ह्मणून त्यानें आपली फौज देऊन जाधवास हैवतरावावर [illegible]ास सांगितलें. त्या वेळीं जाधवाबरोबर सर्जेराव घाटगे कागलकर, व रंभाजी निंबाळकर (यानें पुढें मोंगलांचीं फार मोठमोठीं कामें केलीं ह्मणून याला रावरंभा असें ह्मणत असत), हेही होते. हैवतरावावर चंद्रसेन चाल करून गेला. त्या वेळीं तो गोदातीर सोडून भीमातीरीं परत आला. नंतर महाराजांनीं बाळाजी विश्वनाथ यास "सेनाकर्ते"[1] असा नवीन किताब देऊन त्यास हैवतरावाचे मदतीस पाठवून दिलें. या दोघांची गांठ पडल्यावर ते पुरंदराजवळ येऊन उतरले, व त्या ठिकाणीं चंद्रसेनाची वाट पहात बसले. पुढें उभय पक्षांची पुरंदर मुक्कामीं मोठी लढाई झाली (सन १७१३). ह्या लढाईंत मराठे आमचा जय झाला ह्मणून ह्मणतात; परंतु इतकी गोष्ट खरी आहे कीं, त्यांस साल्प्याच्या घांटापर्यंत मागें हटावें लागलें. नंतर पुढें शाहू महाराज व चंद्रसेन यांच्यामध्यें तह झाला. परंतु त्या तहांत काय ठरलें तें कांहीं समजत नाहीं. त्याच वेळीं रंभाजी निंबाळकर यानें पुणें परगणा घेतला, व

---

१ बहुतेक इतिहासांतून "सेनाकृत" असें म्हटलें आहे. परंतु तें चुकीचें आहे. मूळ बखरींत "सेनाकर्ते" असें आहे.

निजामउल्मुल्कानें त्याला तिकडेच जहागीर करून दिली. निजामाच्या वतीनें शाहू महाराजांशीं तह केल्यानंतर चंद्रसेन मोंगलाईंत चिटकोंदें–भालकीकडे आपल्या जहागिरीवर निघून गेला. हें वर्तमान इ० स० १७१३ त घडलें.

निजामउल्मुल्क हा दाऊदखानापेक्षां फार हुशार असून मोठा कावेबाज होता. मराठ्यांच्या आपसांत दुफळ्या माजून त्यांपासून आपलें कल्याण करून घ्यावें, इतक्याकरतांच त्यानें कोल्हापुरच्या संभाजीचा पक्ष उचलला होता; व दिल्लीच्या दरबारीं त्याचें मोठें वजन असल्यामुळें तिकडे संभाजीचें महत्व वाढलें, व शाहूराजाचें कमी झालें. ह्या वेळीं दक्षिणेंत फारच अव्यवस्था झाली होती. मराठ्यांचे कांहीं सरदार शाहू महाराजांकडे होते, कांहीं संभाजीचा पक्ष धरून होते, कांहीं निजामउल्मुल्कानें वश करून घेतले होते, व कांहीं कोणाचेंच वर्चस्व कबूल न करितां आपण स्वतंत्र आहों असें मानून मुलखांत लुटालूट करीत होते. कापशी व मुधोळ एथील घोरपडे संभाजीच्या पक्षास मिळाले होते, व प्रख्यात संताजी घोरपडे याचा नातू शिधोजी घोरपडे हाही संभाजीला मिळाला होता; आणि कोंकणांत कान्होजी आंग्रे याचें प्रस्थ या वेळीं फारच वाढलें होतें, तोही संभाजीचाच पक्ष धरून राहिला. चंद्रसेन जाधव, रंभाजी निंबाळकर, सर्जेराव घाटगे कागलकर वगैरे सरदार मोंगलांस मिळाले होते. मोंगलांचा जुना आश्रित कृष्णराव खटावकर याचें ठाणें शंभुमहादेवाचे डोंगरांत होतें. तो कोणाचेंच वर्चस्व कबूल न करतां आसपासच्या मुलखांत स्वतंत्र रीतीनें लुटालूट करीत होता. दमाजी थोरात नांवाचा एक सरदार पूर्वी संभाजीच्या पक्षाकडचा होता; परंतु तोही कोणाचेंच स्वामित्व कबूल करीत नाहींसा झाला होता. त्यानें आपलें मुख्य ठाणें हिंगणगांवच्या गढींत ठेविलें होतें, व त्याच्या आसपास २०।२५ कोसांत आपला अंमल बसविला होता. सावनूरच्या नबाबांनीं तर तिकडे कर्नाटकांत मोठीच धामधूम मांडली होती. उदाजी चव्हाण हा बत्तिसशिराळ्याचा किल्ला बळका-

वून बसला होता. त्याचें प्रस्थ पुढें एवढें वाढलें कीं, **क**ऱ्हाड व **ब**त्तिसशिराळें एथील **चौ**थाईचा हक्क त्यास देऊन त्याच्याशीं सल्ला करणें **शाहू** **म**हाराजांना भाग पडलें. सारांश, **द**क्षिणेंत ह्या वेळीं असा गोंधळ व इतकी झोटिंगपाच्छाई माजली होती, व **सं**भाजीचा पक्ष इतका जोरांत होता कीं, जर त्या वेळीं **शाहू** **म**हाराज आपल्या राज्यकारभारांत ज्यास्त दक्षतेनें वागले नसते, तर ते खात्रीनें **शि**वाजी **म**हाराजांच्या गादीला अंतरले असते.

**शाहू** **म**हाराज मोठे हुशार, दूरदृष्टि व शूर होते. त्यांनीं हा सर्व बखेडा मोडून टाकण्याकरितां फार लौकर उपायांची योजना केली. प्रथमतः त्यांनीं **द**माजी **थो**रातावर शस्त्र उचललें; व **बा**ळाजी **वि**श्वनाथ याच्या हाताखालीं मोठें सैन्य देऊन त्याला **थो**रातावर पाठवून दिलें. **थो**रातानें ह्या वेळीं **बा**ळाजीला चांगलाच हात दाखविला. त्यानें प्रथमतः आपण घाबरलों असें ढोंग केलें, व तह करण्याचे मिषानें त्या कपटी **थो**रातानें **बा**ळाजी **वि**श्वनाथ, त्याचे **बा**जी व **आ**पा हे दोन मुलगे, व त्याचा स्नेही **अं**बाजीपंत **पु**रंदरे यांस गढींत नेलें. **बा**ळाजीला कदाचित् आपला संशय येईल ह्मणून त्यानें "मी तुमच्या केंसासही धक्का लावणार नाहीं" असें बोलून बेलभंडार उचलून दिला होता. परंतु ही मंडळी गढींत येतांच त्यानें विश्वासघात करून त्या सर्वांस कैद केलें. त्याला **बा**ळाजीनें बेलभंडार उचलल्याची आठवण दिली. परंतु त्यानें **बा**ळाजीला खडखडीत जबाब दिला कीं, "कसला बेल, व कसला भंडार! बेल ह्मणजे एका झाडाचा पाला आहे, व भंडार तर आह्मी नेहमीं भाजींत खातों!" त्यानें **बा**ळाजीस निक्षून सांगितलें कीं, अमुक अमुक दिवसांचे आंत अमुक अमुक ऐवज पटेल तर तुमची एथून सुटका होईल, नाहीं तर तुह्मांस मरेपर्यंत एथेंच कुजत राहावें लागेल. पुढें **शाहू** **म**हाराजांना हें वर्तमान कळलें तेव्हां त्यांनीं, **थो**रातानें मागितलेला पैसा भरून **बा**ळाजीची मुक्तता केली. त्यानंतर **म**हाराजांनीं **थो**रातास जिंकण्याचें काम **स**चिवास सांगितलें. **स**चिवाचा कारभारी **रा**झेकर यानें **थो**रातावरो-

वर लढाई चालविली, परंतु त्या कावेबाज **थो**रातानें एके ठिकाणीं त्याचा पराभव करून त्याला व त्याचा छोटा यजमान **नारो शंकर** यांला कैद केलें, व त्यांस **हिं**गणगांवच्या गढींत कैदेंत नेऊन ठेविलें.

सचिवाला **थो**रातास जिंकण्याचें काम सांगितलें त्याच वेळीं **म**हाराजांनीं **साता**ऱ्यास आणखी दोन स्वाऱ्या करण्याची तयारी केली. एकीचें आधिपत्य **ब**हिरोपंत **पिं**गळे **पे**शवे यास देऊन, **कों**कणांत **क**ल्याण परगण्यांत **आं**ग्र्यानें मोठी गडबड चालविली होती त्याच्यावर त्यास रवाना केलें; व दुसरीचें आधिपत्य **बा**ळाजी **वि**श्वनाथास देऊन त्याला[1] **शं**भुमहादेवाचे डोंगरांतला पुंड **कृ**ष्णराव **ख**टावकर यावर पाठविलें. **कृ**[2]ष्णराव गर्वानें इतका फुगून गेला होता कीं, तो **बा**ळाजी **वि**श्वनाथाशीं सामना देण्याकरितां **औं**दपर्यंत चाल करून आला. नंतर **औं**द येथें उभय पक्षांची फार मोठी लढाई झाली, तींत **ख**टावकराचा पराभव झाला. या वेळीं **बा**ळाजी **वि**श्वनाथाबरोबर **प**रशुरामपंत **प्र**तिनिधि याचा दुसरा मुलगा **श्री**पतराव होता; व **बा**ळाजीला जो हा जय मिळाला त्याचें बहुतेक श्रेय **श्री**पतरावास दिलें पाहिजे. **श्री**पतरावाला **बा**ळाजीबरोबर जाण्यास **प**रशुरामपंतानेंच सांगितलें होतें. लढाईवर जावयाचे वेळीं **प**रशुरामपंतानें **श्री**पतरावास सांगितलें होतें कीं, "तुम्हीं **से**नाकर्ते जातात त्यांजबरोबर या लढाईत जाऊन चाकरी व आपली शर्त असेल ती करून तरवार करून महाराजांस संतोषित करून आम्हांस सोडवावें, अगर मरून जावें." **श्री**पतरावही वरील लढाईत अशाच निश्चयानें लढला, व त्यानें **कृ**ष्णरावाचा पुरा पराभव केला. **बा**ळाजीनें **म**हाराजांजवळ **श्री**पतरावाच्या शौर्याबद्दल फार तारीफ केली. त्यावरून ते फार खुष झाले, व **प**रशुराम **त्रिं**बक यास कैदेंतून मुक्त करून त्यास पुनः त्यांनीं आपला **प्र**तिनिधि नेमिलें. **कृ**ष्णराव शरण आला, त्याला **म**हाराजांनीं क्षमा

---

१ ह्याला **मों**गलाईतून '**म**हाराज' असा किताब होता.—**ग्रां**टडफ. २ एथें मूळ बखरींतील भाषा कायम ठेविली आहे.

करून खटाव गांव वंशपरंपरेनें त्यास इनाम करून दिला, व त्याला आपल्या पदरीं ठेविलें.

शाहू महाराजांनीं कोंकणांत आंग्र्याचें पारिपत्य करण्याकरितां बहिरोपंत पिंगळे यास पाठविलें होतें, परंतु त्या स्वारींत त्याला यश आलें नाहीं. आंग्र्यानें बहिरोपंताचा पराभव करून त्याला व निळो बल्लाळ यांला कैद केलें. नंतर आंग्र्यानें लोहगड, राजमाची वगैरे शाहू महाराजांचे किल्ले घेतले, व तो साताऱ्यावर स्वारी करण्याचा घाट घालूं लागला. त्या वेळीं महाराजांना मोठी भीति पडली. त्यांनीं लगेच बाळाजी विश्वनाथाबरोबर २० हजार फौज देऊन त्यास कोंकणांत पाठविलें. बाळाजी विश्वनाथ हा आंग्र्यानें घेतलेले राजमाची वगैरे किल्ले घेत घेत, व त्याचीं ठाणीं उठवीत उठवीत कोंकणांत शिरला. पुढें कान्होजी आंग्रे कुलाब्यास आहे असें कळल्यावरून तो अवचितगडावरून नागोठणें तालुक्यांत गेला, व तेथून त्यानें आंग्र्यास सांगून पाठविलें कीं, "तुम्ही महाराजांचे पदरचे मातबर सुभेदार, तुकोजी आंग्रे तुमचे वडील यांणीं शिवाजी महाराज थोरले यांजपाशीं एकनिष्ठपणें सेवा करून ते वाढले. ऐसें असोन शाहू महाराज वडील, सिंहासनाचे खावंद; ते राज्यावर आले, राज्य करतात, त्यांशीं दुरोंख (=दोन रोंख=फितूर) राहून धाकटे भाऊ (संभाजी राजे) यांजकडे मिळोन सरकारी तालुके घेतां, व प्रधान यांस धरून कैद केलें, हा सेवकाचा धर्म कीं काय? यांत हरामखोरी घडती. पूर्वी मातोश्रीस (ताराबाईस) इमान दिलें तर त्यांपाशीं राहावें, सरकारी कामांत अमर्यादा करूं नये. किंवा ते (संभाजी राजे, ताराबाई वगैरे) हद्दपार जहालियाउपरि तख्ताचे खावंद वडील (शाहू महाराज) यांजकडे येऊन भेटून सर्फराजी (वढती) करून घ्यावी. हें दोन्हीही करणें नसल्यास आम्हांस महाराजांनीं पाठविलें आहे. तुम्हांशीं लढाई करून ठाणीं, किल्ले, प्रांत, तुमचे हातून घेणें प्राप्त आहे. लढाई सुरू जहालियावरि पुन्हा महाराजांची कृपा करून घेऊं म्हणाल तरि कदापि गोष्ट घडणार नाहीं. त्याचा विचार करणें असेल तो आधीं क-

रून सांगून पाठवावें. महाराजांस श्रीभगवान् अनुकूल होऊन पाद-शाही नजरबंदींतून त्यांणीं होऊन ( बादशाहांनीं आपण होऊन ) लावून दिल्हें. राज्य प्राप्त जहालें. आईसाहेब, कनिष्ठ बंधु, पराभव पावले. तेव्हां वडील तख्ताचे खावंद, यांस भेटून कृपा संपादावी हे उत्तम गोष्ट आहे. हें करणें नसल्यास सरकारचे मुलखाची खराबी किल्ल्यांत राहून करणें ठीक नाहीं. मैदानांत आपलें सामानसुद्धां तयारी करून लढाईस यावें." आंग्र्याला हा निरोप पोहोंचला तेव्हां त्यानें विचार केला कीं, "मीं ताराबाईला इमान दिलें होतें, परंतु ती स्वतःच हल्लीं संभाजीच्या कैदेंत आहे, तेव्हां आतां शाहू महाराजांची आपण चाकरी करूं लागलों तर त्यांत कांहीं हरामखोरी होणार नाहीं." त्यानें बाळाजी विश्वनाथास सांगून पाठविलें कीं, "आपण सर्व फौज मागें ठेवून कार्याकारण फौज घेऊन किल्ल्यानजीक यावें, ह्मणजे भेटी होऊन बोलणीं आहेत तीं बोलोन विचार ठरेल तो खरा. आपले विचारें महाराजांची कृपा होय ऐसें करूं[1]." नंतर एकमेकांच्या भेटी होऊन तह ठरला. त्या तहाअन्वयें शाहू महाराजांनीं कान्होजीस कोकणांत १० [2]अवघड व १६ [3]सवंघड किल्ले दिले, व त्यास सरखेल हा किताब देऊन मराठ्यांच्या आरमारावर मुख्य नेमिलें; तेव्हां आंग्र्यानें बहिरोपंत व निळो बल्लाळ यांस सोडलें, राजमाची शिवायकरून शाहूचा घेतलेला प्रांत परत दिला, व संभाजीचा पक्ष सोडून दिला. या तहामुळें श्रीवर्धन वगैरे कांहीं किल्ले शिद्दी बळकावून बसला होता ते आंग्र्याकडे गेले. तेणेंकरून शिद्दी व आंग्रे यांच्यामध्यें तंटा उत्पन्न झाला. बाळाजीनें आपली फौज आंग्र्याचे मदतीस दिली;

---

१ अवतरणांतील मजकूर मल्हार रामरावकृत शाहू महाराजांचे चरित्रांतून घेतला आहे, व एथें बखरींतील भाषा कायम ठेविली आहे. २ खांदेरी, कुलाबा, सुवर्णदुर्ग, विजयदुर्ग, जयगड, देवगड, कनकदुर्ग, फत्तेगड, अवचितगड, व यशवंतगड. ३ बहिरवगड, कोथळा, वैंगटगड, माणिकगड, मिरगड, सागरगड, रसाळगड, पालगड, खारेपाटण, रायगड, राजापूर, अंबर, साठवली, कामतें, श्रीवर्धन व मनरंजन.

त्यामुळें **शिद्दी**चा कांहीं एक इलाज न चालतां त्याला तह करणें भाग पडलें.

अशीं मोठमोठीं कामें करून **बाळाजी विश्वनाथ** इ० स० १७१४ मध्यें **साताऱ्यास** परत आला. त्याचा **साताऱ्यास महाराजांनीं** मोठा सन्मान केला, व **मुख्य** प्रधानकीच्या कामास **बहिरोपंत पिंगळे** गैरलायक मनुष्य आहे असें वाटल्यावरून त्यांनीं **बाळाजी विश्वनाथ** यास आपला मुख्य प्रधान नेमिलें; तसेंच **अंबाजी**-पंत पुरंदरे यास त्याचा मुतालीक नेमिलें, व **रामचंद्र**[१]पंत **भानू** यास **फडनवीस** नेमिलें. जो **बाळाजी विश्वनाथ** सात वर्षांपूर्वीं **धनाजी जा**-धवाजवळ एक लहानसा कारकून होता, तोच एवढ्याशा अवधींत आपल्या आंगच्या गुणांनीं **साताऱ्च्या** राजाचा मुख्य प्रधान झाला. उद्योग केला असतां काय होणार नाहीं?

---

१ हा प्रसिद्ध **नाना फडनवीस** याचा मूळपुरुष होय.

## भाग ५.

# बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची कारकीर्द.

## इ० स० १७१४—१७२०.

इ० स० १७१४ त मराठ्यांची स्थिति.—दमाजी थोरात याचा नाश.—बाळाजी विश्वनाथास पुरंदरचा किल्ला बक्षीस मिळतो.—तो पुणें प्रांताचा बंदोबस्त करतो.—मराठ्यांची भरभराट.—बाळाजीचें महत्व.—त्याच्या वेळचे अष्टप्रधान.—परसोजी भोंसले व हैबतराव निंबाळकर यांचा मृत्यु.—शाहू महाराजांचा स्वभाव व त्यांची दिल्लीच्या बादशाहाशीं वर्तणूक.—त्यांना दहा हजार स्वारांची बादशाहाकडून सरदारी मिळते.—सय्यद बंधूंची वर्तणूक व त्यांचें महत्व कमी करण्याविषयीं दरबारी लोकांच्या खटपटी.—हुसेन अली (सय्यद बंधूंपैकीं एक) याची अजितसिंगावर स्वारी.—सय्यद बादशाहाशीं लढण्याची तयारी करतात.—हुसेन अलीस दक्षिणची सुभेदारी मिळून तो दक्षिणेंत येतो.—फिरुक्शियर हा, दाउदखान पन्नी याला त्याचा नाश करायाला सांगतो.—हुसेन अली दक्षिणच्या सुभेदारीवर असतां मराठ्यांची स्थिति.—तो खंडेराव दाभाड्यावर झुलपिकार बेग यास पाठवितो.—दाभाडे याला शाहू महाराज आपला सेनापति नेमतात.—मराठे मोंगलांच्या मुलखांत आपला सरदेशमुखीचा हक्क बसवितात.—हुसेन अली मराठ्यांशीं तह करतो.—शाहू महाराज हे, बाळाजी विश्वनाथ व दुसरे कांहीं सरदार यांजबरोबर सैन्य देऊन त्यांना हुसेन अलीच्या मदतीकरतां दिल्लीस पाठवून देतात.—सय्यद हे फिरुक्शियर बादशाहास मारून टाकतात.—ते आणखीं दोन बादशाहा दिल्लीच्या तख्तावर बसवितात.—महंमदशाहा बादशाहा.—बाळाजी विश्वनाथ याला चौथाई व सरदेशमुखी यांच्या सनदा मिळतात.—तो शाहू महाराजांची मातुश्री येसूबाई व दुसरीं माणसें मोंगलांचे अटकेंत होतीं त्यांना घेऊन सातार्‍यास येतो.—तो मराठी राज्याच्या जमाबंदीची शिस्त लावतो.—त्या दगदगीमुळें त्याची प्रकृति बिघडते.—इ० स० १७२० त तो मरण पावतो.—त्याचा स्वभाव व त्यानें केलेलीं कृत्यें.—दमाजी गायकवाड यास शाहू महाराज दुय्यम सेनापति नेमतात.

ह्या वेळीं मराठ्यांचें पाऊल पुढें पुढेंच पडत चाललें होतें. बहुतेक कोंकणपट्टी व महाराष्ट्र हे प्रांत त्यांचेच ताब्यांत होते. गुजराथेंत खंडेराव दाभाडे ह्यानें बराच मुलूख काबीज केला होता. अशा रीतीनें

ह्या वेळीं मराठ्यांचा उत्कर्षच होत चालला होता. मराठ्यांमध्यें आपसांत तंटे नसते तर मुसलमानांनीं घेतलेला त्यांचा देश त्यांनीं तेव्हांच परत घेतला असता; परंतु त्यांचे आपसांतील तंटे मोठ्या जारीनें सुरू असल्यामुळें इंगल लोक स्वस्थपणें त्यांची गंमत पहात बसले होते; व प्रसंगविशेषीं ह्या तंट्यांपासून आपला फायदाही करून घेत होते.

**बाळाजी विश्वनाथ** पेशवा झाल्यावर, **शाहू महाराजांनीं मानसिंग मोरे** सेनापति[1] व **हैवतराव निंबाळकर** यांस त्याच्याबरोबर देऊन **दमाजी थोराताच्या** कैदेंतून **सचिवाची** सुटका करण्याकरितां इ० स० १७१९ त त्याला **पुणें** प्रांतीं पाठवून दिलें. आपण एकदम गढीवर हल्ला केला तर तो दुष्ट **सचिवास** कदाचित् ठार मारून टाकील अशी **बाळाजी विश्वनाथ** यास मोठी भीति पडली. यापूर्वी **सचिवाची** आई **येसूबाई** हिनें युक्तीनें आपल्या मुलाची सुटका करावी ह्मणून **बाळाजीस** विनंति केली होती. **बाळाजीनें** प्रथमतः लढाईचा वगैरे कांहींच आविर्भाव न दाखवितां **सचिवाच्या** सुटकेबद्दल मध्यस्थी करण्याकरितां **पिलाजी जाधव** यास **थोराताकडे** पाठवून दिलें. **थोरातानें सचिवाच्या** सुटकेबद्दल पुष्कळ द्रव्य मागितलें. तितकेंही देऊन **बाळाजीनें सचिवाची** मुक्तता केली. नंतर **बाळाजीनें थोराताबरोबर** लढाई सुरू केली. **थोरात** आपल्या गढींतून पेशव्याशीं लढूं लागला. तेव्हां **बाळाजीनें** तोफा लावून ती गढी जमीनदोस्त केली, व **थोरातास** कैद करून तो **साताऱ्यास** घेऊन आला.

**सचिवाची** सुटका केल्यामुळें **येसूबाईनें** ( **सचिवाच्या** आईनें ) कृतज्ञतापूर्वक **बाळाजीस पुरंदरचा** किल्ला, व **पुणें** परगण्यांतील **सचिवाचे** सर्व हक्क इनाम दिले. **बाळाजीस शाहूराजाचे** आज्ञेशिवाय ही देणगी घेतां येईना. तेव्हां त्यानें **महाराजांपाशीं** विनंति केली कीं, "प्रसंगविशेषीं माझ्या मुलांमाणसांच्या संरक्षणाकरितां मला **पुरंदरचा** किल्ला **महाराजांनीं** दिल्यास बरें होईल." त्यावरून **महाराजांनीं** त्या

[1] **चंद्रसेन जाधव** मोंगलांकडे गेल्यावर **शाहू महाराजांनीं मानसिंग मोरे** यास सेनापति नेमिलें.

किल्ल्याची सनद **बा**ळाजीचे नांवची करून दिली. पेशव्यांना पुढें एकामागून एक जे प्रांत **सा**तारच्या राजाकडून मिळत गेले, व ज्याच्यायोगानें पुढें मराठ्यांच्या राज्याचे खरे खरे मालक पाठीमागें राहून सर्व सत्ता पेशव्यांच्या हातांत गेली व **सा**तारचे राजे फक्त नामधारी राजे होऊन वसले, त्याचा ही वरील सनद मूळपाया होय असें **ग्रांट डफ** साहेब ह्मणतात; परंतु ह्या ह्मणण्यांत आह्मांस कांहीं अर्थ दिसत नाहीं. कारण एखाद्या सरदारानें मोठी एखादी कामगिरी बजावल्यास त्याला बक्षीस किंवा जहागीर ह्मणून कांहीं प्रांत देण्याचा मराठी राज्यांत प्रघात होता. अशी खरी गोष्ट असून, **बा**ळाजीनें आपल्या मुलांमाणसांच्या सोईकरितां ह्मणून फक्त **पुरं**दरचा किल्ला मागून घेतला व **शाहू म**हाराजांनीं त्याची मर्दुमकी पाहून तो त्याला दिला, यांत विशेष कांहीं घडलें असें आह्मांस वाटत नाहीं.

सन १७१९ त **स**रलष्कर **है**बतराव **निं**बाळकर, आपणाला **म**हाराजांनीं **से**नापति नेमिलें नाहीं ह्मणून रागावून **गो**दावरीच्या कांठीं जाऊन राहिला; व पुढें मरेपर्यंत **म**हाराजांचा व त्याचा सलोखा झाला नाहीं. ह्या वेळीं **पु**णें प्रांत मोंगलांचा सरदार **बा**जी **क**दम याच्या ताब्यांत होता. त्यास **बा**ळाजी **वि**श्वनाथ यानें वश करून घेऊन तो प्रांत आपल्या ताब्यांत घेतला. प्रथमतः त्या प्रांतांत चोरटे लोकांचा फार उपद्रव होता त्याचा त्यानें बंदोबस्त केला, व पूर्वींची वसूल घेण्याची रीति बंद करून शेतकीस मोठें उत्तेजन दिलें, आणि हळूहळू त्या प्रांताची जमाबंदीही वाढविली.

ह्या सुमारास जिकडे तिकडे मराठ्यांची स्थिति चांगलीच सुधारत चालली होती. पूर्वीं जो एवढा गोंधळ व बेबंदशाही माजली होती ती नाहींशी होऊन **शाहू म**हाराजांच्या अमलाखालीं मराठ्यांची सत्ता इतकी भराभर वृद्धिंगत व्हावी ही गोष्ट मोठी आश्चर्य करण्यासारखी आहे, व प्रथमदर्शनीं अविश्वसनीयही वाटते. परंतु त्यांचे जे आपसांत तंटे लागले होते तेच त्यांची सत्ता विस्तृत करण्यास व त्यांचे आसपासचे शत्रु नाहींतसे करण्यास कारणीभूत झाले असें ह्मटलें

पाहिजे. त्यांची त्या वेळची स्थिति, ज्याप्रमाणें एखाद्या नदीला महापूर येऊन तिच्या ओघाला एकदम मध्येंच प्रतिबंध व्हावा व त्या प्रतिबंधामुळें तिच्या पात्रांत पाणी फुगून त्याचा तुंबारा धरावा, व पुढें जाण्याला वाट न मिळाल्यामुळें पात्रांतील पाणी नदीच्या दोन्ही कांठांवरून वाहायाला लागून त्याच्या योगानें त्या कांठच्या सपाट प्रदेशांत तें पाणी भरून जाऊन त्या प्रदेशाचा त्यानें सत्यनाश करून टाकावा, त्याप्रमाणें होती.

**बाळाजी विश्वनाथाचें** महत्व **सातारच्या** दरबारीं हळू हळू वाढत चाललें होतें. राज्यांतील कोणतीही मोठी गोष्ट त्याच्या मसलतीवांचून होत नसे. **शाहू महाराज** आपल्या राज्यकारभारांत आपण होऊन कोणाशीं वक्रतेनें वागत नसत, व **बाळाजीनेंही** आपल्या सर्व कामांत आपल्या धन्याचाच कित्ता उचलला होता. तो नेहमीं **शिवाजी महाराजांच्या** कायद्यांच्या अनुरोधानें वागत असे. परंतु **संभाजीच्या** वेळेपासून अशी एक चमत्कारिक चाल पडली होती कीं, कोणी एखाद्या सरदारानें स्वपराक्रमानें एखादा प्रांत कावीज केला तर त्या प्रांताचा अधिकार त्या सरदाराला द्यावयाचा. त्यामुळें **बाळाजीही शाहूराजाकडून** अशा प्रकारच्या सनदा पुष्कळांस करून देत असे. परंतु अशानें राज्य बलहीन होतें ही गोष्ट त्या हुशार मंत्र्याच्या लक्षांत कशी आली नाहीं याचें मोठें आश्चर्य वाटतें?

त्या वेळीं **शाहू महाराजांच्या** दरबारांत जे अष्टप्रधान होते त्यांचीं नांवें:—

१ पेशवा अथवा मुख्य प्रधान—**बाळाजी विश्वनाथ.**
२ अमात्य—**अंबाराव बापूराव हणमंते.**
३ सचिव—**नारो शंकर.**
४ मंत्री—**नारोराम रंगराव शेणवी.**
५ सेनापति—**मानसिंग मोरे.**
६ सुमंत—**आनंदराव.**
७ न्यायाधीश—**होनाजी अनंत.**
८ पंडितराव—**मुद्गलभट.**

सेनासाहेब सुभे परसोजी भोंसले, व सरलष्कर हैबतराव निंबाळकर हे याच सुमारास (इ० स० १७१६त) मरण पावले. परसोजीच्या मागें त्याचा मुलगा कान्होजी भोंसले यास महाराजांनीं त्याच्या बापाचे सर्व अधिकार दिले; परंतु हैबतराव निंबाळकर रागानें त्यांच्यापासून निघून गेला होता ह्मणून त्याच्या मुलाला त्यांनीं सरलष्करचा अधिकार न देतां तें पद दावलशी सोमवंशी यास दिलें. हैबतरावाच्या मुलाला या गोष्टीचा राग येऊन त्यानें महाराजांचा पक्ष सोडला व तो निजामउल्मुल्कास जाऊन मिळाला. त्यानें त्याला बारशी व दुसरे कांहीं प्रांत यांची जहागीर करून देऊन आपल्या पदरीं ठेविलें.

शाहू महाराज मोठे चतुर, उदार, व दानशूर होते. त्यांचा धर्मसंबंधी आचारविचार मोठा कडकडीत असे, व ब्राह्मणांवर त्यांची फार भक्ति होती. घांटमाथा व खडकाळ कोंकण यांत त्यांचा जन्म झाला होता, तथापि त्यांच्या आज्याप्रमाणें त्यांना भराभर डोंगर चढून जाणें, मोठमोठ्या मजला करणें, अथवा दाट जंगलामध्यें किंवा पर्वतांच्या खोऱ्यांतून राहणें याची संवय नव्हती. त्यांचें बालपण औरंगजेबाच्या जनानखान्यांत मोठ्या मिजासीनें गेलें होतें, ह्यामुळें मुसलमान लोक जसे मोठ्या ऐषआरामांत व चैनींत आपला काळ घालवितात तशीच महाराजांना संवय लागली होती. एखादे वेळीं, मराठ्यांच्या अंगीं स्वभावतःच जें शौर्य असतें तें त्यांच्या ठिकाणींही दृष्टीस पडे; परंतु साधारणपणें त्यांचा काळ विलास भोगण्यांतच जात असे. त्यांचे प्रधान, सरदार व मानकरी लोक हे त्यांची आज्ञा शिरसा वंद्य करीत असत, व जो तो आपापलें काम मोठ्या दक्षतेनें व नेकीनें करीत असल्यामुळें, व त्या सर्वांवर बाळाजी विश्वनाथासारख्या हुशार व दूरदृष्टि प्रधानाची देखरेख असल्यामुळें, त्यांच्या राज्याचा कारभार अगदीं सुयंत्रपणें चालला होता. या कारणास्तव आपला सर्व कारभार पेशव्यावर सोंपवून ते राज्याच्या दगदगीपासून अलग राहूं लागले. शाहू महाराजांचा मोंगलांच्या दरबारींही फार मोठा मान होता, यामुळें त्यांचे शत्रु त्यांना ने-

हमीं वचकून असत. शिवाजी, संभाजी व राजाराम हे आपण स्वतंत्र आहों असें ह्मणत असत; परंतु शाहू महाराज आपणास दिल्लीच्या बादशाहाचे अंकित ह्मणवीत असत. ते इतर सर्व कामांत आपणास मराठ्यांचा छत्रपति ह्मणवीत असत, परंतु मोंगल बादशाहांशीं जे त्यांचे व्यवहार होत त्या सर्वांत ते आपणाला बादशाही अमलांतील एक जमीनदार अथवा मुख्य देशमुख असें ह्मणवीत असत.

मागें सांगितल्याप्रमाणें सालपें घांटाजवळ मराठ्यांची व मोंगलांची चकमक झडून जो तह ठरला त्यानंतर फिरुक्शियर बादशाहानें शाहू महाराजांस १० हजार स्वारांचा सरदार नेमिलें; परंतु निजामउल्मुल्काच्या दक्षिणेंतील पहिल्या कारकीर्दीच्या शेवटच्या १७ महिन्यांत त्यानें मराठ्यांवर आपला चांगला दरारा बसविला होता, यामुळें त्याच्यापुढें मराठ्यांचें विशेष कांहीं चालेना.

फिरुक्शियर इ० स० १७१३ त गादीवर आल्यानंतर त्यानें अबदुल्ला यास आपली वजिरी दिली, व हुसेन अल्ली यास सेनापति नेमिलें हें मागें सांगितलेंच आहे. पुढें बादशाहाचा हलकट स्वभाव, तसेंच त्यानें सय्यदांची राज्यावर बसण्यापूर्वी मदत मागितली त्या वेळची त्याची वर्तणूक, आणि त्याला गादीवर बसविण्याला मुख्य मदत सय्यदांची होती, ह्या एकंदर गोष्टींवरून सय्यदांस असें वाटूं लागलें कीं, बादशाहाचा पोकळ डामडौल ठेविला, आणि त्याच्या प्रीतींतील लोकांचे हेतु पुरविण्याजोगें सामर्थ्य त्यास राही इतकी दौलत व अधिकार देण्याचें त्याच्या हातांत ठेविलें, ह्मणजे राज्यांतील वास्तविक अधिकार आपणांस चालवायास सांपडेल. परंतु बादशाहा व त्याच्या मर्जींतील लोक एवढ्यानें संतुष्ट राहिले नाहींत. बंगाल्यांत ढाका ह्मणून एक शहर आहे तेथील काजीवर त्याचा मुख्य इतबार असे. बादशाहानें त्यास 'मीर जुमला' असा किताब देऊन आपल्याजवळ ठेविलें. या मनुष्याची बुद्धि विशाल नव्हती, तथापि फिरुक्शियरवर आपला पगडा बसविण्यास तो योग्य होता; कारण बादशाहास स्वतः एखादी मोठी मसलत समजण्याची शक्ति नसून, दुसऱ्याच्या मदतीशिवाय एखादी

लहानशी मसलत देखील पार पाडण्यासारखी त्याच्या ठिकाणीं निश्चयात्मक बुद्धि नव्हती.

बादशाहास स्वतः अधिकार चालविण्याचें सामर्थ्य नव्हतें, यामुळें सय्यद तो अधिकार चालवीत होते त्यांच्याविषयीं त्याचे मनांत वाईट भरवून देण्यास त्याच्या जवळच्या लोकांस विशेष कठिण पडलें नाहीं. शिवाय सय्यदांची वर्तणूक मोठी दराऱ्याची असे, यामुळें त्यांचा अधिकार कोणत्या तऱ्हेनें नाहींसा होईल या गोष्टीचा विचार करणें बादशाहास व त्याच्या प्रीतींतील मंडळीस जरूर पडलें.

मग त्या दोघां भावांची फूट पाडून त्यांस दुर्बल करावें अशी बादशाहाच्या गुप्त दरबारांत प्रथमतः मसलत ठरली. तेव्हां बादशाहानें हुसेन अल्लीस मारवाडचा राजा अजितसिंग याजवर पाठविलें; आणि आंतून त्या रजपूत राजाशीं अशी मसलत केली कीं, "तुह्मीं हुसेन अल्लीस लढाईत चांगला हात दाखवावा, व त्याचा पुरा फडशा करून टाकावा. या गोष्टीनें मला खरोखर जितकें समाधान होईल तितकें दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें होणार नाहीं." आपण फार दिवस बाहेर राहिलों तर आपणावर कांहीं तरी निराळींच विघ्नें येतील ही गोष्ट हुसेन पूर्णपणें समजून होता. तेव्हां त्यानें तें प्रकरण लढाईचा विशेष प्रसंग न आणतां तसेंच मिटविलें. त्यानें अजितसिंगाशीं जो तह केला त्यांत अजितसिंगाचें स्वतःचेंच हित झालें; तेव्हां अर्थात् तो बादशाहाच्या हिताकरितां आपलें स्वतःचें कां नुकसान करून घेईल? ह्या तहांत अजितसिंगानें आपली मुलगी बादशाहास देण्याचें कबूल केलें होतें.

हुसेन अल्ली दरबारांत परत आल्यावर तो व बादशाहा या उभयतांचा एकमेकांविषयीं विशेष बेभरंवसा झाला. फिरुक्शियरमध्यें ज्याप्रमाणें शहाणपण व निश्चय या दोन गुणांचा अभाव होता, त्याचप्रमाणें विश्वास व सत्व हे दोन गुणही त्याच्या अंगांत वसत नव्हते. त्यामुळें त्याच्याजवळ राहणारांस आपण आतां निर्धास्त आहों असें मानण्यास मुळींच जागा नव्हती.

बादशाहाचे मनांत आपले प्राण घ्यावे असें आहे हें सय्यदांस माहीत होतें. एके दिवशीं त्यांनीं आपल्या वाड्याभोंवतीं लष्कर गोळा करून दरबारास येत नाहीं ह्मणून बादशाहास निरोप पाठविला. त्या वेळीं उभयपक्षांच्या लढाईच्या तयारीमुळें दिल्लींत मोठा गोंधळ माजून गेला व पुष्कळ लोकांस इजा झाली. तेव्हां त्या दोन पक्षांची एक लढाई तरी व्हावी, किंवा जो पक्ष दुर्बल असेल त्यानें दुसऱ्यास शरण तरी यावें, असे तो तंटा मिटविण्याचे दोन मार्ग उरले. मग बादशाहास लोकांनीं आग्रह केल्यावरून त्यानें बालेकिल्ल्याचे दरवाजे उघडून त्यांत सय्यदांच्या पहारेकरी लोकांस येऊं दिलें, व इकडे सय्यद बादशाहाशीं समजुतीचे ठराव करण्याकरतां त्याच्या दरबारांत आले. नंतर असा ठराव झाला कीं, "बादशाहानें मीर जुमला यास बहार प्रांताचा सुभेदार नेमून दरबारांतून काढून टाकावें, अबदुल्लाखान यानें पूर्वीप्रमाणें वजिरीचें काम चालवावें, व हुसेन अल्ली यानें दक्षिणच्या सुभ्याचें काम घेऊन लागलेंच तिकडे निघून जावें."

नंतर इ० स० १७१६ च्या आरंभीं हुसेन अल्ली दक्षिणेंत[1] आपल्या सुभेदारीवर आला. परंतु आपण फार दिवस बाहेर राहिलों तर बादशाहा मीर जुमला यास परत बोलावून आपल्याविरुद्ध खटपटी सुरू करील असें त्यास माहीत होतें; ह्मणून त्यानें जातांना बादशाहास सांगितलें कीं, "माझ्या भावाच्या अधिकाराची घालमेल करण्याचा यत्न चालला आहे असें वर्तमान जर माझ्या कानावर आलें, तर तें समजल्यापासून वीस दिवसांच्या आंत मी आपल्या फौजेनिशीं दिल्लीस येईन."

सय्यदांस बादशाहानें अशा रीतीनें एकमेकांपासून दूर केलें खरें, परंतु तेवढ्यानें त्याचें समाधान झालें नाहीं. दाऊदखान पन्नी त्या वेळीं गुजराथेंत असून त्याच्या धाडसाविषयीं सर्वत्र प्रसिद्धि होती, त्याला बादशाहानें आपला हेतु साधण्याकरतां हाताशीं धरलें. दाऊ-

---

१ हुसेन अल्लीची दक्षिणच्या सुभेदारीवर नेमणूक केली तेव्हां निजामउल्मुल्कास मुरादाबाद एथें एका कमी दर्ज्याचे कामगिरीवर पाठविलें.

दखान हा झुलपिकारखानाचा जुना सोबती होता, व हुसेनानें झुलपिकारखानाचा नाश केला असल्यामुळें त्याचा नाश हा मोठ्या उत्सुकतेनें करील असें बादशाहास साहजिकच वाटत होतें. बादशाहानें त्याला गुप्त रीतीनें असा हुकूम पाठविला कीं, "तुह्मीं एकदम खानदेशांत जावें, जेवढें लष्कर जमा करवेल तेवढें बरोबर घ्यावें, मराठे लोक व दक्षिणेंतील दुसरे सरदार लोक यांच्याजवळ चालेल तेवढें वजन चालवावें, व हुसेन अल्लीस कुमक करण्याचें मिष दाखवून साधेल त्या रीतीनें त्याचा नाश करावा; आणि हें काम तुह्मीं शेवटास नेल्यास तुह्मांस दक्षिणची सुभेदारी देऊं." हा हुकूम पोहोंचल्यावर दाऊदखानानें लगेच तयारी केली, व तो हुसेन अल्लीवर चालून गेला. प्रथमतः त्यानें हुसेन अल्लीच्या सैन्यावर अशा जोरानें हल्ला केला कीं, त्याच्या सैन्यांत जिकडे तिकडे गोंधळ होऊन गेला, व तें सैरावैरा पळत सुटलें. त्या सरसा दाऊदखान हा आपल्याबरोबर निवडक २०० स्वार घेऊन खुद्द हुसेनावर धांवून गेला. परंतु ह्या हातघाईच्या प्रसंगीं दाऊदखानाच्या मस्तकांत गोळी लागली व तो तेथच्या तेथें ठार झाला (इ० स० १७१६ ); त्यामुळें त्याच्या सैन्यानें अजीबात पळ काढला, व हुसेन अल्ली विजयी झाला. बादशाहाचें ह्या गोष्टीस आंतून आंग असलें पाहिजे असें हुसेनास वाटलें, परंतु त्या वेळीं त्यानें ती गोष्ट तशीच आपल्या मनांत ठेविली.

जोंपर्यंत निजामउल्मुल्क दक्षिणच्या सुभेदारीवर होता तोंपर्यंत त्यानें आपल्या दराऱ्यानें व शहाणपणानें मराठ्यांची वाढ बंद केली होती. परंतु पुढें फिरुक्शियरनें निजामउल्मुल्कास त्या अधिकारावरून काढून हुसेन अल्लीस त्याच्या जागीं नेमिलें, यामुळें पूर्वींचा जो बंदोबस्त होता तो नाहींसा झाला, व मराठे पूर्वींप्रमाणें टोळ्या करून मोंगलांचा देश लुटूं लागले. कांहींनीं तर मोंगलांचीं कित्येक ठिकाणें बळकावून तेथें किल्ले बांधले, व तेथून ते भोंवतालचा प्रदेश लुटूं लागले. खंडेराव दाभाड्यानें तर मोंगलांना अगदीं भंडावून सोडलें. त्याच्या ताव्यांत खानदेशामध्यें एका ओळीनें पुष्कळ तटबंदी

गांव होते. त्यांतून त्यानें लमाण व दुसरे फिरस्ते लोक यांवर हल्ले करून उत्तरहिंदुस्तानांतून व दक्षिणेंतून सुरतेस जाण्याचा मोठा रस्ता बंद करून टाकला होता.[1]

दाऊदखानाचा पराजय झाल्यानंतर हें दाभाड्याचें मोठें विघ्न नाहींसें करण्याकरितां हुसेन अल्लीनें आपला सरदार झुलपिकार बेग याच्याबरोबर ८ हजार फौज देऊन त्याला त्याचा नाश करण्याकरतां पाठवून दिलें. दाभाड्यानें पहिल्यानें लढाईचें मिष करून मोंगलांस आपल्या अंगावर घेतलें, व नंतर पळ काढला. दाभाड्याचे लोक लहान लहान टोळ्या करून डोंगरांतून पळून गेले. मोंगल लोक त्यांचा पाठलाग करीत करीत त्यांच्या मागें चालले. नंतर मोंगलांची जिकडे तिकडे सर्व डोंगरभर पांगापांग झाल्यावर दाभाड्यानें आडमार्गानें येऊन त्यांच्यावर हल्ला केला व झुलपिकार बेग व त्याचे बहुतेक लोक ह्यांस कापून काढलें; आणि जे कांहीं शिलक राहिले त्यांचे घोडे, हत्यारें व कपडे हीं नागवून घेतल्याशिवाय मराठ्यांनीं त्यांना जाऊं दिलें नाहीं!

हें अपजयाचें वर्तमान हुसेन अल्लीस समजलें तेव्हां त्यानें आपला दिवाण महकूमसिंग व चंद्रसेन जाधव यांजबरोबर मोठी फौज देऊन त्यांना दाभाड्यावर पाठवून दिलें. खंडेराव दाभाडे यानें सरलष्कर सोमवंशीं यास आपल्या मदतीस बोलाविलें. नंतर मराठ्यांची व मोंगलांची अहमदनगर एथें फार मोठी लढाई झाली. तींत दोन्ही पक्षांचे लोक आपलाच जय झाला असें ह्मणूं लागले; परंतु इतकी गोष्ट खरी कीं, मोंगलांस अहमदनगराहून औरंगाबादेस परत जावें लागलें. खंडेराव दाभाडे बरेच दिवस साताऱ्यास आला नव्हता, तो ह्या लढाईनंतर साताऱ्यास महाराजांस येऊन भेटला. त्या वेळीं सेनापतीच्या कामावर मानसिंग मोरे होता; परंतु त्या जाग्याला तो गैरलायक मनुष्य आहे असें महाराजांस वाटल्यावरून त्यांनीं त्याला दूर करून त्याची जागा खंडेराव यांस[2] दिली.

---

१ वरील सर्व मजकूर एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाच्या इतिहासांतून घेतला आहे. २ ग्रांटडफ.

ह्या वेळीं मराठ्यांचें पाऊल जोरानें पुढें पडत चाललें होतें. त्यांना प्रत्येक कामांत यश येत होतें, त्यामुळें त्यांची इच्छाही जास्त वाढत चालली होती. पूर्वी दाऊदखानानें त्यांस दक्षिणच्या सहा सुभ्यांची चौथाई दिली होती; परंतु आतां त्यांनीं आपला सरदेशमुखीचाही हक्क जिकडे तिकडे बसविण्यास सुरुवात केली.

ह्या वेळीं हुसेन अल्ली मोठ्या पेंचांत पडल्यासारखा झाला होता. एकीकडे मराठ्यांनीं त्याच्या मुलखावर वरचेवर हल्ले करून त्याला "दे माय धरणी ठाय" करून टाकलें होतें, व दुसरीकडे दिल्ली एथें तो व त्याचा भाऊ अवदुल्ला यांच्या नाशाची खटपट मोठ्या जारीनें सुरू होती. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं त्याला शाहू महाराजांबरोबर तह केल्याशिवाय मराठ्यांच्या लचांडांतून सुटायाला दुसरी तोडच उरली नाहीं. तेव्हां त्यानें, शंकराजी मल्हार[1] ह्मणून त्याचा एक विश्वासू वकील होता त्याला महाराजांकडे तह करण्याकरतां पाठवून दिलें. पुढें तो व शाहू महाराज यांच्यामध्यें तहाचीं अशीं कलमें ठरलीं कीं, "दिल्लीच्या बादशाहानें दक्षिणेंतील सहा सुभे, व तंजावर, त्रिचनापल्ली व ह्मैसूर ह्या राज्यांची चौथाई (जमाबंदीचा चतुर्थांश) व सरदेशमुखी (सर्व उत्पन्नाचा दशांश) मराठ्यांस द्यावी; स्वराज्याची[2] सनद करून द्यावी, शिवनेरी व त्रिंबक हे किल्ले परत द्यावे, शिवाय गोंडवण व वऱ्हाड यांतील जो मुलूख सेनासाहेब सुभे

---

१ हा पूर्वी शिवाजी महाराजांजवळ एक कारकून होता. पुढें राजारामानें त्यास सचिव केलें. परंतु राजारामास मोंगलांनीं जिंजी एथें वेढा घालून कोंडलें होतें त्या वेळीं शंकराजी मल्हार त्रासून काशीस निघून गेला. पण हा कांहीं दिवस तेथें राहिल्यावर त्याला रिकामें बसणें आवडेना म्हणून तो काशीहून निघाला, व त्या वेळीं हुसेन अल्ली दक्षिणेंत आपल्या सुभेदारीवर यावयास निघाला होता, त्याच्या पदरीं नोकरी धरून तो आपल्या धन्याबरोबर दक्षिणेंत आला.—ग्रांटडफ. २ स्वराज्य म्हणजे खुद्द शिवाजी महाराजांच्या अधिकाराखालीं असलेला प्रांतः ह्मणजे पुणें, सुपें, इंदापूर, वांई, मावळ, सातारा, कऱ्हाड, खटाव, माण, फलटण, मलकापूर, तारळें, पन्हाळा, अझेरा, जुन्नर, कोल्हापूर, कोंकण, व तुंगभद्रेच्या उत्तरेचे कांहीं परगणे.—काव्येतिहाससंग्रह

कान्होजी भोंसले यानें घेतला आहे तो द्यावा, आणि शाहू महाराजांची मातुश्री येसूबाई व दुसरीं त्यांच्या कुटुंबाचीं माणसें यांस दिल्लीहून पाठवून द्यावें; व याप्रमाणें सर्व कामें झालीं तर शाहू महाराजांनीं दरसाल १० लाख रुपये बादशाहास खंडणी द्यावी, सरदेशमुखीबद्दल मुलखाचा बंदोबस्त ठेवावा, चोरटे लोकांचा उपद्रव बंद करावा, व चोरी झाली असतां जें नुकसान होईल तें भरून द्यावें; चौथाईबद्दल १५००० फौजेनिशीं त्यांनीं बादशाहाची नोकरी करावी, व त्याच्या सुभेदारांस लागेल त्या ठिकाणीं मदत करावी; त्याचप्रमाणें कोल्हापूरचा राजा संभाजी याचे लोक कर्नाटक, विजापूर, व हैदराबाद या प्रांतांत फार उपद्रव करीत असत त्यांचा त्यांनीं बंदोबस्त करावा, व त्या संबंधानें रयतेचें जें नुकसान होईल तें भरून द्यावें." शाहू महाराजांचीं बहुतेक कलमें हुसेन अल्लीनें मान्य केलीं. हा तह इ० स० १७१७ त झाला.

नंतर महाराजांनीं हुसेन अल्लीच्या मदतीस आपली १० हजार फौज दिली. ह्या फौजेंत संताजी व परसोजी भोंसले ( हे कान्होजी भोंसले सेनासाहेब सुभे याचे जवळचे नातेवाईक होते ), उदाजी पवार व दुसरे लहान लहान मराठे सरदार बरेच होते. फिरुक्शियर हा, हुसेन अल्लीनें मराठ्यांशीं जो तह केला होता तो मान्य करीना; व बादशाहाच्या पक्षाची जी मंडळी होती तिनें सय्यदांस ठार मारण्याचा विचार केला. राजा जयसिंग, निजामउल्मुल्क, सादतखान, महंमद अमीन वगैरे मंडळी ह्या विचारांत सामील होती. तेव्हां आतां लढाई झाल्याशिवाय खास रहात नाहीं असें हुसेन अल्लीस वाटून त्यानें शाहू महाराजांपाशीं ज्यास्त मदत मागितली. महाराजांनीं आपला फायदा करून घेण्याची ही संधि फुकट जाऊं दिली नाहीं. त्यांनीं बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे यांच्याबरोबर बरेंच लष्कर देऊन त्यांना सय्यदाच्या मदतीस पाठवून दिलें. ह्या सैन्याच्या दरदिवसच्या खर्चाबद्दल, नर्मदानदी उ-

---

१ ग्रांटडफ.

तरल्यापासून तों तें सैन्य परत **दक्षिणेंत** येई तोंपर्यंत कांहीं नियमित रकम द्यावयाचें **हुसेन अल्लीनें** कबूल केलें होतें. नंतर **हुसेन अल्ली** ह्या सर्व सैन्यासह **दिल्लीस** जावयास निघाला. **बाळाजी विश्वनाथ दिल्लीस** जावयास निघाला त्या वेळीं **महाराजांनीं** त्याला, **दौलताबाद** व **चांदा** हे दोन किल्ले, व **गुजराथ** व **माळवा** या प्रांतांत **चौथाई** वसविण्याचा हक्क हे हरप्रयत्नानें संपादन करावे ह्मणून सांगितलें होतें.

नंतर हें सर्व सैन्य **दिल्लीस** जाऊन पोहोंचलें. बादशाहाच्या पक्षांच्या कांहीं मंडळीनें सैन्य गोळा करून **हुसेन अल्लीच्या** सैन्यावर हल्ला केला, यामुळें त्याला मोठा राग येऊन त्यानें आपली फौज शहरांत नेली, व त्या लोकांची कत्तल करून टाकली. बादशाहा जनानखान्यांत लपून बसला होता, तेथून त्याला बाहेर काढून **सय्यदांनीं** इ० स० १७१९ सालीं गुप्तपणें मारून टाकलें.[1] पुढें त्यांनीं **रफी उद्दर्जात** व **रफी उद्दवला** अशा दोघां मुलांस गादीवर बसविलें, परंतु ते दोघेही सात महिन्यांचे आंत रोग होऊन मरण पावले. नंतर त्यांनीं **मोअज्जीम बादशाहाचा** नातू व **जाहांदरशाहाचा** मुलगा **रोषन अख्त्यार** ह्याला **महंमदशाहा** असे नांव देऊन **दिल्लीच्या** तक्तावर बसविलें, व राज्याचा सर्व कारभार आपल्या हातांत ठेविला.

**महंमदशाहा** गादीवर बसे तोंपर्यंत **बाळाजी विश्वनाथ** आपल्या सैन्यासह **दिल्लीस** राहिला होता. **फिरुक्शियरला** मारण्याचे पूर्वी मोंगल लोकांनीं दिल्लींत जो बंडावा केला, त्यांत त्यांनीं **बाळाजी महादेव भानू**,[2] **संताजी भोंसले** व मराठ्यांचे १५०० लोक

---

१ एल्फिन्स्टनकृत हिंदुस्तानाचा इतिहास. २ **भानूंच्या** मरणाबद्दल एक दंतकथा आहे ती अशी कीं, एके दिवशीं **फिरुक्शियर बादशाहानें** मोठा दरबार भरवून मराठ्यांस **चौथाई** व **सरदेशमुखी** यांच्या सनदा दिल्या; परंतु ती गोष्ट दरबारच्या लोकांस न आवडून त्यांनीं, **बाळाजी** सनदा घेऊन निघाला ह्मणजे वाटेंत त्याच्यावर हल्ला करण्याचा बेत केला. हें कारस्थान **बाळाजीस** कळलें तेव्हां त्यानें **भानूंस** त्याची तोड विचारली. तेव्हां त्या महात्म्यानें त्याला अशी मसलत दिली कीं, 'मी तुमच्या पालखींत बसून जातों, आपण सनदा काखेंत

ठार मारले. परंतु त्या संबंधानें मराठ्यांचें नुकसान सय्यदांनीं भरून दिलें; त्याचप्रमाणें शाहू महाराजांची मातुश्री व त्यांच्या कुटुंबाचीं दुसरीं मनुष्यें बाळाजी विश्वनाथाच्या स्वाधीन केलीं; चौथाई, सरदेशमुखी व स्वराज्य ह्यांच्या सनदा बादशाही सहीशिक्यानिशीं त्यांच्या स्वाधीन केल्या; तसेंच भीमेच्या उत्तरेकडील मुलखाबद्दल ताथवड्यापासून मच्छिंद्रगडपर्यंत जे किल्ले आहेत त्यांच्या पलीकडचा थेट पंढरपूरपर्यंतचा मुलूख शाहू महाराजांस दिला; औरंगजेबानें शाहू महाराजांचीं दोन लग्नें केलीं त्या वेळीं जो मुलूख त्यानें महाराजांस दिला होता तोही दिला; शिवाय येरला, माळ, व निरा या नद्या ज्या प्रदेशांतून वाहत जातात तो सर्व प्रदेश महाराजांस मिळाला. फक्त खानदेशांतील मराठ्यांचीं ठाणीं, त्रिंबकचा किल्ला व त्याच्या आसपासचा मुलूख, व वर्धा व तुंगभद्रा या नद्यांच्या दक्षिणेस मराठ्यांनीं जो मुलूख जिंकून घेतला होता तेवढा मात्र त्यांना प्राप्त झाला नाहीं. कान्होजी भोंसले यानें वऱ्हाडांत जो मुलूख काबीज केला होता तो, व गुजराथ व माळवा ह्या प्रांतांत चौथाई बसविण्याचा हक्क ह्यांचीही सनद ह्या वेळीं शाहू महाराजांस मिळाली असें मराठे ह्मणतात; परंतु जरी कदाचित् ते हक्क तुह्मांस देऊं असें त्या वेळीं बाळाजीस सय्यदांनीं सांगितलें असलें, व जरी बाळाजीनें ती सनद आणण्याकरतां, आपण दक्षिणेंत निघून आल्यावेळीं देवराव हिंगणे ह्याला दिल्लीच्या दरबारीं ठेविलें असलें, तरी पुढील एकंदर हकीकतीवरून ती सनद त्या वेळीं मराठ्यांस मिळाली नाहीं असें सिद्ध होतें, व बादशाहानें मराठ्यांस ज्या सनदा करून दिल्या त्यांतही ह्या संबंधाचा कोठेंच उल्लेख नाहीं.

---

मारून पाई निघून जावें.' ही मसलत बाळाजीस पसंत पडून तो आडमार्गानें सनदा घेऊन आपल्या गोटांत आला; भानू पालखींत बसून जात असतां त्यांच्यावर दिल्लींतील लोकांनीं, हा बाळाजीच आहे असें समजून हल्ला केला व त्यांना ठार मारलें. ह्या गोष्टीस कोठें आधार नाहीं; परंतु ही जर खरी असेल, तर अशा प्रकारचीं स्वामिभक्तीचीं उदाहरणें फारच थोडीं सांपडतील असें ह्मटलें पाहिजे!

**बाळाजी विश्वनाथ दिल्लीस** गेला त्या वेळीं त्यानें **अंबाजीपंत पुरंदरे** यास आपला मुतालीक नेमून त्याच्या स्वाधीन आपलें शिक्का-मोर्तब करून ठेविलें होतें, व **बाळाजी** परत येईपर्यंत त्यानें तें काम मोठ्या दक्षतेनें केलें. **महाराजांच्या** कुटुंबाचीं मनुष्यें व वर सांगितलेल्या हक्कांच्या सनदा घेऊन मोठ्या विजयानें **बाळाजी साताऱ्यास** परत आल्यावर त्यानें आपलें लक्ष राज्याची अंतस्थ स्थिति सुधारण्याकडे लाविलें. त्या वेळीं राज्याच्या जमाबंदीची कांहींच शिस्त ठरलेली नव्हती, तसेंच एकंदर वसुलपैकीं कोणाला काय भाग द्यावयाचा त्याचाही नियम ठरला नव्हता; यामुळें वारंवार तंटे उपस्थित होत. **बाळाजी विश्वनाथानें** एकंदर जमाबंदीखात्याची तपासणी केली, व अव्याहत श्रम घेऊन अक्कलहुशारीनें त्या संबंधाचे नवीन ठराव करून टाकले. त्यामुळें पूर्वीं जमाबंदीच्या संबंधानें जी अव्यवस्था होती ती सर्व नाहींशी होऊन राज्यांत स्वस्थता झाली. ते ठराव एणेंप्रमाणें:—

(१) "**सरदेशमुखी**"चें उत्पन्न—हें **राजाचें** वतन, यावर गादीचे मालकाशिवाय दुसऱ्या कोणाचा हक्क नाहीं.

(२) बाकी सर्व हक्क मिळून जें उत्पन्न तें "**स्वराज्य.**"

(अ) यांतील शेंकडा २५ प्रमाणें विभाग गादीचे मालकाचा. याचें नांव "**राजबाबती.**"

(आ) बाकी शेंकडा ७५ उरले. तो "**मोकासा.**" यापैकीं साहोत्रा (सर्व "**स्वराज्या**"पैकीं शेंकडा ६ प्रमाणें) विभाग **पंत सचिव** यांचा.

(इ) बाकी शेंकडा ६९ राहिले. तो "**ऐन**" **मोकासा.** यापैकीं "**नाडगौडा**" ("**स्वराज्या**"वर शेंकडा ३ प्रमाणें) विभाग. तो राजाचे इच्छेनुरूप पाहिजे त्यास द्यावा.

(ई) बाकी शेंकडा ६६ उरले. ते निरनिराळे सरदार लोकांस जहागिरी देण्यांत खर्च व्हावे.

(३) "राजबाबती" वसूल करण्याचें काम पेशवे, प्रतिनिधि व सचिव यांजकडे असावें.

"मोकासा" सचिव यांणीं वसूल करून घ्यावा; व लांबलांबच्या गांवीं हा वसूल उत्पन्न करण्याकरतां राजानें आपले कामगार पाठवावे.

"नाडगौडा" ज्याला दिला असेल त्यानें वसूल करावा.

"जहागीर" ज्याची त्यानें वसूल करावी.

(४) सरदार लोकांस एकमेकांच्या मुलखांत त्या त्या मुलखाच्या उत्पन्नाच्या विभागावर, किंवा तेथील गांवच्या उत्पन्नावर कांहीं हक्क मिळावे[१].

अशी उत्पन्न विभागण्याची व वसूल करण्याची पद्धत घातल्यामुळें मराठे सरदारांत एकाचा फायदा तो दुसऱ्याचा असें झालें. तसेंच त्यांच्यांत त्या वेळीं फाटाफूट होऊन जी बंडाळी चालली होती ती बहुतेक बंद होऊन त्यांचे ते हक्क जिकडे तिकडे वाढविण्यास त्यांना ज्यास्त उत्तेजन आलें. मराठ्यांच्या राज्यविस्ताराच्या पारंब्या जिकडे तिकडे लवकरच फुटूं लागल्या ह्याचें कारण वरील शहाणपणाची पद्धतच होय. ही पद्धत यापूर्वी अंशतः चालू होती, परंतु ती पूर्ण दशेस आणून सुरळीत रीतीनें चालू करण्याचें श्रेय बाळाजी विश्वनाथ यालाच दिलें पाहिजे.

परंतु वर सांगितलेली व्यवस्था करण्याला बाळाजी विश्वनाथाला फार दगदग सोसावी लागली, व त्यामुळें त्याची प्रकृति बिघडली. तो दिवसेंदिवस अधिक अधिक क्षीण होत चालला. नंतर हवा पालटण्याकरतां ह्मणून तो महाराजांचे आज्ञेनें सासवडास येऊन राहिला. परंतु त्या ठिकाणींही त्याच्या प्रकृतीस आराम न पडतां त्याचें

१ वरील मजकूर काव्येतिहाससंग्रहापैकीं बाळाजी विश्वनाथ पेशवे यांच्या बखरींतून घेतला आहे.

दुखणें वाढत गेलें, व शेवटीं इ० स० १७२० च्या अक्टोबर[1] महिन्यांत त्याच्यावर मृत्यूचा घाला येऊन पडला.

इ० स० १७०८ त **शाहू म**हाराज गादीवर बसले, तेव्हांपासून **बा**ळाजी **वि**श्वनाथानें त्यांची एकनिष्ठपणें सेवा केली, व आणीबाणीच्या प्रसंगीं कधीं लढाया करून व कधीं आपली मुत्सद्दीपणाची अक्कल खर्चून त्यानें **म**हाराजांची बाजू मोठ्या नेटानें राखली. प्रथमतः तो एक लहानसा कारकून होता. नंतर हळूहळू तो आपल्या लोकोत्तर बुद्धीच्या प्रतापानें प्रसिद्धीस येऊं लागला. तो कित्येक लढायांत प्रमुख होता; त्यानें मोठमोठ्या राजकारणाच्या मसलती केल्या, व मोठे परिश्रम करून **शाहू म**हाराजांच्या राज्यांतील बंडावा मोडून टाकून लोकांचें एकचित्त केलें. पुढें **म**हाराजांची मर्जी त्याच्यावर सुप्रसन्न होऊन त्यांनीं त्याला आपला पेशवा अथवा मुख्य प्रधान नेमिलें. त्यानें मोठ्या मर्दुमकीनें चोरटे लोकांचा बंदोबस्त करून प्रजेचें चांगल्या रीतीनें पालन केलें, मोंगलांच्या दरबारांत आपल्या धन्याची प्रतिष्ठा वाढविली, **म**हाराजांचें कुटुंब **दि**ल्लीस अटकेंत होतें तें सोडविलें, मोंगलांपासून **चौ**थाई, **स**रदेशमुखी व **स्व**राज्य यांच्या सनदा मराठ्यांस आणून दिल्या, राज्याच्या वसुलाच्या संबंधानें नवीन नियम घालून दिले, व सर्व सरदार लोकांच्या नेमणुका व वेतनें कायमचीं करून दिलीं. अशा प्रकारचीं महत्वाचीं कामें त्यानें फारच थोड्या काळांत केलीं; यावरून त्याची बुद्धि, दक्षता, तारतम्य, दूरदृष्टि व धैर्य हीं कशीं होतीं याची सहज कल्पना करतां येईल.

**बा**ळाजी **वि**श्वनाथाच्या मृत्यूचें वर्तमान **सा**तार्‍यास येऊन पोहोंचलें त्या वेळीं शहरांत मोठा हाहाकार होऊन गेला. **म**हाराजांना तर आज आपला **उ**जवा हातच तुटून पडला असें वाटूं लागलें. परंतु

---

१ पुणें दफ्तरांतील एका दाखल्यावरून तो सन १७२१ च्या एप्रिल महिन्यांत वारला असें दिसून येतें. परंतु ती चुकी आहे. **बा**जीराव **ब**ल्लाळ याला पेशवाईचीं वस्त्रें पुढें सात महिन्यांनीं मिळालीं यावरून त्याच्या मृत्यूची तारीख पुढें गेली असावी असें वाटतें.—**ग्रांटडफ.**

राजा असो किंवा रंक असो, मृत्यु कोणाला चुकला आहे असें नाहीं, असें मनांत आणून त्यांना आपलें समाधान करून घ्यावें लागलें.

राजा कितीही हुशार व दक्ष असला तरी त्याला मंत्रीही हुशारच पाहिजे; कारण राज्याचीं बहुतेक सूत्रें ह्या मंत्र्याच्याच हातांत असतात. मंत्री हा राजा व प्रजा यांच्या मधला वकील आहे; तेव्हां प्रजेचें सुखदुःख ह्या वकिलावर बरेंच अवलंबून असतें. तशांत **शाहू महाराजांसारख्या** राजविलासी राजाच्या राज्यांत तर चतुर प्रधानाशिवाय राज्यकारभार कधींही सुरळीत चालला नसता. **शाहू महाराज** राज्यकारभारांत विशेष लक्ष घालीत नसत याबद्दल दोष त्यांना तरी काय ह्मणून द्यावा? कारण ते फक्त ६ वर्षांचे होते तेव्हां त्यांना **औरंगजेबानें** धरून नेलें. तेव्हांपासून २९ वर्षांचे होत तोंपर्यंत ते बादशाही जनानखान्यांत लहानाचे थोर झाले होते. तशांत **बेगमेनें** त्यांना आपले पुत्र असें मानिलें होतें. मग काय विचारतां? भरगच्ची गाद्या, गिरद्या, उशा, यांचा नेहमीं उपभोग घेत ते चैनीनें पडले होते. बादशाहाच्या कैदेंतून सुटल्यावर थोडीं वर्षेंपर्यंत त्यांनीं कांहीं हालचाल केली; परंतु त्या दगदगींतून केव्हां सुटेन असें त्यांना झालें होतें, व **बाळाजी विश्वनाथासारख्या** खंबीर पुरुषाच्या हातीं राज्याची लगाम दिल्यावर ते पूर्वींप्रमाणें राजविलासांत राहूं लागले. असो. **बाळाजी विश्वनाथ** वारल्यावर त्याचा थोरला मुलगा **बाजीराव** ह्याला वस्त्रें देण्याचें ठरलें. तेव्हां महाराजांचे आज्ञेनें "वस्त्रें घेण्यास **श्री**मन्महाराज छत्रपति सरकारचे हुजुरास येणें" अशा मतलबाचें पत्र **प्रतिनिधीनें**[1] **बाजीरावास** पाठविलें.

**बाळाजी विश्वनाथाच्या** मागून थोडकेच दिवसांनीं **खंडेराव दाभाडे** हा मरण पावला. तेव्हां **शाहू महाराजांनीं सेनापतिपदाचीं** वस्त्रें

---

१ ह्या वेळीं **श्रीपतराव** ( **परशुराम त्रिंबक प्रतिनिधीचा** मुलगा ) **प्रतिनिधि** होता. **परशुराम त्रिंबक** हा **बाळाजी विश्वनाथ दिल्लीहून** परत येण्याचे पूर्वींच वारला होता, यामुळें **शाहू महाराजांनीं** त्याचा मुलगा **श्रीपतराव** यास **प्रतिनिधि** नेमिलें होतें.

त्याचा मुलगा त्रिंबकराव यास दिलीं खंडेरावाचे वेळीं दमाजी गायकवाड हा नेहमीं त्याच्याबरोबर असे. त्यानें पुष्कळ लढायांत आपलें शौर्य प्रकट केलें होतें. जेव्हां खंडेराव बाळापूरच्या लढाईहून[1] परत आला, तेव्हां त्यानें दमाजी गायकवाडाच्या शौर्याविषयीं शाहू महाराजांजवळ फार तारीफ केली. त्यावरून त्यांनीं दमाजीला खंडेरावाच्या हाताखालीं फौजेच्या संबंधानें दुय्यम अधिकारी नेमिलें, व त्याला समशेर बहादर असा किताब दिला. दमाजी गायकवाड हाही खंडेराव वारल्यानंतर थोडकेच दिवसांनीं वारला, व त्याच्या अधिकारावर त्याचा पुतण्या पिलाजी गायकवाड यास नेमिलें.

---

## भाग ६.

## बाजीराव बल्लाळ पेशवे यांची कारकीर्द. इ० स० १७२० पासून १७३० पर्यंत.

बाजीरावास पेशवाईपद मिळतें.—इ० स० १७२१ त हिंदुस्थानची राजकीय स्थिति.—महंमदशाहा बादशाहाची वर्तणूक.—निजामउल्मुल्क.—सय्यदांचा मृत्यु.—बाजीराव पुणें शहर वसवतो.—त्याची माळव्यावरची मोहीम.—श्रीपतराव प्रतिनिधि व बाजीराव यांचें साताराच्या दरबारीं द्वंद्वयुद्ध.—बाजीरावाच्या कारकीर्दींत प्रसिद्धीस आलेले मराठे सरदार.—त्याची कर्नाटकावर स्वारी.—त्याच्या पाठीमागें मराठी दरबारांत निजामउल्मुल्कानें केलेलें कारस्थान.—बाजीराव कर्नाटकांतून परत आल्यानंतर तें कारस्थान हाणून पाडतो.—निजामउल्मुल्काचें दुसरें कारस्थान.—बाजीराव त्याचें पारिपत्य करण्याकरितां सन १७२७ त पुण्याहून निघतो.—तो निजामाच्या सैन्यास कोंडून धरतो.—निजाम लाचार होऊन तह करतो.—मराठ्यांस गुजराथची चौथाई मिळते.—कोल्हापुरचा संभाजी राजा शाहू महाराजांच्या मुलखास उपद्रव देतो.—श्रीपतराव प्रतिनिधि त्याचा पराभव करून ताराबाई व राजसबाई यांस कैद करतो.—संभाजी व शाहू महाराज यांच्यांत झालेला तह.

शाहू महाराजांचें पत्र बाजीरावास येऊन पोहोंचतांच आपणाव-

---

१ या लढाईत अलंअल्लीखान व मराठे एके बाजूस होते, व निजामउल्मुल्क दुसऱ्या बाजूस होता. तिची हकीकत पुढें येईल.

रोवर अंबाजीपंत पुरंदरे, रामचंद्रपंत भानू, चिमणाजी आपा वगैरे मंडळी घेऊन तो साताऱ्यास आला. बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें देण्याविषयीं अंबाजीपंतानें महाराजांस विनंति केली. नंतर आपले अष्टप्रधान बोलावून त्यांना महाराजांनीं बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा आपला मानस कळविला. त्या वेळीं श्रीपतराव [1]प्रतिनिधीनें, "आजच वस्त्रें देण्याची घाई कोणती आहे? पुढें वस्त्रें देतां येतील," असें सांगितलें. त्यावरून ती गोष्ट तेव्हां तशीच राहिली. प्रतिनिधि आदिकरून अष्टप्रधानांच्या मनांत तें पद कोंकणस्थांस द्यावयाचें [2]नव्हतें. बाजीराव वारंवार महाराजांच्या दर्शनास जात असे व प्रसंग पाहून आपणास पेशवाईचीं वस्त्रें देण्याविषयीं विनंति करीत असे. प्रतिनिधीच्या मनांतून त्याला पेशवाईचीं वस्त्रें देण्याचें नव्हतें, व तो महाराजांसही तसेंच सांगत असे. यामुळें त्यांना प्रतिनिधीची भीड एकदम तुटेना. शेवटीं योग्य प्रसंग पाहून शाहू महाराजांनीं बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें देण्याचा आपला निश्चय प्रकट केला.

नंतर मोठा दरबार भरवून अष्टप्रधान, अमीर, उमराव, सरदार, मानकरी वगैरे लोकांस निमंत्रण केलें. शाहू महाराजांची स्वारी सिंहासनारूढ झाल्यावर प्रतिनिधीनें भाषणास सुरवात केली. तो ह्मणाला, "सर्व सरदार, मानकरी, अमीरउमराव लोक हो, माजी पेशवे बाळाजी विश्वनाथ यांच्या मरणामुळें संपूर्ण मराठी राज्याची केवढी हानि झाली तें सर्वत्रांस समजतच आहे. त्यांच्या पाठीमागें तो

---

१ ह्या वेळीं दरबारांत प्रतिनिधीचें पारडें फारच जड होतें. २ बाजीराव व श्रीपतराव यांचें बरें नव्हतें याचें कारण जातिमत्सर होय. बाळाजी विश्वनाथ मरण पावल्यावर बरेच महिने बाजीरावास पेशवाईचा अधिकार प्राप्त झाला नाहीं याचें कारण ग्रांटडफ साहेबाचे ध्यानांत आलें नसावें. आह्मांस असें वाटतें कीं, प्रतिनिधि वगैरे देशस्थ प्रधानांचा आग्रह तें पद बाजीरावास न देण्याचें असल्यामुळें शाहू महाराजांना एकदम त्या सर्वांची भीड तुटेना, म्हणून तें काम टाळाटाळीवर त्यांनीं लोटलें. मराठी बखरीचा आशयही असाच आहे. पेशव्यांची बखर पान १७।१८ पहा.

अधिकार कोणाला द्यावयाचा या संबंधानें बरीच भवति न भवति होऊन तो अधिकार त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव बाजीराव बल्लाळ यांस देण्याचें टरलें आहे, व त्याच समारंभाकरतां आजचा दरबार भरला आहे. आतां पेशवाईचीं वस्त्रें व शिक्केकटार महाराज त्यांस स्वहस्तें देतील. आजपासून बाजीराव बल्लाळ हे छत्रपति-सरकार-गादीचे प्रधान झाले असें समजावें."

नंतर वस्त्रें व शिक्केकटार वगैरे देण्याचा समारंभ झाल्यावर महाराजांनीं बाजीरावास उपदेश केला कीं, "बाजीराव, तुह्मी आतां आमचे प्रधान झालां. तुमचे वडील बाळाजी विश्वनाथ यांचें आह्मांस घडोघडीं स्मरण होतें. असा चतुर पुरुष विरळा. काय त्यांच्या मसलती, किती दूरवर विचार, त्यांनींच हें राज्य अशा घाटास आणिलें. परंतु मृत्यूपुढें कोणाचा इलाज नाहीं. असो. त्यांचें पद आतां तुह्मांस दिलें आहे, तर वडिलांनीं जो पाया घालून दिला आहे त्यावर नजर ठेवून आह्मांस त्यांचें विस्मरण पाडा ह्मणजे झालें. तरवार बहादरी करून 'राव' या नांवाप्रमाणें कीर्ति करा. शिवाजी महाराजांचे गादीचा अभिमान धरा, आणि मराठी राज्याची अभिवृद्धि करून 'श्रीवर्धनकर भट' हें नांव खरें शोभतें अशी कीर्ति मिळवा ह्मणजे झालें. दुसरें कांहीं सांगणें नाहीं."

शाहू महाराजांचा उपदेश संपल्यावर समयाला अनुसरून असें बाजीरावही थोडेंसें बोलला; व शिरस्त्याप्रमाणें पानसुपारी, अत्तरगुलाब होऊन दरबार बरखास्त झाला. अशा रीतीनें सन १७२१च्या मे[1] महिन्यांत बाजीरावास पेशवाईचा अधिकार मिळाला.

त्या वेळीं हिंदुस्तानची राजकीय स्थिति खालीं लिहिल्याप्रमाणें होती:—

इ० स० १७२१ त बाजीराव पेशवा झाला, त्या वेळीं मराठ्यांचे बहुतेक सरदार एकचित्त झालेले होते. परंतु राजघराण्यांत सातारा व कोल्हापूर अशा दुफळ्या होत्या, यामुळें कांहीं थोडे सर-

---

१ त्रिंबकराव दाभाडे यासही सेनापतीचा अधिकार याच महिन्यांत मिळाला.—ग्रांटडफ.

दार **संभाजीकडे** व बहुतेक **शाहू महाराजांकडे** अशी त्या सरदार लोकांतही थोडीशी फाटाफूट होती. **बाळाजी विश्वनाथानें** स्वपराक्रमानें राज्यांतील बराच बखेडा मोडून टाकला होता, व पुंड पाळेगार लोकांवर स्वाऱ्या करून त्यांचा चांगला बंदोबस्त केला होता. त्यानें स्वतः **दिल्लीपर्यंत** जाऊन त्या दरबारीं मराठ्यांची छाप बसविली होती, व स्वराज्य बरेंच नांवारूपास आणिलें होतें.

**हिंदुस्तान** ह्मणजे संपत्तीचें माहेरघर अशी बातमी **युरोप** खंडांत पोहोंचली तेव्हां प्रथमतः **पोर्तुगीज** लोक **हिंदुस्तानांत** आले. ते पहिल्यानें व्यापार करूं लागले, परंतु थोडक्याच दिवसांत त्यांनीं आपली तराजूची दांडी फेंकून दिली, व ते हळूहळू राजकारणांत शिरले. कांहींनाकाहीं कुरापती काढून एतद्देशीय राजांशीं ते लढूं लागले, व समुद्रकिनाऱ्यावरचीं बरींच बंदरें त्यांनीं आपल्या ताब्यांत आणिलीं. अशा रीतीनें सन १७२१ त मराठ्यांना पोर्तुगीज लोक हे एक बलिष्ठ शत्रु होते.

पोर्तुगीज लोकांचा भरभराट पाहून डच, फ्रेंच, इंग्लिश हेही **हिंदुस्तानची** संपत्ति लुटण्याकरतां धापा देत आले; व प्रथमतः **गोवें, दमण, दीव, मुंबई, खंबायत, साष्टी, सुरत, चौल, वसई, पांडिचेरी, राजापूर, वेंगुर्लें, कारिकल, यानान, चंद्रनगर** वगैरे ठिकाणीं त्यांनीं आपलीं व्यापाराचीं दुकानें घातलीं. परंतु सन १७२१ पर्यंत फ्रेंच व इंग्लिश ह्यांनीं **हिंदुस्तानच्या** राज्यकारभारांत हात घातला नव्हता.

मोंगलांच्या संबंधाचा इतिहास, **महंमदशाहा** इ० स० १७२० त गादीवर आला तेथपर्यंत आमच्या वाचकांस कळलाच आहे. हा **महंमदशाहा** अतिशय दुर्व्यसनी होता यामुळें मोंगलांचें राज्य भराभर लयाला जात चाललें होतें, व मराठ्यांचा उत्कर्ष होत होता. राजे लोक ऐषआरामी व दुर्व्यसनी निघाले ह्मणजे त्यांच्या राज्यावर अवदसेचा फेरा आलाच असें समजावें. अशा प्रसंगीं राजाच्या पदरचें प्रधानमंडळ निदान चांगलें हुशार असलें तर राज्याची

कांहीं तरी वाजू थाबटते. परंतु महंमदशाहाच्या दरबारांत त्याचाही अभाव होता. त्या वेळीं औरंगजेबाच्या तालमेंत कसलेला पक्का मुत्सद्दी व शूर असा एक मुसलमान सरदार होता तो मात्र मराठ्यांस जेथें तेथें अडथळा करी. तो एक नसता तर मुसलमानांचें राज्य नष्ट होऊन सर्व हिंदुस्तानभर मराठ्यांचें एकछत्री राज्य झालें असतें. त्या सरदाराचें नांव सांगण्यापूर्वी दिल्ली एथें महंमदशाहाची कारकीर्द कशी चालली होती त्याचें थोडेंसें वर्णन करूं.

महंमदशाहा नेहमीं ऐषआरामांत धुंद असे. राज्याचा सर्व कारभार अप्रतिष्टित, चैनी, पाजी व व्यसनी अशा पुरुषांच्या हातीं असे. त्याचा सर्व काळ खुपमस्करींत जात असे. दरबारी लोक नेहमीं नाच, रंग, तमाशे यांत गुंग होऊन गेले होते. एका राखेनें तर बादशाहास इतकें ग्रासून टाकिलें होतें कीं, त्यानें आपलें सरकारी शिक्कामोर्तब तिच्या स्वाधीन केलें होतें, व ती मन मानेल त्याला भडाभड सनदा करून देत असे. मोठमोठ्या अधिकारांवर तिनें आपलेच सोयरेधायरे नेमिले होते. लष्करचा बंदोबस्त अगदीं बिघडून गेला होता. कामगिरीवांचून जहागिरीच्या सनदा व अपराधावांचून फांशीच्या शिक्षा होऊं लागल्या. राज्यांत चोहींकडे बंडाळी माजली, वसूल थकत चालला, व जो कांहीं येई तेवढा बादशाहाच्या खर्चासही पुरेना. मग कर्ज काढून खर्च करूं लागल्यामुळें कर्जाचा बोजा वाढला. कर्ज फार वाढलें तेव्हां लोकांवर नवीन नवीन कर बसूं लागले. लोकांची दाद दरबारांत मुळींच लागेनाशी झाली. अशी जिकडे तिकडे बलबलपुरी माजून गेली. अशा रीतीनें दिल्लीचें राज्य त्या वेळीं बलहीन व बेताल होऊन गेलें[१] होतें.

ज्या सरदाराचें आह्मीं वर वर्णन केलें आहे व जो मराठ्यांच्या राज्यवृद्धीस वारंवार अडथळे करीत असे, आणि ज्याच्या पराक्रमाच्या योगानें हिंदुस्तानांत थोडें तरी मुसलमानाचें वर्चस्व राहिलें त्याची व आमच्या वाचकांची पूर्वी थोडीशी ओळख झालेली आहेच. त्याचें

१ ही स्थिति सय्यदांला ठार मारल्यानंतरची आहे. त्या संबंधाचा इतिहास पुढें येईलच.

नांव **चिंकिलीजखान** ऊर्फ **निजामउल्मुल्क.** त्याच्या संबंधाचा पूर्वीचा थोडासा मजकूर सांगावयाचा राहिला आहे तो सांगून नंतर पुढील वृत्तांतास आरंभ करूं.

**सय्यदांनीं महंमदशाहास** गादीवर बसवून सर्व राज्यसत्ता आपल्या हातीं घेतल्यावर त्यांनीं **निजामउल्मुल्कास माळव्याच्या सुभे**दारीवर पाठविलें. **दिल्लीच्या** दरबारीं आतां आपलें वजन बसणें कठीण आहे असें **निजामउल्मुल्कास** वाटूं लागल्यावरून त्यानें प्रथमतः **दक्षिणेंतील** मुलूख जिंकून आपली सत्ता दृढ करण्याचा निश्चय केला. ह्याप्रमाणें उघड बंड करून आपल्या सैन्यासह तो **नर्मदेपर्यंत** चाल करून आला. प्रथमतः त्यानें **अशीरगडचा** किल्ला घेतला व त्या प्रांतांतील पुष्कळ सरदार आपल्या पक्षांस अनुकूल करून घेतले. त्याच्यावर **सय्यदांनीं दिलावरखान** यास **माळ**व्यांतून पाठवून दिलें, व **औरंगाबादेस सय्यदांचा** पुतण्या **अलमल्ली**खान हा त्याची वाट पहात बसला होता. **दिलावरखान** हा मोठा उतावळा होता. त्यानें **औरंगाबादेस** न जातां एकदम **निजामउल्मु**ल्कावर चाल केली. तेव्हां त्या दोघांची सन १७२० च्या जून महिन्यांत **बऱ्हाणपुराजवळ** फार मोठी लढाई झाली. तींत **निजामउ**ल्मुल्कास जय मिळाला व **दिलावरखान** मारला गेला. नंतर **निजामउ**ल्मुल्क **अलमल्लीखानावर** चालून गेला व त्याचाही त्यानें सन १७२० च्या जुलै महिन्यांत **बाळापूर** एथें पराजय केला. ह्या लढाईंत **अलमल्लीखानही** मारला गेला. आपल्या दोन्ही सरदारांचा पराभव झाला हें ऐकून **सय्यदांस** मोठी भीति पडली. पुढें **हुसेन अल्लीनें अबदुल्ला** यास **दिल्ली** एथें आपल्या कुटुंबाच्या संरक्षणाकरतां ठेवून आपल्याबरोबर बादशाहास घेतलें व **निजामउल्मुल्काचें** पारिपत्य करण्याकरतां तो **दक्षिणेंत** यावयास निघाला. परंतु **आग्र्यापासून** थोड्याशा मैलांवर तो गेला नाहीं

---

१ **खंडेराव दाभाडे, दमाजी गायकवाड** वगैरे मराठ्यांचे सरदार ह्या लढाईंत **अलमल्लीखानाच्या** साह्यास आले होते. ह्या लढाईंत मराठे फार निकरानें लढले असें वर्णन आहे.

तोंच मीर हैदर ह्या नांवाचा मनुष्य अर्ज दाखविण्याचे मिषानें हुसेन अल्लीच्या पालखीजवळ गेला, व हुसेन याच्या हातांत अर्ज देण्याच्या संधींत त्यानें आपली कट्यार त्याच्या छातींत भोंसकून त्याला ठार मारलें ( अक्टोवर सन १७२० ). हुसेनास ठार मारल्याचें वर्तमान अवदुल्लास कळलें तेव्हां त्यानें मोठें सैन्य जमा केलें, त्याची आणि वादशाहाच्या पक्षाच्या लोकांची आग्रा व दिल्ली यांचे दरम्यान शहापूर एथें फार मोठी लढाई झाली. ह्या लढाईंत अवदुल्लाचा पराभव होऊन त्याला कैद केलें. परंतु त्याचें कुल फार पवित्र होतें सबब त्याला ठार मारलें नाहीं.

अशा रीतीनें आपोआप निजामउल्मुल्क सय्यदांच्या त्रासांतून मोकळा झाला. महंमदशाहानें प्रथमतः महंमद अमीन नांवाच्या मनुष्यास आपली वजिरी दिली; परंतु तो त्या कामावर येण्यापूर्वीच मरण पावला. नंतर वादशाहानें निजामउल्मुल्कास आपली वजिरी दिली; परंतु दक्षिणेंत विजापुराकडे कांहीं राजकारण उपस्थित झाल्यामुळें त्याला इ० स० १७२२ च्या जानेवारी महिन्यापर्यंत आपल्या कामावर रुजू होतां आलें नाहीं.

ह्याप्रमाणें इ० स० १७२१ त निजामउल्मुल्क हा एक वाजीरावाला जवरदस्त प्रतिस्पर्धी होता.

इ० स० १७२१ त वाजीरावानें महाराजांची आज्ञा घेऊन पुणें हें आपलें राहण्याचें ठिकाण केलें, व आपल्या कुटुंबाचीं माणसें सासवडाहून आणून पुण्यास ठेविलीं. बापूजी श्रीपत ह्मणून कोणी पुरंदर किल्ल्याचा अधिकारी होता त्यास त्यानें पुण्याची सुभेदारी दिली. तो मोठा चतुर होता. त्याच वेळीं रंभाजी जाधवराव ह्मणून कोणी एक हुशार मनुष्य होता त्याला वाजीरावानें त्याच्या हाताखालीं नेमिलें. त्या वेळीं पुणें हें एक लहानसें खेडें होतें. त्याचें शहर वनविण्याचें काम वाजीरावानें रंभाजीस सांगितलें. त्यानें व्यापारी, उदमी, कारागीर वगैरे लोक आणून त्यांस कौलानें जागा देऊन तेथें वस्ती वाढविण्याचें काम मोठ्या झपाट्यानें चालविलें.




प्रथमतः भुजंगशेट राशनकर, दुर्गाप्पा आ[illegible]कर, व बाळाप्पा नद्दे यांनीं पुण्यांत दुकानें घातलीं, व त्यांचा भरभर[illegible] दुसरें व्यापारी भराभर पुण्यांत येऊन राहूं लागले.[1]

बाजीराव पेशवा झाल्यावर खानदेशांतून मोकासदारांचीं वारंवार पत्रें येऊं लागलीं कीं, "सरकारचे मोकास-बावीचे हक्क मोंगल लोक सुरळीतपणें वसूल करूं देत नाहींत." तेव्हां प्रथमची स्वारी त्यानें खानदेशावर करण्याचा बेत केला, व त्या कामाकरतां रामचंद्र गणेश ह्मणून कोणी एक शूर सरदार होता त्याच्या हाताखालीं मोठी फौज देऊन त्याला खानदेशांत (माळव्यांत) रवाना केलें. वाटेनें मोंगलांचे अधिकारी त्याला वारंवार अडथळा करीत, परंतु त्यांना न जुमानतां तो वेलाशक आपले हक्क वसूल करीत चालला, आणि प्रांतचेप्रांत त्यानें लुटून फस्त केले. इ० स० १७२२ त बाजीरावानें उदाजी पवार यास तो प्रांत पुनः लुटण्याकरतां पाठविलें होतें. या सरदाराचा शाहू महाराजांशीं व पेशव्याशीं जो पत्रव्यवहार चालला होता त्यावरून असें दिसतें कीं, त्या वेळीं माळवा प्रांतावर चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसविण्याचा शाहू महाराजांचे आज्ञेवरून बाजीरावानें त्यास अधिकार दिला होता[2]; व प्रत्येक परगण्यांतील अधिकाऱ्यास परवानेही लिहिले होते कीं, "चौथाई व सरदेशमुखी हा वसूल गोळा करण्यास आह्मीं उदाजीस अधिकार दिला आहे." पुढें सन १७२६ त बाजीराव माळवा पूर्णपणें कावीज करण्याचे हेतूनें त्या मुलखीं गेला. त्यापूर्वी दोन वर्षे उदाजीनें त्या प्रांतीं बहुतेक ठिकाणीं चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसविले होते. सन १७२४ त बाजीरावानें चिमणाजी आपा व उदाजी पवार यांस तिसऱ्यानें[3] माळव्यांत पाठ-

---

१ पुणें शहराचें वर्णन. २ सर जान मालकमकृत मध्य हिंदुस्तानाचा इतिहास. ३ ह्या वेळीं बाजीरावानें उदाजी पवार यास माळवा व गुजराथ एथील चौथाई वसूल करण्याचे संबंधानें सनद करून दिली होती ती एणेंप्रमाणें:—

"अखंडितलक्ष्मीअलंकृत महाराजे श्री उदाजी पवार यांस प्रति बाजीराव बल्लाळ प्रधान ११२३ फसली पावेतों सुखरूप असों विशेष. गुजराथ व माळवा या प्रांतांचा निम्मा मोकासा (चौथाई हक्काचा तीनचतुर्थांश) हुजू-

वून दिलें. त्या दोघांनीं राजा गिरधर ह्मणून कोणी नागर ब्राह्मण माळव्याचा सुभेदार होता त्याचा पराभव केला. नंतर ते सारंगपुरावर जाऊन पडले. तेव्हां तेथील सुभेदारानें त्यांना १५००० रुपये देऊन वाटेस लाविलें.

बाजीरावाच्या मनांत प्रथमतः माळवा प्रांत हस्तगत करून घेऊन नंतर उत्तरहिंदुस्तानांत मराठ्यांचें राज्य आस्ते आस्ते वाढवीत न्यावें असें होतें. तेव्हां त्यानें मोठें लष्कर घेऊन प्रथमतः माळवा प्रांत जिंकावा ह्या हेतूनें शाहू महाराजांची परवानगी मागितली. परंतु त्या वेळीं श्रीपतराव नेहमीं महाराजांजवळ असे, व बाजीरावाचें व त्याचें वांकडें असल्यामुळें ह्या गोष्टीला रुकार न देण्याविषयीं तो महाराजांना मसलत देत असे. कारण प्रतिनिधीच्या मनांत अशी भीति उत्पन्न झाली कीं, मोठमोठीं पराक्रमाचीं कृत्यें करून बाजीराव पुढें सरसावला तर आपलें महत्व दरबारांत कमी होऊन पेशव्याचें महत्व ज्यास्त वाढेल. अशा प्रकारची मत्सरबुद्धि राज्यवृद्धीस केवढी अपायकारक आहे ही गोष्ट श्रीपतरावासारख्या हुशार मंत्र्याच्या लक्षांत आली नाहीं ही मोठी सखेदाश्चर्याची गोष्ट आहे!

बाजीराव उत्तरहिंदुस्तानांत जाण्याविषयीं वारंवार शाहू महाराजांजवळ गोष्ट काढीत असे. पुढें त्या गोष्टीचा विचार करण्याकरतां महाराजांनीं एक दरबार भरवून त्यांत तिचा खल करण्याचें ठरविलें. दरबार भरल्यानंतर प्रतिनिधीनें प्रथम भाषणास सुरुवात

---

रचा आहे, त्यापैकीं निम्मा हिसा तुम्हांस सरंजामी करून दिला आहे. तुह्मी आमचे सेनापति आहां, व तुह्मांवर आमचा भरंवसा आहे. जें दिलें आहे त्याचा अनुभव घेणें. बहुत काय लिहिणें, तारीख ५ रविलावल."

हा सर्व मजकूर सर जान मालकमकृत मध्य हिंदुस्थानच्या इतिहासांत आहे. ग्रांटडफ ह्या संबंधानें कांहींच माहिती देत नाहीं. फक्त, सन १७२१ त बाजीरावानें खानदेशांत स्वारी केली व सन १७२४ च्या पावसाळ्यापूर्वीं बाजीरावानें एकंदर माळव्यांत ३ स्वाऱ्या केल्या, परंतु त्या स्वाऱ्यांत बाजीराव होता किंवा नव्हता ह्या संबंधानें खात्रीनें कांहीं सांगतां येत नाहीं, इतकेंच तो ह्मणतो; परंतु वरील मजकुरावरून बाजीराव स्वतः गेला नव्हता असें सिद्ध होतें.

केली. तो ह्मणाला:—"या वेळीं पेशव्यांचा हा केवळ दुराग्रह आहे, असें मी समजतों. त्यांनीं आपल्या बलाबलाचा यत्किंचित्‌ही विचार केला नाहीं. एखादें छोटें बंड मोडण्याचीही आमच्या अंगीं कुवत नाहीं. निजामाचें पराक्रमी सैन्य आमच्या दारापाशीं येऊन ठेपलें आहे. चौथाई व सरदेशमुखी हे हक्क नीटपणें वसूल होत नाहींत. मला असें वाटतें कीं, आपले ताब्यांत जो प्रांत आहे त्याचा प्रथमतः नीट बंदोबस्त करावा. आपलें राज्य अगोदर मजबूत करावें, आपले आपसांतील तंटे मोडून टाकावे, कर्नाटकांत शिवाजी महाराजांनीं संपादलेला मुल्ख आपल्या हातून गेला आहे तो अगोदर आपले ताब्यांत आणण्याचा प्रयत्न करावा, व इतक्या सर्व गोष्टी घडून आल्या ह्मणजे मग उत्तरेकडे नवीन मुल्ख जिंकण्याचे कामास हात घालावा. जसे पेशवे शिपाई आहेत त्याप्रमाणें मीही शिपाईगडीच आहें. आमच्या अंगांत ह्मणजे कुवत नाहीं असें नाहीं. परंतु शिपाईगिरी दाखविण्याचा हा योग्य प्रसंग नव्हे. ह्या वेळीं पेशवे ह्मणतात ती गोष्ट कबूल केली तर त्यापासून पुढें काय अनर्थ होतील तें माझ्यानें सांगवत नाहीं. पेशव्यांस उत्तरहिंदुस्थानांत जाण्यास परवानगी देणें ह्मणजे आपल्या हातानें आपल्या पायावर धोंडा पाडून घेण्यासारखें आहे. याकरतां महाराज या गोष्टीस आपला रुकार देणार नाहींत अशी मी आशा करतों."

हें प्रतिनिधींचें भाषण ऐकून बाजीरावाला फार राग आला. नंतर त्यानें प्रत्युत्तरादाखल मोठें समर्पक व सुरस भाषण केलें तें एणें[1]प्रमाणें:—

"प्रतिनिधि अशी मसलत काय देतात? पादशाही कमजोर जाहली आहे. कांहीं जीव राहिला नाहीं. बखेडे बहुत झाले आहेत. पादशाहा आमचे कुमकेनें पादशाही रक्षावी असें इच्छून आहेत. यांतच त्यांचेही बखेडे मोडावे, आपला स्वराज्यअंमल पूर्वी बसला नाहीं तो बसवावा. किलीजखान (निजामउल्मुल्क) नजीक, त्याचा

१ खालील मजकूर मूळ बखरींतून जशाचा तसा घेतलेला आहे.

तह विघडून खटला करतील त्याचा हिसाब काय धरावा? असें ह्मटलें तर राज्य कसें करावें? आणि थोरले महाराज यांणीं जातीनें औरंगजेब शहाजादेपणांत येऊन दौलताबादची पादशाही घेऊन औरंगाबाद वसवून सुभा करून राहिले, त्याचा हिसाब न धरतां विजापूर, भागानगर ( हैदराबाद ) पादशाहींतील अंमल वसविला; व त्यांचे ( औरंगजेबाचे ) सुभ्यांतील अंमल घेतला. यानंतरही संभाजी महाराज यांणीं सर्व दौलत, फौज बुडविली, महाराज वारले, असे प्रसंगीं औरंगजेब जातीनें येऊन दोन्ही पादशाही ( विजापूर व गोवळकोंडें ) घेऊन संभाजी महाराजांस धरून विज्वर ( जिवावरचा, शेवटचा ) प्रसंग केला. महाराज त्यांचे नजरबंदींत गेले. राज्य व स्थळें सर्व घेतलीं. दोन लक्ष फौज बंदोबस्तास. आपण हिंदुस्थान दिल्लीचें राज्य सोडून या प्रांतीं राहिले; त्याचा हिसाब न धरतां राजाराम साहेब चंदीस ( जिंजीस ) जाऊन चार सुभे ( सरदार ) पंचवीस पंचवीस हजारांचे करून तेथून रात्रंदिवस मसलत करून लढाया मारून अंमल उठवून नेला. पुढें पादशाहांनीं चंदीस अडचण केली तेव्हां पादशाहा या प्रांतीं असतां देशीं येऊन हिसाब न धरितां औरंगाबाद मारिली, अंमल वसविले, राज्य व किल्ले स्थळें साध्य केलीं. हें राज्य गेलें तें श्रीकृपेनें पुन्हा साध्य झालें. स्वामी पादशाहींतून अनायासें करून राज्यावर येऊन दैववान् मोठीं माणसें पदरीं होऊन पादशाहाची कुमक करावी, पादशाहा स्थापावे ऐसें होऊं लागलें. पूर्वी मोठीं मोठीं कार्यें वडिलीं केलीं तशीं न करावीं तरी मोठीं पदें कशास करावीं?[१] आह्मांस सनदा मात्र द्याव्या. फौज खजिना सर्व स्वामींचे चरणांचे प्रतापेंकरून सिद्ध करतों. राज्य साध्य करतों. किलीजखान याचाही शह ( त्याच्या हल्ल्याचा बंदोबस्त ) राखून हिंदुस्थानची मसलत करतों. दोन्ही आह्मी आटोपतों. कर्नाटकची मसलत करणें त्यास पादशाही बुडविली आहे. पूर्वींचीं राज्यें विजापूर, भागानगर यांजखालील मुलूख साध्य झालेच आहेत. हे

१ हें बोलणें प्रतिनिधीला खूबच लागलें असेल!

घरांतील मसलत आहे. हुजुरात व मोठे सरदार यांतील कोणी तरी रवाना होऊन मसलत जाली ह्मणजे सहज साध्य होईल. हे प्रतिनिधींनीं मसलत संभाळावी. थोरले महाराजांचा संकल्प हिंदुस्थान काबीज करावें ऐसा राहिला. त्यासाठींच स्वामींचा अवतार उदय झाला आहे. पुण्यप्रतापही तसाच आहे. यास्तव आधीं हें साध्य करावें आणि संकल्प शेवटास न्यावा. पादशाहांनीं आपण होऊन वलावून नेऊन तह करावा ऐसे दिवस श्रीनें प्राप्त केले. त्यांत बाळाजीपंत नाना जाऊन सर्व राजकारणें हिंदुस्थानचे राजेरजवाडे यांचीं करून सिद्धता झाली आहे. यास्तव या समयीं हा उद्योग करावा हें उत्तम आहे."

हें बाजीरावाचें वीरश्रीचें व अस्खलित भाषण ऐकून महाराजांस फार समाधान वाटलें, व त्यांनाही स्फुरण चढलें. त्यांनीं बाजीरावास मोठी शाबासकी दिली आणि सांगितलें, " बाळाजीपंत नानांच्या उदरीं तुह्मी जन्मलां तें युक्त आहे. तुह्मांसारखे कर्ते पदरीं असतां हिमालयाच्या पलीकडीलही दुसरें किंनरखंडींचें[१] राज्य साधतां येईल! मग या मसलतीचें काय अशक्य आहे? तुम्हीं हिंदुस्थान प्रांतीं जावें. इकडील सर्व सरदार, व हुजुरात व मानकरी फौज आहे, तेव्हां निजामउल्मुल्क यांणीं शेखी केलियास पहातां येईल, व कर्नाटक प्रांतींही फौज रवाना करून सोडितां येईल."

असें सांगून महाराजांनीं बाजीरावास वस्त्रें, वहुमान व सनदा देऊन निरोप दिला. या वादाचा परिणाम असा झाला कीं, सातारच्या दरबारांत प्रतिनिधीचें जें वजन होतें तें कमी झालें व बाजीरावाचें वाढलें. आणि प्रत्यहीं त्याच्या मदतीची अधिकाधिक जरूर पडत चालली, यामुळें तर पुढें त्याचें महत्व विशेषच वाढलें. शाहू महाराज कमी बुद्धिमान् होते असें नाहीं. परंतु लहानपणापासून जनानखान्यांत वाढल्यामुळें त्यांच्या बुद्धीची तीव्रता कमी झाली होती. बाजीरावाची तशी गोष्ट नव्हती. तो लहानपणापासून छावणींत

१ किंनरखंड हें हिमालयाच्या पलीकडे आहे असें समजतात.

असे, व तेव्हांपासून राजकीय कामांत मोठा तरबेज झाला होता. त्याची वागणूक शूरास शोभण्यासारखी असे, व त्याची बुद्धि विशाल असून तो मोठा ज्ञाता होता. त्याचा स्वभाव मोठा हौशी असून तो मनाचा मोकळा होता. मेहनतीचें अथवा संकटाचें काम आलें तर तो कधीं डगमगत नसे; शिवाय त्याची शरीरप्रकृति इतकी निरोगी व रांकट होती कीं, प्रवास करीत असतां घोड्यावरच्या घोड्यावर हातच्या हातीं जोंधळ्याचीं कणसें तोडून त्यांवर आपली गुजराण तो चालवीत असे.

पुढें त्याच वर्षी ह्मणजे सन १७२९ त बाजीरावानें स्वतः माळव्यावर दोन स्वाऱ्या केल्या. त्या दोन्ही स्वाऱ्यांत माळव्याचा सुभेदार राजा गिरधर याचा पराभव करून त्यापासून त्यानें खंडणी घेतली, व अतिशय लूट मिळवून तो स्वदेशीं परत आला. ह्या स्वाऱ्यांत मल्हारराव[1] होळकर, राणोजी[2] शिंदे व उदाजी[3] पवार यांनीं मोठीं मर्दु-

---

१ मल्हाररावाचा बाप पुणें जिल्ह्यांत निरा नदीच्या कांठीं होळ म्हणून गांव आहे तेथील चौगुला होता. तो जातीचा धनगर होता. त्याला सन १६९३ त मुलगा झाला त्याचें नांव त्यानें मल्हारी असें ठेविलें. मल्हारी ५ वर्षांचा असतांच त्याचा बाप मेला. तेव्हां त्याच्या मामानें त्यास आपल्या घरीं नेलें व मेंढ्या चारण्याचें काम सांगितलें. ह्या मल्हारीविषयीं अशी चमत्कारिक गोष्ट सांगतात कीं, हा एके दिवशीं मेंढ्या चारणीस लावून झाडाखालीं वारा घेत पडला असतां त्याला तेथेंच झोंप लागली. तेव्हां उन्हाचा उपद्रव त्याला होऊं नये म्हणून एका नागानें आपली फणा त्याच्या मस्तकावर धरली होती. असो. पुढें मल्हारीस तो नीच धंदा आवडेनासा झाला, व त्यानें दाभाड्याचा सरदार कंठाजी कदम बांडे याच्याजवळ प्रथम शिपायाची नोकरी धरली. पुढें बाजीरावानें अगदीं प्रथम माळव्यावर स्वारी केली त्या वेळीं त्याच्या लोकांची व कंठाजीच्या लोकांची तापीच्या कांठीं मोठी कलागत लागली. ती कलागत मल्हारीनें मोठ्या शहाणपणानें मिटविली. तेव्हां बाजीरावानें त्यास कंठाजीपासून मागून घेतलें, व प्रथमतः त्यास ५०० स्वारांचा अधिकार दिला. तोच मल्हारी पुढें मल्हारराव होळकर या नांवानें मोठा विख्यात सरदार झाला.

२ राणोजी हा शिंद्यांच्या कुळाचा मूळपुरुष होय. त्याचें मूळ गांव कण्हेरखेड. राणोजी प्रथमतः मोंगलांच्या नोकरीस होता. पुढें मोंगलांचा पडता काळ

मर्दीचीं कृत्यें केलीं. त्यावरून बाजीराव मोठा खुष होऊन त्यानें त्यांस सन १७२५ त चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करण्याच्या हक्काच्या वंशपरंपरेनें सनदा करून दिल्या, आणि फौजेच्या खर्चाबद्दल मोकासबाबीचा अर्धा वसूल त्यांच्याकडे लावून दिला.

नंतर सन १७२६ त बाजीरावानें फत्तेसिंग[1] भोंसले यास बरोबर घेऊन कर्नाटकावर मोठी स्वारी केली. वाटेनें चौथाई व सरदेशमुखी हे हक्क तो मोठ्या झपाट्यानें वसूल करीत चालला, व ज्या ज्या ठिकाणीं लोकांनीं त्याला अडथळा केला तो तो प्रदेश त्यानें लुटून फस्त करून टाकला. अशा रीतीनें तो श्रीरंगपट्टणापर्यंत गेला, व तेथील खंडणी घेऊन परत आला. ह्या स्वारीपासून विशेष फायदा होणार नाहीं असें बाजीरावानें पूर्वी शाहू महाराजांजवळ सांगितलें होतें, व त्याचें तें भाकीत खरें ठरलें. मराठ्यांना फायदा होण्याचें तर लांबच राहिलें, परंतु तिकडील रोगकारक हवेनें त्यांचे पुष्कळ लोक मेले. ही

---

आला तेव्हां त्यानें ती नोकरी सोडून बाळाजी विश्वनाथाजवळ बारगिरीची नोकरी धरिली. परंतु तो नेहमीं पेशव्याजवळ हुजऱ्याचें काम करीत असे. पुढें बाजीरावानें त्याची एकनिष्ठ सेवा, तत्परता, व चलाखी पाहून त्यास आपल्या प्रथमच्याच स्वारींत शिलेदारीची असामी दिली, व एका लढाईंत त्याचें शौर्य, धैर्य वगैरे गुण पाहून पुढें त्याला ५०० स्वारांची सरदारी दिली. हाही मल्हाररावाप्रमाणें पुढें फार प्रख्यातीस आला. ह्याचें व मल्हाररावाचें अत्यंत सख्य होतें.

३ माळव्यांत धार ह्मणून संस्थान आहे तेथें उदाजी पवाराचा बाप विश्वासराव यानें आपली गादी स्थापिली. त्याला रामचंद्रपंत अमात्य यानें राजारामाचे वेळीं योग्यतेस चढविलें. उदाजी पवार पूर्वी शाहू राजाच्या हुजूरपागेवर एक मोठा सरदार होता. तो फार चलाख असे. त्याला राजानें जी जी कामगिरी सांगावी ती ती तो मोठ्या हिमतीनें शेवटास नेत असे. त्यानें गुजराथ व माळवा ह्या प्रांतांत वरचेवर स्वाऱ्या करून तिकडचा मुलूख लुनावाड्यापर्यंत जाळून लुटून फस्त केला होता. पुढें बाजीराव पेशवा झाल्यानंतर त्याला त्यानें तिकडील चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करण्याची सनद दिली, व त्याप्रमाणें त्यानें त्या प्रांतांत हे हक्क वसूलही केले.

१ हाच फत्तेसिंग अक्कलकोट संस्थानचा मूळपुरुष होय. ह्याच्या संबंधाची हकीकत पूर्वी दिलीच आहे.

स्वारी प्रतिनिधीच्या आग्रहास्तव महाराजांनीं बाजीरावास करण्यास सांगितलें होतें.

बाजीराव कर्नाटकांत बराच दूर गेला आहे असें पाहून निजामउल्मुल्कास साताऱ्याच्या दरबारांत खेळखंडोबा करावयास आयतीच संधि मिळाली. परंतु ती हकीकत सांगण्यापूर्वी, सन १७२२ त निजामउल्मुल्क दिल्लीस आपल्या वजिरीच्या कामावर गेला तेव्हांपासून त्याच्या संबंधाचा इतिहास सांगावयाचा राहिला आहे, तो सांगणें अवश्य आहे.

निजामउल्मुल्क सन १७२२ त दिल्लीस गेला, परंतु बादशाहाचा हलकट व छिचोर स्वभाव व दरबारी लोकांचे पोरकट चाळे व खटपटी त्याला न आवडून त्यानें आपल्या वजिरीच्या कामाचा राजीनामा दिला. तो गेल्यामुळें बादशाहा व दरबारी लोक ह्यांस फार आनंद झाला. नंतर निजामउल्मुल्क दक्षिणेंत यावयास निघाला त्या वेळीं बादशाहानें बाह्यात्कारीं त्याला मोठा मान देऊन त्याला गुजराथची आणखी सुभेदारी दिली. परंतु बादशाहा व त्याचे दरबारी लोक यांच्या मनांतून त्याची पुरी खोड मोडावयाचें होतें, तेव्हां त्यांनीं आंतून हैदराबादचा कोतवाल मबारीजखान यास सांगून पाठविलें कीं "तुह्मांस दक्षिणच्या सहा सुभ्यांची सुभेदारी दिली आहे, तेव्हां निजामउल्मुल्क तिकडे गेल्यास त्यास तो अधिकार देऊं नये." यावरून मबारीजखान अर्थातच त्याच्या नाशास प्रवृत्त झाला. निजामउल्मुल्क दक्षिणेंत येऊन पोह्मोंचला तेव्हां सर्व कामगार विथरून आपल्याबरोबर लढाई करण्याच्या उमेदींत आहेत असें त्यानें पाहिलें. परंतु तो मुळींच डगमगला नाहीं. त्यानेंही हळू हळू लढाईची तयारी केली. पुढें सन १७२४ त त्याची व मबारीजखानाची शक्करखेडा एथें फार मोठी लढाई झाली. तींत मबारीजखान मारला गेला व निजामउल्मुल्कास मोठा जय मिळाला. ह्या वेळापासून निजामउल्मुल्क दक्षिणेंत स्वतंत्र रीतीनें अंमल चालवूं लागला.

इ० स० १७२६ त निजामउल्मुल्काचा दक्षिणेंत चांगला

अंमल बसला होता. त्याला दिल्लीचा बादशाहा महंमदशाहा याचें मुळींच भय उरलें नव्हतें. परंतु मराठे हे दिवसेंदिवस ज्यास्त प्रबळ होत चालले आहेत, व जिकडे तिकडे मोंगलांचीं ठाणीं उठवून आपली सत्ता भराभर स्थापीत चालले आहेत, असें पाहून त्याला फार भीति पडली. तेव्हां मराठ्यांचे आपसांत कलह लावून त्यांना कमजोर करण्याकरतां काय उपाय योजावे याचा तो विचार करूं लागला. मराठ्यांचे आपसांत कलह लावण्यांत निजामउल्मुल्काचा आणखी दुसरा एक मोठा हेतु होता तो असा कीं मराठे दरवर्षी आपले चौथाई व सरदेशमुखी हे हक्क वसूल करण्याकरतां त्याच्या मुलखांत येत असत त्यांचेंही येणें अशा रीतीनें बंद करावें.

तेव्हां ह्या वेळीं पेशवे व प्रतिनिधि ह्यांच्यांत जें भांडण लागलें होतें त्यालाच आणखी पुष्टीकरण देऊन आपला डाव साधून घ्यावा असें निजामउल्मुल्कानें मनांत आणिलें. पुढें सन १७२६ त बाजीराव दूर कर्नाटकांत गेला आहे असें पाहून प्रतिनिधीस लांचलुचपत देऊन त्यानें वश करून घेतलें, व त्याच्या मार्फत शाहू महाराजांशीं असें बोलणें लाविलें कीं, "शाहू महाराजांनीं हैदराबाद एथील चौथाई व सरदेशमुखी ह्या हक्कांबद्दल कांहीं रोख पैसा घ्यावा, व इंदापुराजवळील कांहीं प्रांत जहागिरीदाखल घ्यावा." ह्या कामगिरीबद्दल निजामउल्मुल्कानें प्रतिनिधीस वऱ्हाडांत कांहीं जहागीर देण्याचें कबूल केलें होतें.

वरील गोष्टीस महाराजांनीं प्रथमतः रुकार दिला. त्या भोळ्या सांबाच्या मनांत निजामउल्मुल्काचा कावा मुळींच आला नाहीं! परंतु त्याचा तो कावा साधला नाहीं. कारण त्याच सुमारास बाजीराव कर्नाटकांतून परत आला. हें अंतस्थ कारस्थान त्याच्या लगेच लक्षांत आलें, व प्रतिनिधीचा त्याला मोठा राग आला. त्यानें महाराजांस त्या एकंदर कारस्थानाची फोड करून सांगितली. तो ह्मणाला, "निजाम मोठा कपटी आहे; ह्या कामांत त्यानें प्रतिनिधीला वश करून घेतलें आहे. त्यानें जें हें बोलणें लाविलें आहे त्यांत मराठ्यांचें

नुकसान किती आहे हें महाराजांच्या लक्षांत आलें नाहीं. ह्यांत त्याचा हेतु फार निराळा आहे. तो असा कीं, आपणांला चौथाई व सरदेशमुखीचे हक्कांबद्दल रोख पैसा व इंदापुराकडील प्रांत एकदां देऊन टाकला ह्मणजे आपल्या लोकांना त्याच्या राज्यांत आपले हक्क वसूल करण्याकरितां दरवर्षी जावें लागतें तें आपोआप बंद होईल, व तसें झालें ह्मणजे आपला त्याच्यावर जो हल्लीं वचक आहे तो नाहींसा होईल, आणि आपल्याविरुद्ध गुप्त कारस्थानें करायाला त्याला ज्यास्त उमेद येईल. त्याच्या राज्यांत आपलें जें एकदां पाऊल शिरलें आहे तें परत घेतलें तर त्यापासून आपला फार तोटा आहे." वर सांगितल्याप्रमाणें निजामउल्मुल्काचें कपट बाजीरावानें महाराजांच्या मनांत चांगलें भरवून दिलें. तेव्हांपासून प्रतिनिधि महाराजांच्या मर्जीतून अगदींच उतरला. तसेंच निजामउल्मुल्काचीही मसलत बाजीरावाच्या दूरदर्शीपणामुळें फसली. ह्या वेळेपासून प्रतिनिधि व पेशवे यांच्यांतील वैमनस्य फारच वाढलें.

वर सांगितल्याप्रमाणें निजामउल्मुल्काची युक्ति फसली तरी तो स्वस्थ बसला नाहीं. आपल्या राज्यांतून मराठ्यांचे हक्क काढून टाकण्याची त्यानें नंतर दुसरीच एक युक्ति काढली. ह्या वेळीं शाहू महाराजांना जिकडे तिकडे यशच मिळत चाललें होतें, व त्यांचा प्रतिपक्षी कोल्हापुरचा संभाजी याचें तेज अगदीं फिक्कें पडत चाललें होतें. तथापि तो आपल्या वंशाचें दक्षिणेकडील राज्य हातांत राखून, शिवाय सर्व राज्यावर आपला हक्क सांगतच होता. तेव्हां ह्या उभयतांत यादवी सुरू करून देऊन आपला फायदा करून घेण्याचा निजामउल्मुल्कानें निश्चय केला. पूर्वीपासून त्यानें कोल्हापुरच्या संभाजीचा पक्ष उचलला होता; व या प्रसंगींही त्यालाच त्यानें पुनः आपल्या हातीं धरलें. पुढें सालाबादप्रमाणें महाराजांनीं जेव्हां आपल्या हक्कांची मागणी केली, तेव्हां निजामउल्मुल्कानें त्यांना असें स्पष्ट उत्तर पाठविलें कीं, "तुमचे आपसांत कलह लागल्यामुळें मजकडे तुमच्या दोघांच्याही मागण्या आल्या आहेत. मला

तुह्मी दोघेही सारखेच. तुह्मांपैकीं मराठ्यांच्या गादीचा खरा वारस कोण याचा निर्णय झाल्याशिवाय मला कोणाचीच मागणी कबूल करतां येत नाहीं. गादीचा खरा मालक ठरेपर्यंत सर्व वसूल मीं आपणाकडे जप्त करून ठेविला आहे. तुमचा न्याय केल्यावर ज्याचा त्याला वसूल मिळेल." असें उत्तर देऊन त्यानें शाहू महाराजांच्या तर्फेचे आपल्या राज्यांतले मोकासदार व चौथाई व सरदेशमुखी वसूल करणारे लोक यांस घालवून दिलें.

परंतु निजामाचें हें कपट बाजीरावापुढें चालेना. त्याचा तो कावा बाजीरावाच्या तेव्हांच लक्षांत आला. त्यानें ती गोष्ट महाराजांस मोठी तिखटमीठ लावून सांगितली. तो ह्मणाला, "निजाम हा पक्का ठक आहे. आपला न्याय करण्याचा याला काय अधिकार? हा कोण? ह्यांत निजामानें आपणाकडे केवढें वर्चस्व घेतलें व मराठ्यांकडे किती कमीपणा दिला हें महाराजांच्या ध्यानांत आलेंच असेल. आपसांत कलह लावून देऊन त्यापासून आपलें कार्य साधून घ्यावें व मराठ्यांचे हक्क आपल्या राज्यांतून अजीबात काढून टाकावे एवढाच निजामाचा ह्यांत मतलब आहे."

याप्रमाणें निजामाचें कपट महाराजांच्या लक्षांत आलें तेव्हां त्यांना मोठा राग आला, व त्यांच्या पूर्वजांच्या आंगचें वीरश्रीचें वारें त्यांच्या अंगांत संचरलें. ते ह्मणाले, "बाजीराव! तुह्मी ह्मणतां तें खरें आहे. त्या कपटी निजामाचें पारिपत्य स्वतः जाऊन करण्याचा आमचा निश्चय झाला आहे. त्यास तुमचें अनुमोदन असेल तर दसरा होतांच स्वारीची तयारी करावी." त्या वेळीं बाजीरावानें उत्तर केलें कीं, "महाराज स्वतः स्वारीवर गेल्यावर काय नाहीं होणार? सिंहानें सिंहाबरोबर टक्कर मारावी. आपण आह्मां सर्व हिंदूंचे पादशाहा, तेव्हां प्रसंग पडल्यास आपण दिल्लीच्या पादशाहाशीं लढावें हेंच योग्य. निजाम ह्मणजे यःकश्चित् मनुष्य. त्याचा बंदोबस्त करायाला उशीर काय? आज्ञा होईल तर ह्या एकालाच काय, पण असल्या शेंकडों निजामांना धुळीचे दिवे खायाला लावीन!"

अशा रीतीनें **महाराजांचा** राग शांत करून **बाजीरावानें** स्वारीची तयारी केली. त्या वेळीं राजाज्ञेवरून जुने शेंकडों घरंदाज लढवय्ये लोक व सरदार **बाजीरावाच्या** जरीपटक्यास येऊन मिळाले. तिकडे **औरंगाबादेस निजामउल्मुल्कानेंही** मोठी कडेकोट तयारी चालविली होती, व तो मराठ्यांची वाट पहात बसला होता. पावसाळा संपल्यावर इ० १७२७ च्या नवंबर महिन्यांत **बाजीरावाची** स्वारी **पुण्याहून** निघाली.

प्रथमतः तो **जालना** प्रांतांत शिरून तिकडील मुलूख उद्वस्त करीत चालला. **निजामउल्मुल्काचा** बिनीचा सरदार **इवाझखान** हा प्रथमतः **बाजीरावावर** चाल करून आला. त्याच्याशीं थोडा वेळ लढाई करून **बाजीराव** प्रथमतः **माहुराकडे** व नंतर **औरंगाबादेकडे** एकदम वळला. नंतर पुनः एक वळसा घेऊन **बऱ्हाणपूर** शहर जाळण्याचा रोंख दाखवून तो **खानदेशांत** गेला. परंतु **निजामउल्मुल्क** आपल्या पाठीवर आहे हें तो जाणून होता. तेव्हां त्यानें **निजामउल्मुल्कास** फसविण्याची निराळीच युक्ति काढिली. **निजामउल्मुल्क अजिंठ्याचा** घांट उतरून अलीकडे आला ही बातमी **बाजीरावास** समजतांच त्यानें आपल्या फौजेपैकीं एक दोन टोळ्या **बऱ्हाणपुराकडे** पाठवून दिल्या, व आपण डाव्या बाजूस एक मोठा वळसा घेऊन आपल्या सर्व सैन्यासह **गुजराथेवर** येऊन पडला. त्यानें तो सर्व मुलूख लुटून फस्त केला. त्या वेळीं **गुजराथचा** सुभेदार **सरबुलंदमखान** हा होता. त्याचें व **निजामउल्मुल्काचें** वांकडें होतें. त्याला **बाजीरावानें** अशी थाप दिली कीं, मी हें लुटण्याचें काम **निजामउल्मुल्काच्या** सल्यानें करीत आहें, व ह्या **बाजीरावाच्या** थापेला, **निजामउल्मुल्क सुरतेस** येणार ह्मणून जी वदंता उठली होती, तिच्यामुळें ज्यास्त पुष्टीकरण आलें.[1]

इकडे **निजाम बऱ्हाणपूरच्या** वाटेवर, **बाजीराव** केव्हां येईल व मी त्याचा केव्हां मोड करीन अशा घमेंडींत त्याची

---

१ ग्रांटडफ.

वाट पहात बसला होता; व **बा**जीरावानें तिकडे **गु**जराथेंत कहर करून दिला होता याची त्याला दादही नव्हती. पुढें त्याला ती बातमी कळतांच तो हात चोळूं लागला, व "पेशव्यानें मला ठार फसविलें" असें ह्मणूं लागला. ह्याबद्दल **पे**शव्याचा सूड उगविण्याकरितां त्यानें **द**क्षिणेंत जाऊन **पु**णें शहर जाळण्याचा निश्चय केला, व त्या उद्देशानें तो परत फिरला. परंतु तो **अ**हमदनगरपर्यंत जाऊन पोहोंचला नाहीं तोंच **बा**जीरावाला ती बातमी कळून तो मोठ्या त्वरेनें आपल्या सर्व लष्करासहित निघाला व **का**सारबारीच्या घाटानें खालीं उतरून **गां**डापूर व **वै**झापूर हे प्रांत उद्ध्वस्त करीत करीत **नि**जामाच्या अगदीं पाठीशीं येऊन भिडला. तेव्हां **नि**जामउल्मुल्क **पु**ण्याची वाट सोडून परत फिरला व **गो**दावरी उतरून पलीकडे गेला. नंतर हलके हलके लढाई चालवून हूल देत देत व **नि**जामाला आपल्या अंगावर घेत घेत **बा**जीराव मोठ्या अडचणींच्या ठिकाणीं त्याला घेऊन गेला, व त्या ठिकाणीं वेढा देऊन त्याला त्यानें कोंडून धरलें. ह्या वेळीं **नि**जामाबरोबर **को**ल्हापुरचा **सं**भाजी राजा, **चं**द्रसेन **जा**धव, **रा**वरंभा **निं**बाळकर वगैरे बरेच सरदार होते. **बा**जीरावानें सभोंवतालचें दहा बारा कोस रान जाळून टाकलें, व त्यामुळें **नि**जामउल्मुल्काच्या लष्करांत दाणापाणी, वैरण वगैरे जाण्याची बंदी झाली. **नि**जामाचा तोफखाना चांगला असल्यामुळें मराठ्यांचें वरेंच नुकसान झालें, तथापि **बा**जीराव मुळींच डगमगला नाहीं. शत्रूकडील एखादी टोळी दाणावैरण आणण्याकरतां बाहेर पडली तर **बा**जीरावाचे लोक तिची तेव्हांच कत्तल करून टाकीत. असे कांहीं दिवस लोटले. **नि**जाम आपल्या पदरच्या मराठे सरदारांस ह्मणूं लागला, "तुह्मी व ते दोघेही मराठे; असें असतां **बा**जीरावाची युक्ति तुह्मांस कशी कळली नाहीं? तुह्मांमध्यें वकूब मुळींच नाहीं; नाहीं तर मी असा फसलों नसतों." **चं**द्रसेन **जा**धव ह्मणाला, "माझें एकट्याचें काय चालणार? माझ्या सैन्यांत बहुतेक मोंगल लोक आहेत, त्यांच्या हातून मराठ्यांप्रमाणें काम होत नाहीं." **सं**भाजी

ह्मणाला, "माझे लोक अगदींच थोडे आहेत, व माझे कारकून लोक आंतून बाजीरावास फितूर आहेत असा मला संशय आहे. त्यांच्या हातीं माझा वांटणीचा पैसा देऊं नका; तो ते माझ्या शिपायांना व मला न देतां मधल्यामधें खाऊन जातील." कारकून लोकांना विचारलें त्या वेळीं त्यांनीं सांगितलें, " संभाजीच्या हातीं पैसा गेला तर तो सर्व तो चैनबाजींत उडवून टाकील, व तसें झालें ह्मणजे आमची उपासमार होईल व सैन्यांतील लोक बंड करतील." सारांश सभोंवतीं वेढा पडला होता त्यांतून आपली मुक्तता करून घेण्याचा उपाय करण्याचें सोडून देऊन, "आह्मी एवढे अरेराव असून बाजीरावाचे कैदेंत सांपडलों कसे?" असें रडगाणें गात निजाम स्वस्थ बसला! धान्यसामग्री संपल्यामुळें अन्नान्नगत झाली. उपासमार सोसवेनासा झाला. पेशव्याच्या लष्करांतून सूं सूं करीत बंदुकीच्या गोळ्या सुटून त्याचे लोक पटापट मरून पडूं लागले. शेवटीं निरुपाय होऊन इवाझखानाच्या मार्फत तह करण्याविषयीं निजामउल्मुल्कानें बाजीरावास विनंति केली. बाजीरावानें तहाचें बोलणें मान्य करून खानाबरोबर असें सांगून पाठविलें कीं, " कोल्हापुरचे संभाजीस आमचे स्वाधीन करावें, तुमच्या हैदराबाद प्रांतांत आमचे वसूल करणारे जे कारकून येतील त्यांच्या संरक्षणाकरतां कांहीं किल्ले आमचे हवालीं करावे, व मागील सर्व पैशाची तावडतोब फेड करावी." यांपैकीं पहिलें कलम शिवाय करून बाकीचीं कलमें निजामउल्मुल्कानें कबूल केलीं. पहिल्या कलमाच्या संबंधानें बाजीरावानें निजामउल्मुल्कास सांगितलें कीं, "संभाजी राजे व आमचे महाराज हे भाईबंद आहेत, तेव्हां त्यांचा मान आह्मी आमचे धन्याप्रमाणेंच राखूं." शेवटीं त्या बाबतींत असें ठरलें कीं, "निजामानें संभाजीला सुरक्षितपणें पन्हाळ्यावर नेऊन पोहोंचतें करावें. नंतर शाहू महाराज व संभाजी यांनीं एकचित्त होऊन आपसांतील कलह मिटवावा. त्या कामांत निजामानें हात घालूं नये." याप्रमाणें तह झाल्यावर एकमेकांनीं एकमेकांच्या

---

१ ग्रांटडफ.

भेटी घेतल्या. या दोन वीरांची ही प्रथमचीच मुलाखत. याच प्रसंगीं बाजीरावास मस्तानी[1] नांवाची यवनी स्त्री मिळाली. हा जय झाल्यानंतर बाजीरावानें राणोजी शिंदे व मल्हारराव होळकर यांस लष्करखर्चा-करतां १२ परगण्यांची जहागीर करून दिली. हें वर्तमान सन १७२८ त घडलें.

वरील तहामुळें दोन्ही पक्षांचें हितच झालें, परंतु त्यांत बाजी-रावाचा जास्त फायदा झाला. कारण ह्या वेळीं गुजराथची चौथाई व सरदेशमुखी आपणास मिळावी ह्याबद्दल त्याचें सरबुलंदखानाशीं बोलणें सुरू होतें, व आतां निजामाची या कामामध्यें ढवळाढवळ क-रण्याची भीति नाहींशी झाल्यामुळें तें सुलभ रीतीनें पार पडण्याचा मार्ग खुला झाला. प्रथमतः सरबुलंदखानानें मराठ्यांना घालवून दे-ण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्याचें कांहीं चाललें नाहीं. तेव्हां त्यानें त्या प्रांताची अगदींच धूळधाणी होऊं नये ह्मणून बाजीरावाशीं तहाचें बोलणें सुरू केलें होतें. पूर्वी त्यानें दिल्लीच्या बादशाहाची बहुत प्रकारें विनवणी करून बोलणें लाविलें होतें कीं, "माझ्या मुलखाची हैराणगत झाल्यामुळें वसूल येत नाहीं, याकरतां तिकडून द्रव्य पाठ-वून खाविंदांनीं माझें रक्षण करावें." परंतु त्या अंदाधुंदीच्या दरबारांत त्याची दाद कशानें लागणार? कंठाजी कदम व पिलाजी गायक-वाड हे तो मुलूख स्वाऱ्या करकरून अगदीं ओस पाडीत चालले होते. तेव्हां सरबुलंदखानानें त्यांस चौथाई देण्याचें कबूल केलें. परंतु ते वसूल मात्र गोळा करीत व मुलखाचा बंदोबस्त करीत नसत. पुढें चिमणाजी आपा मोठें सैन्य घेऊन गुजराथेंत शिरला. त्यानें प्रथमतः पेटलादच्या अधिकाऱ्यापासून जबर खंडणी घेऊन धोलका

१ मस्तानी बाजीरावास कशी प्राप्त झाली या संबंधाचे निरनिराळे लेख आहेत. एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, प्रथमतः ती चिमणाजी आपास मिळाली, व आपला अंगीकार करावा ह्मणून तिनें आपास विनंति केली. परंतु त्यानें ती गोष्ट कबूल केली नाहीं. त्यानें तिला सांगितलें कीं, "तुझा अंगीकार क-रण्यास माझा वडील बंधु बाजीरावच योग्य आहे." नंतर त्यानें ती बाजीरावास आणून दिली.

परगणा लुटून फस्त केला. त्यानें सरबुलंदखानास असें कळविलें कीं, " गुजराथची चौथाई व सरदेशमुखी तुह्मी आह्मांस देण्यास कबूल असाल तर आह्मी तुमच्या मुलखाचें संरक्षण करूं व इतर लुटारू लोकांचा तुह्मांस उपद्रव होऊं देणार नाहीं." इतक्यांत निजामउलमुल्काशीं तह करून बाजीरावही गुजराथेंत गेला. तेव्हां त्यानें सरबुलंदखानाकडे आपला वकील शामराजपंत यास पाठविलें. त्याच्याजवळ सरबुलंदखानानें सुरत शहर खेरीज करून बाकी सर्व गुजराथ प्रांताचा काळीचा व जकातीचा जो वसूल येईल त्याची चौथाई व सरदेशमुखी देण्याची सनद करून दिली, तसेंच अमदाबाद शहराच्या वसुलावर शेंकडा ५ टक्के देण्याचें कबूल केलें; व ह्याबद्दल बाजीरावानें निरंतर २५०० स्वार गुजराथेंत ठेवावे व त्या मुलखाचा बंदोबस्त राखावा असें ठरलें. ह्या तहांत आणखी एक कलम असें होतें कीं, "मी बाजीराव, शाहू महाराजांच्या वतीनें असें कबूल करतों कीं, आमचे मराठे लोक तुमच्या मुलखांत जे बंडखोर जमीनदार वगैरे लोक आहेत त्यांस कोणत्याही तऱ्हेनें मदत करणार नाहींत." ह्या तहानंतर गुजराथचें मोकासबाबीचें उत्पन्न व सरदेशमुखीचा थोडा भाग बाजीरावानें दाभाड्याकडे लावून दिला. परंतु पेशव्यानें त्या मुलखांत आपला हात घातला हें पाहून दाभाड्याच्या मनांत पेशव्याविषयीं मत्सर उत्पन्न झाला. वरील वर्तमान इ० स० १७२९ त घडलें.

बाजीराव गुजराथेंत चिमणाजी आपाच्या मदतीस गेला आहे असें पाहून कोल्हापुरच्या संभाजीला चळवळ करायाला चांगली संधि सांपडली. निजामउलमुल्काकडून संभाजी पन्हाळ्यास परत आल्यावर शाहू महाराजांनीं आपसांत तंटा नसावा अशा उद्देशानें संभाजीशीं तहाचें बोलणें लाविलें. परंतु त्याला आंतून उदाजी चव्हाणाची फूस असल्यामुळें त्यानें तें बोलणें मान्य केलें नाहीं. नंतर चव्हाणाच्या साह्यानें मोठें लष्कर गोळा करून व आपल्या कुटुंबाचीं सर्व मनुष्यें बरोबर घेऊन त्यानें वारणा नदीच्या उत्तरेस आपला तळ

दिला, व तेथून तो शाहू महाराजांचा मुलूख लुटूं लागला. श्रीपतराव प्रतिनिधि महाराजांजवळ होता. परंतु पूर्वी निजामाशीं त्यानें मसलत केली होती तेव्हांपासून तो त्यांच्या मर्जींतून उतरला होता. तेव्हां महाराजांची मर्जी पुनः सुप्रसन्न करून घेण्याला ही संधि बरी आहे असें त्याला वाटलें. नंतर राजाज्ञा घेऊन तो संभाजीवर चालून गेला व त्याचा पराभव करून त्याला पन्हाळ्याकडे त्यानें पिटाळून लाविलें. संभाजीचे पुष्कळ लोक प्रतिनिधीनें पकडले, त्याचप्रमाणें ताराबाई व राजसबाई ह्याही प्रतिनिधीच्या हातांत सांपडल्या. तीं सर्व मनुष्यें घेऊन तो साताऱ्यास निघून आला. पुढें ताराबाई व राजसबाई यांस त्यांच्या इच्छेवरून महाराजांनीं साताऱ्याच्या किल्ल्यांत जुना वाडा होता तेथें ठेविलें, व संभाजीच्या इतर मंडळीस मुक्त करून पन्हाळ्यास परत पाठवून दिलें. महाराजांचें मन किती थोर होतें ह्याचें हें एक ढळढळीत उदाहरण आहे. असो. ह्या कामगिरीबद्दल प्रतिनिधीची महाराजांनीं फार तारीफ केली, परंतु त्याच्या योगानें महाराजांजवळ बाजीरावाचें जें वजन होतें त्याला मुळींच धक्का पोहोंचला नाहीं. पुढें शाहू महाराज व संभाजी यांच्यामध्यें तह ठरला तो एणेंप्रमाणें:—“कोंकणांत रत्नागिरी किल्ला शाहू महाराजांस संभाजीनें द्यावा, व त्याबद्दल तुंगभद्रेच्या कांठचा कोपाळ किल्ला आपण घ्यावा; तसेंच साळशीपासून अंकोल्यापर्यंत सर्व कोंकणपट्टी संभाजीस द्यावी व शाहू महाराजांनीं त्याबद्दल मिरज, तासगांव, आथणी, कृष्णेच्या उत्तरेकडचे कांहीं गांव व विजापूरच्या हद्दींतील कितीएक गढ्या ह्या घ्याव्या; व तुंगभद्रेच्या दक्षिणेस मराठ्यांनीं ज्यास्त मुलूख मिळविल्यास त्यामध्यें दोघांचाही भाग असावा; त्याचप्रमाणें पूर्वीपासून पिढीपिढीचे हक्क, इनामजमिनी, देवस्थानें, धर्मादाय वगैरे जेथें जेथें जे जे हक्क चालत आले असतील तेथें तेथें ते ते हक्क परस्परांनीं परस्परांचे चालवावे, त्यांस कोणीं हरकत करूं नये.”

वारणानदीच्या दक्षिणेस उदाजी चव्हाण याची वडगांवची गढी होती ती महाराजांनीं संभाजीला सांगून जमीनदोस्त करून टाकली, व अशा प्रकारें, त्यानें वरील बखेडा माजवून त्रास दिल्याबद्दल त्यास चांगलें शासन केलें. हें वर्तमान इ० स० १७३० त घडलें.

---

# भाग ७.

## बाजीराव बल्लाळ पेशवे यांची कारकीर्द.

### इ० स० १७३०—१७३८.

निजामउल्मुल्काचा कावा व डभईची लढाई.—दाभाडे व पेशवे यांचा शाहू महाराज सलोखा करून देतात.—निजामाशीं तह.—पुण्यास ब्राह्मणांना अद्यापि अंशतः जी दक्षिणा मिळते तिची पूर्वपीठिका.—निजामाशीं दुसरा ठराव.—गुजराथची धामधूम.—दायबहादराचा मृत्यु.—बाजीरावाची बुंदेलखंडावर स्वारी.—बुंदेलखंडचा राजा छत्रसाल आपल्या राज्याचा तिसरा भाग बाजीरावास देतो.—जयसिंग माळव्याच्या सुभेदारीवर येतो.—रघूजी भोंसले याचा उदय.—कान्होजी आंग्र्याच्या मुलांचे आपसांत कलह.—मानाजी आंग्रे महाराजांपाशीं मदत मागतो.—शिद्दी व मराठे यांच्यांत लढाई उत्पन्न होते.—तिचा परिणाम.—बाजीराव शिद्दीचा मोड करितो.—मराठे व शिद्दी यांच्यांत तह होतो.—होळकर आग्र्यापर्यंत मोंगलांचा मुलूख हैराण करून टाकतो.—मराठे गुजराथ लुटतात.—कर्ज झाल्यामुळें बाजीरावाची मानसिक स्थिति.—त्याची उत्तरहिंदुस्थानची मोहीम.—बादशाहा तह करण्यास कबूल होतो.—मराठ्यांचीं अमर्याद मागणीं.—निजामउल्मुल्क बादशाहाचे मदतीस येतो.—सादतखान व मराठे.—बाजीराव दिल्लीवर चालून येतो.—दिल्लीची लढाई.—बाजीराव सातार्‍यास येतो व कोंकणांत पोर्तुगीज लोकांचें पारिपत्य करण्याकरितां मानाजी आंग्र्याच्या मदतीस जातो.—कुलाब्याची लढाई व पोर्तुगीज लोकांचा पराभव.—आंग्रे व शाहू महाराज यांच्यामध्यें तह होतो.—उत्तरहिंदुस्थानांत मराठ्यांच्या नाशाकरतां मोठी कडेकोट तयारी चालू आहे असें समजल्यावरून बाजीराव कोंकणांतून परत येतो.

इ० स० १७३० त गुजराथेंतही मोठी गडबड उडून गेली होती. १७२८ ह्या वर्षी निजामउल्मुल्कानें बाजीरावाबरोबर तह केला होता खरा, परंतु तो तह त्यानें नाइलाजास्तव केला होता. तेव्हां तो 'जुलमाचा रामराम' किती दिवस टिकणार? केव्हांना केव्हां तरी पेशव्याचा पुरा नाश करण्याचे विचार त्याच्या मनांत घोळत होते, व तशी संधि आणण्याविषयीं तो अगदीं टपून बसला होता. कोणाला तरी हाताशीं धरून त्याला पुढें करावें, व दिसण्यांत आपण अगदीं अलग आहों असें दाखवून आंतून आपला डाव साधून घ्यावा असें

त्याच्या मनांत होतें; आणि तशा प्रकारचा मनुष्य दैवयोगानें त्याला ल- वकरच सांपडला. पूर्वी सन १७२९ त सरबुलंदखान व बाजीराव यांचा तह झाला होता, तो तह बाजीरावानें त्रिंबकराव दाभाडे, पिलाजी गायकवाड, बांडे वगैरे मराठे सरदार त्या वेळीं गुजराथेंत होते त्यांच्या सल्ल्यानें केला नव्हता; यामुळें त्या तहापासून त्यांना यत्- किंचित्ही फायदा झाला नाहीं. तेव्हां "त्या तहांत पेशव्यानें आ- पला मात्र फायदा करून घेतला, आह्मांला कांहींच दिलें नाहीं" असा विकल्प त्यांच्या मनांत उत्पन्न झाला; व त्या वेळेपासून दाभाडे पेश- व्याचा द्वेष करूं लागला. हा द्वेष निजामउल्मुल्काच्या चांगला फा- यद्यावर पडला. त्यानें आंतून त्रिंबकराव दाभाड्याशीं गुप्त कार- स्थान सुरू केलें, व बाजीरावाचा नाश करण्याकरतां लागेल ती मदत त्यास देण्याचें कबूल केलें. ह्यामुळें दाभाडे फार चढून गेला, व पेश- व्याबरोबर लढाई करण्याची तयारी करूं लागला. त्यानें सैन्यांत जास्त लोक ठेविले, व पुष्कळ मराठे सरदारही आपणाकडे वश करून घेतले. निजामउल्मुल्कानें, "तुह्मी दक्षिणेंत शिरल्याबरोबर आमचे लोक तुमच्या मदतीस येतील" असें त्यास सांगितलें. थोडक्याच वेळांत दाभाड्याजवळ एकंदर ३९००० फौज जमली. त्यानें लो- कांत असें जाहीर केलें कीं, "आमचे धनी शाहू महाराज यांचें राज्य बाजीरावानें आपल्या हाताखालीं घातलें आहे, तें स्वामींचें स्वामींस परत मिळवून द्यावें एवढ्याचकरतां दक्षिणेंत स्वारी करण्याचा हा बेत मीं केला आहे. हें महत्कार्य पार पाडून नेण्याकरतां समशेर बहादर पिलाजीराव गायकवाड, त्यांचे बंधु महादाजीराव व पुत्र दमाजीराव, तसेंच कुवरबहादर, कंठाजीराव व रघूजीराव कदम बांडे, उदाजी- राव, आनंदराव व मालोजीराव पवार, चिमणाजी दामोदर, जावजी दाभाडे वगैरे मोठमोठे सरदार माझ्या मदतीस आले आहेत." काय चमत्कार पहा ! धारकर पवार व गायकवाड यांचा पूर्वीपासून उभा दावा व त्यांच्या आपसांत नेहमीं लढाया सुरू असत; परंतु या कटांत प्रत्यक्ष शत्रूही मित्र झाले होते ! परमुलखी प्रजापीडक जुलमी लोकां-

पासून देशास मुक्त करण्याचे ज्या बाजीरावाचे अव्याहत प्रयत्न सुरू होते, त्या शूर व स्वराजनिष्ठ पुरुषाचा नाश करण्याकरतां वरील सरदारमंडळीची कडेकोट तयारी चालली होती हें पाहून कोणाला आश्चर्य वाटणार नाहीं ?

**बा**जीरावाला हें वर्तमान समजलें तेव्हां तो मुळींच डगमगला नाहीं. परंतु **नि**जामउल्मुल्काचें **त्रिं**बकरावास आंतून साह्य आहे ही गोष्ट ऐकून त्याला अतिशय राग आला, व **नि**जामउल्मुल्क व **दा**भाडे यांच्या सैन्याची गांठ पडण्यापूर्वीच **दा**भाड्याला गांठण्याचा त्यानें निश्चय केला; आणि स्वारीची तावडतोब तयारी करून त्यानें लोकांत असें जाहीर केलें कीं, “ **से**नापति **दा**भाडे हा हिंदु असून, हिंदूंचा पुरा हाडवैरी जो **नि**जामउल्मुल्क त्याच्या मसलतींत शिरला आहे, व त्याच्या मदतीनें मराठी राज्याचे दोन विभाग करूं पहात आहे. ही गोष्ट आपल्या धर्मास व राजनीतीस अगदीं विरुद्ध आहे. ह्या वेळीं माझ्याजवळ फक्त १८००० फौज आहे, व **दा**भाडे आज ३९००० फौज घेऊन तयार आहे. तथापि त्याचें पारिपत्य करण्याची माझ्या अंगांत हिंमत आहे. मीं खऱ्या पक्षाचा अंगीकार केला आहे, तर यांत मला कधींही अपयश येणार नाहीं. माझ्याजवळ जेवढी फौज आहे तेवढी घेऊन मी आज **दा**भाड्याला शिक्षा लावण्याकरतां जात आहें, तर जो हाडाचा खरा हिंदु असेल व **शि**वाजी **म**हाराजांची गादी कायम रहावी अशी ज्याची इच्छा असेल त्या प्रत्येकानें या वेळीं मागेंपुढें न पहातां यथाशक्ति मला मदत करावी. ” हीं अक्षरें कानीं पडतांच लढाईच्या कामांत कसलेले बरेच शिपाई व सरदार लोक **बा**जीरावास येऊन मिळाले. **बा**जीरावाचे लोक थोडे होते तरी ते लढाईच्या कामांत अनुभवलेले होते, व **त्रिं**बकरावाचें सैन्य जरी फार मोठें होतें तरी त्यांत खोगीरभरती फार होती. **नि**जामाचीही **द**क्षिणेंत थोडथोडी चळवळ दिसूं लागली, त्याबरोबर **बा**जीराव आपल्या सैन्यासह **पु**ण्याहून निघाला व **न**र्मदा उतरून गुजराथेंत शिरला. प्रथमतः त्यानें आपसांत सल्ला करण्याचें बोलणें **दा**भाड्याशीं सुरू केलें, परंतु **बा**जीरावाच्या वि-

नीचा सरदार **आ**वजी **का**वरे याच्यावर **द**माजी **गा**यकवाड यानें एकाएकीं हल्ला करून त्याचा अगदीं मोड करून टाकला, त्यावरून तें सह्याचें बोलणें तितकेंच राहिलें. एखादा भित्रा मनुष्य असता तर तो हा प्रथमचाच अपशकून पाहून गर्भगळित होऊन गेला असता; परंतु त्या धैर्यसागर **बा**जीरावाला त्याचें कांहींच वाटलें नाहीं; इतकेंच नव्हे, परंतु ह्या अपजयामुळें त्याला दुप्पट अवसान आलें, व **दा**भाड्याशीं सामना करण्याचा त्यानें एकदम निश्चय केला. नंतर हळू हळू कूच करीत तो **ब**डोदें व **ड**भई यांच्यामध्यें एक मोठें मैदान आहे तेथें जाऊन उतरला. **दा**भाड्याच्या सैन्याचाही तेथून जवळच तळ पडला होता. इ० स० १७३१ च्या एप्रिल महिन्याच्या १ ल्या तारखेस प्रातःकाळीं लढाईला सुरुवात झाली. **दा**भाड्याच्या सैन्यांत खोगीरभरताड पुष्कळ असल्यामुळें **बा**जीरावाच्या कट्टया शिपायांपुढें त्यांच्यानें टिकाव धरवेना. **दा**भाड्याचे पुष्कळ लोक ठार झाले तेव्हां बाकीच्या सैन्यानें शस्त्रें टाकून पळ काढला. त्यांच्याबरोबर **कं**ठाजीराव **क**दम **बां**डे यानेंही आपला पाय काढला. **जा**वजीराव **दा**भाडे प्रथमतःच समरभूमीवर मारला गेला, **मा**लोजीराव **प**वार ह्यालाही गोळी लागून तो घोड्यावरून पडून ठार झाला, **द**माजी **गा**यकवाडाचीही तीच गत झाली, आणि **उ**दाजी **प**वार व **चि**मणाजी **दा**मोदर हे मोठ्या वीरश्रीनें लढत असतां त्यांस मोठ्या जखमा लागून ते **बा**जीरावाच्या हातांत सांपडले. **आ**नंदराव **प**वार, **पि**लाजी **गा**यकवाड व **कु**वरबहाद्दर यांनाही मोठमोठ्या जखमा लागल्या, परंतु दैवयोगानें ते **बा**जीरावाच्या हातांतून निसटून पळून गेले. अशा रीतीनें बहुतेक सैन्याची तर वाट लागली. फक्त **त्रिं**बकरावाच्या खासगी टोळीचे लोक तेवढे मोठ्या नेटानें लढत होते. **बा**जीराव घोड्यावर बसून आपल्या लोकांस वरचेवर उत्तेजन देत विजेप्रमाणें इकडून तिकडे तिकडून इकडे असा फिरत होता. **त्रिं**बकरावही कमी होता असें नाहीं. तोही आपल्या लोकांना उत्तेजन देत होता व मोठ्या निकरानें लढत होता. तेव्हां एकंदरीनें ही लढाई फारच भयंकर झाली व कांहीं वेळप-

र्यंत तिचा काय शेवट होतो याचा कांहींच अजमास लागेना. त्रिंबकराव ज्या हत्तीवर बसला होता त्याचे पाय त्यानें सांखळदंडानें बांधून टाकले होते. तो मोठा पटाईत तिरंदाज होता. त्यानें भात्यांतून एक बाण काढून तो धनुष्यावर लावला, व आकर्ण ओढून बाजीरावाचे प्राण हरण करण्याकरतां तो सोडणार, इतक्यांत बाजीरावाच्या सैन्यांतून एक गोळी येऊन ती, दाभाडे हौद्यांत बसला होता तेथें त्याच्या मस्तकांत लागली; त्याबरोबर तो तेथच्या तेथेंच ठार झाला. आपला यजमान पडला असें पाहून दाभाड्याच्या लोकांचें धैर्य सुटलें, व त्यांनीं युद्धांतून पळ काढला, आणि बाजीरावास विजयश्रीनें माळ घातली.

सेनापति दाभाडे याचें बाजीरावानें पारिपत्य केल्यावर तो साताऱ्यास महाराजांचे भेटीस आला, व झालेली कच्ची हकीकत त्यानें त्यांचे कानावर घातली. तेव्हां निजामाचा त्यांना मोठा राग आला, व त्याच्या कपटजालांत सांपडून आपला एक शूर सरदार प्राणास मुकला याबद्दल त्यांना पराकाष्ठेचें वाईट वाटलें. परंतु झाल्या गोष्टीस इलाज नाहीं असें समजून त्यांनीं बाजीरावास पुण्यास जाण्याची आज्ञा दिली. नंतर त्रिंबकराव दाभाड्याची स्त्री उमाबाई इचें सांत्वन करण्याकरतां महाराजांची स्वारी तळेगांवीं आली, व उमाबाई व त्रिंबकरावाचा पुत्र यशवंतराव दाभाडे यांना समागमें घेऊन ते साताऱ्यास आले, आणि बाजीरावासही बोलावून नेऊन उभयपक्षांचा सलोखा करून दिला. दाभाड्याच्या प्रांताचा सर्व कारभार, यशवंतराव अज्ञान होता ह्मणून उमाबाई[1] व त्रिंबकरावाचा विश्वासू जुना सरदार

१ उमाबाई ही त्रिंबकराव दाभाड्याची स्त्री असून पतीचे मरणानंतर (इ० स० १७३१) कांहीं दिवस तिनें आपला कारभार मोठ्या शहाणपणानें चालविला असें ग्रांटडफ ह्मणतो. 'मराठी साम्राज्याच्या छोट्या बखरीं'तही त्रिंबकरावाची स्त्री उमाबाई असें म्हटलें आहे. परंतु दाभाड्यांच्या हकीकतीचें जें पुस्तक आहे त्यांत असें लिहिलें आहे कीं, "खंडेराव दाभाडे यांची स्त्री उमाबाई होती. त्यांजपाशीं बाजीराव यांजला घेऊन येऊन महाराज बोलले कीं, त्र्यंबकराव तुझा पुत्र, व बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे यांचा भाऊपणा होता, त्यावरून हा (बाजीराव) ही तुझाच पुत्र आहे."—का० सं.

पिलाजी गायकवाड यांस सांगितला. तसेंच गायकवाडास "समशेर बहाद्दर" हा किताब पूर्वीं मिळालाच होता, त्यास "सेनाखासखेल" हा दुसरा आणखी किताब देऊन गुजराथचा बराच भाग जहागिरीदाखल त्यास दिला. त्या वेळीं सेनापति व पेशवे यांच्यामध्यें कलह होऊं नयेत ह्मणून शाहू महाराजांनीं त्यांच्यांत एक करार ठरवून दिला, व त्यावर दोघांच्याही सह्या घेतल्या. त्या ठरावांत असें ठरलें कीं, "सर्व गुजराथ प्रांतांत सेनापतीचा पूर्ण अधिकार असावा, व माळवा प्रांताची पूर्ण अखत्यारी बाजीरावास असावी. कोणीं कोणाच्या मुलखांत उपद्रव करूं नये. गुजराथ प्रांताच्या वसुलापैकीं अर्धा वसूल बाजीरावाचे मार्फत सरकारी पोत्यास जमा व्हावा, व सरबुलंदखानास ज्या प्रांताच्या सनदा करून दिल्या होत्या तो प्रांत खेरीज करून इतर प्रांतांतून कांहीं बाबींच्या संबंधानें ज्यास्त वसूल येईल त्यापैकीं खर्चवेंच वजा जातां बाकी जी रकम शिलक राहील तिचा सरकारांत भरणा करावा." ह्या ठरावामुळें, पिलाजीच्या ताब्यांतील डभई व बडोदें हीं दोन शहरें बाजीरावाच्या मनांतून घ्यावयाचीं होतीं तो त्याचा बेत फसला, व तीं पिलाजीच्या ताब्यांत तशींच राहिलीं. हा तह इ० स० १७३१ च्या आगष्ट महिन्यांत झाला.

बाजीराव गुजराथेंतून मोकळा होतांच, निजामउल्मुल्काला त्याच्या कपटाबद्दल चांगलें प्रायश्चित्त देण्याचा त्यानें बेत केला. आपण बाजीरावाच्या नाशाकरतां योजिलेले सर्व प्रयत्न निष्फल झाले, व आतां बाजीराव त्याबद्दल आपला पुरा सूड घेतल्याशिवाय राहणार नाहीं, हें पाहून तो फार घाबरला. दक्षिणेंतून मुसलमानांची सत्ता खात्रीनें नाहींशी होणार असें त्याला वाटूं लागलें. तेव्हां त्या महाठकानें लगेच बाजरीवाजवळ सामोपायाचें बोलणें सुरू केलें. बाजीरावाच्या मनांत मुळपासून दिल्लीच्या बादशाहीच्या बुडाशीं घाव घालायाचा होता हें निजाम ओळखून होता; तेव्हां त्यानें तसें करण्याविषयीं बाजीरावास ज्यास्त भर दिली, व अशा युक्तीनें आपणावरचा त्याचा राग नाहींसा करून टाकला. त्या दोघांचा पुढें तह झाला त्यांत असें

ठरलें कीं, "निजामानें आपल्या मुलखांत स्वस्थपणें राहावें, मराठ्यांच्या कारभारांत कोणत्याही तऱ्हेनें ढवळाढवळ करूं नये, व बाजीरावानें दक्षिणेंत स्वतंत्र रीतीनें अंमल करावा." हा ठराव झाल्यावर बाजीरावानें चिमणाजी आपाबरोबर मोठी फौज देऊन त्याला माळव्यांत पाठवून दिलें, व आपण कांहीं दिवस सातारा व पुणें एथें आलटून-पालटून राहून राज्याच्या अंतस्थ स्थितीची व्यवस्था करीत बसला.

पूर्वी त्रिंबकराव दाभाडे होता त्या वेळीं तळेगांव (दाभाड्याचें) एथें ब्राह्मणांस दक्षिणा मिळत असे; परंतु त्रिंबकराव मेल्यावर ती दक्षिणा देण्याचें तेथें बंद झालें. तेव्हां बाजीरावानें ती पुण्यास देण्याचें सुरू केलें, व त्याकरतां पर्वतीनजीक[1] मोठी जागा तयार केली. पुण्यास ही दक्षिणा शके १६५२ त सुरू झाली.

सन १७३२ त बाजीराव स्वतः माळव्यांत जावयास निघाला, त्या वेळीं त्याची व निजामउल्मुल्काची दुसऱ्यानें भेट झाली. ह्या भेटींत असें ठरलें कीं, "बाजीरावानें माळव्यांत जात येत असतां खानदेश परगण्यास उपद्रव देऊं नये, व दक्षिणेंतील सहा सुभ्यांवरचे मराठ्यांचे हक्क निजामानें बिनतक्रार पेशव्यास द्यावे."

या वेळीं नर्मदेपलीकडील मुलखावर नजर फिरविण्यास बाजीरावास पुष्कळ सबळ कारणें होतीं, तीं अशीं:—बाजीराव गुजराथेंतून सन १७२९ त परत गेल्यानंतर दिल्लीच्या बादशाहानें मराठ्यांस गुजराथची चौथाई देण्याचा करार मंजूर करण्याचें नाकबूल केलें; सरबुलंदखानास परत बोलावून त्याचा मोठा अपमान केला, व जोधपूरचा राजा अभयसिंग यास गुजराथच्या सुभ्यावर पाठवून दिलें. तो मोठा वाईट चालीचा व दुष्ट मनुष्य होता; कारण त्यानें आपल्या बापास ठार मारून गादी बळकाविली होती. परंतु मराठ्यांना दाबांत

१ प्रथम दक्षिणेचा समारंभ कबूतरखान्यांत होत असे असेंही अन्यत्र लिहिलेलें आढळतें. पुणें एथें ब्राह्मणांस हल्लीं अंशतः जी दक्षिणा मिळते व जिचा बहुतेक अंश दक्षिणा-प्राईज-कमिटी व दक्षिणा-फेलोशिप्स यांजकडे लागलेला आहे, तिची ही मूळपीठिका होय.

ठेवण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगांत नव्हतें. त्यानें पिलाजी गायकवाडाचा पराभव करून त्यास बडोद्यांतून हांकून दिलें, व पुढें मारेकरी घालून त्यास ठार मारलें. अशा कृत्यानें मराठे बलहीन होतील व त्यांच्यावर आपला दरारा बसेल असें त्यास वाटलें होतें; परंतु हा त्याचा भ्रम लवकरच नाहींसा झाला. ह्या भयंकर कृत्यामुळें मराठ्यांचें बळ कमी न होतां त्यांचा संताप मात्र ज्यास्त वाढला. पिलाजीचा भाऊ व मुलगा यांनीं पहाडांतील कोळी व भिल्ल लोकांस उठवून त्या प्रांतांत बंडावा व धुमाळी उडवून दिली, व अभयसिंगाच्या राज्यावर हल्ला करून थेट जोधपुरच्या जवळ जवळ ते चाल करून गेले. शिवाय मराठे लोकांच्या माळव्यांतील लष्कराचें भयप्रद रूप जेव्हां अभयसिंगानें पाहिलें, तेव्हां त्यास भय वाटून त्याला आपल्या स्वतःच्या मुलखीं जावें लागलें. त्यानें जातांना गुजराथेंत आपला मुतालीक ठेविला होता, परंतु त्याच्यानें मराठ्यांपुढें टिकाव धरवेना.

माळवा प्रांतांत राजा गिरधर ह्मणून जो मोंगलांचा सुभेदार होता तो मराठ्यांशीं लढत असतां सन १७२९ त मरण पावला. त्याच्या मागून त्याचा दायबहाद्दर नांवाचा कोणी आप्त माळव्याच्या सुभेदारीवर आला. त्यानें मराठ्यांशीं बऱ्याच लढाया केल्या व पुष्कळ वेळां त्यांस मागें हटविलें. शेवटीं चिमणाजी आपा हा, पिलाजी जाधव व मल्हारराव होळकर यांस घेऊन माळव्यांत आला, तेव्हां त्याच्याशीं सामना देण्याकरतां दायबहाद्दर मोठ्या तयारीनें उभा राहिला. त्या दोघांचा युद्धप्रसंग धारेजवळ ताला एथें झाला, व त्यांत दायबहाद्दर मारला गेला.

पुढें इ० स० १७३२ त बाजीराव माळव्यांत गेला तेव्हां त्यानें चिमणाजी आपा व पिलाजी जाधव यांस साताऱ्यास पाठवून दिलें; कारण त्या वेळीं कोकणांत जंजिऱ्याचा शिद्दी व पोर्तुगीज लोक ह्यांनीं फार गडबड मांडली होती. त्या वेळीं महंमदखान बंगष नांवाच्या अधिकाऱ्याची माळव्याच्या सुभेदारीवर नेमणूक झाली होती. अलाहाबादचा सुभाही ह्याच अधिकाऱ्याकडे होता. ह्या दोन

प्रांतांच्या मध्यें बुंदेलखंडचें राज्य होतें, व त्या ठिकाणीं छत्रसाल नांवाचा राजा राज्य करीत होता. तो प्रांत जिंकून घ्यावा असें महंमदखान बंगष याच्या मनांत आलें, व त्यानें त्याच्यावर स्वारी केली. त्या वेळीं छत्रसाल राजा अगदीं घाबरून गेला. त्याच्या अंगांत बंगषाचा पराभव करण्यापुरतें सामर्थ्य नव्हतें; तेव्हां आज हिंदुस्थानांत हिंदूंचा वाली एक बाजीराव आहे त्यास आपलें रक्षण करण्याविषयीं विनंति करावी असें मनांत आणून त्यानें त्याला एक पत्र लिहिलें. ह्या पत्रांत एकंदर शंभर दोहरे होते असें ह्मणतात. परंतु त्यांपैकीं सद्ध्या एक दोहरा उपलब्ध आहे, तो एणेंप्रमाणें:—

जो गति ग्राहगजेंदरकी, सो गत भयी है आज ।
बाजी जात बुंदेलनकी, राखो बाजी लाज ॥

बाजीरावाच्या हातीं तें पत्र पडतांच त्यानें एकदम आपला मोर्चा बुंदेलखंडावर फिरविला, व एकाएकीं महंमदखानावर हल्ला करून थोडक्याच वेळांत त्याला 'दे माय धरणी ठाय' करायाला लाविलें. तो मोठ्या कष्टानें एका किल्ल्याच्या आश्रयास जाऊन राहिला, व त्यानें दिल्लीहून कुमक मागितली; परंतु दिल्लीच्या दरबारीं त्या वेळीं इतकी अंदाधुंदी होती कीं, त्याच्या विनंतिपत्राकडे कोणीं ढुंकून सुद्धां पाहिलें नाहीं! पुढें त्याच्या जातीचे लोक त्याला सोडविण्याचा प्रयत्न न करते तर त्याला मुठींत नाक धरून बाजीरावास शरण जाणें भाग पडलें असतें. असें सांगतात कीं, त्याच्या बायकोनें त्या वेळीं, रोहिलखंडांतील आपल्या सजातीय लोकांस आपल्या तोंडावरचा पदर पाठवून दिला, आणि सुचविलें कीं, माझी लाज राखण्याची ही वेळ आहे. अफगाण लोकांचें सत्व जागृत करण्यास याहून दुसरें काय पाहिजे? शेवटीं त्याच्या मुलानें पुष्कळ रोहिले लोक बरोबर घेऊन परम सायासानें आपल्या पित्याची सुटका केली.

छत्रसाल राजानें बाजीरावाचे फार आभार मानले, व आपल्या दोन मुलांप्रमाणें तो बाजीरावाला आपला तिसरा मुलगा असें ह्मणूं लागला. ह्या कामगिरीबद्दल त्यानें बाजीरावास यमुनेवरील झांशीचा

किल्ला व त्याच्या आसपासचा बराच प्रांत दिला. ह्या प्रांताचें उत्पन्न सालीना सुमारें दोन सव्वा दोन लाखपर्यंत होतें. हें वर्तमान सन १७३३ त घडलें. पुढें छत्रसाल राजा मरण पावला त्या वेळीं त्यानें आपल्या राज्याचे सारखे तीन विभाग केले, व त्यांपैकीं दोन आपल्या मुलांस देऊन तिसरा बाजीरावास दिला.

पुढें महंमदखान बंगपही मृत्यु पावला व जयपूरचा राजा जयसिंग[१] याची माळव्याच्या सुभेदारीवर नेमणूक झाली. त्याचा व बाजीरावाचा पूर्वीपासून फार स्नेह होता, यामुळें त्याची माळव्यावर नेमणूक झाली तेव्हां मराठ्यांस फार हर्ष झाला. परंतु कसा झाला तरी तो त्या वेळीं बादशाहाचा हस्तक होता, यामुळें बाजीरावाच्या सर्व मागण्या त्याच्यानें कबूल करवेनात. मराठे लोकांचा व त्याचा वंशपरंपरेचा संबंध होता तरी त्यानें मोंगलांचा विश्वासघात केला नाहीं. परंतु शेवटीं मराठ्यांशीं लढाई करून त्यांस हटविणें ही गोष्ट फार कठिण आहे असें पाहून व बादशाहाचा आंतून सल्ला घेऊन सन १७३४ त त्यानें माळवा प्रांत पेशव्याच्या हवालीं केला, व पेशव्यानें बादशाहाच्या वतीनें त्या प्रांताचा कारभार पहावा असें ठरविलें. बाजीरावास ही देणगी दिली म्हणजे तो स्वस्थ बसेल असें मोंगलांस वाटत होतें; परंतु ह्या त्यांच्या समजावरून इतकेंच दिसून येतें कीं, बाजीरावाविषयीं त्यांना चांगलीशी माहिती नव्हती. वरील देणगी मिळाल्यानंतर कांहीं वेळ बाजीराव स्वस्थ बसला हें खरें, तथापि माळवा व गुजराथ ह्या प्रांतांची चौथाई व सरदेशमुखी यांच्या लेखी सनदा आपणास मि-

---

१ ह्यास सवाई जयसिंग म्हणत. ह्यानें इ० स० १६९९–१७४३ पर्यंत राज्य केलें. त्याची व बाळाजी विश्वनाथाची दिल्लीस भेट झाली तेव्हां बाजीरावाचीही त्याच्याशीं ओळख झाली होती. पुढें बाजीरावाचा व जयसिंगाचा पत्रव्यवहार नेहमीं सुरू असे. हा जयसिंग मोठा ज्योतिषी असून साधारण सर्व विद्यांचा भोक्ता होता. ज्योतिषशास्त्रसंबंधी त्याचे ग्रंथ व कोष्टकें अद्यापि सर्वमान्य आहेत. तो आपणाविषयीं नेहमीं तृतीय पुरुषीं लिहीत असे. त्यानें अश्वमेध यज्ञ केला होता. —कर्नल टॉड.

ळाव्या असें बोलणें त्यानें पुढें चालविलें. नंतर सन १७३९त तो सातान्यास शाहू महाराजांच्या भेटीस येण्याकरितां निघाला, त्या वेळीं त्यानें आपल्यामागें जे सरदार ठेविले होते त्यांस आग्र्यापर्यंत हल्ले करण्याची आज्ञा केली [1]होती.

पेशवा माळव्यांत असतां सेनासाहेब सुभे कान्होजी भोंसले यानें शाहू महाराजांची कांहीं अवज्ञा केली त्यावरून महाराजांची त्याच्यावर इतराजी झाली, व त्यांनीं त्याला सातान्यास कैद करून ठेविलें. पुढें महाराजांनीं त्याचा अधिकार रघूजी भोंसले[2] यास दिला. हा रघूजी शाहू महाराजांबरोबर नेहमीं शिकारीस जात असे, व पारधीच्या वेळीं एकदा त्यानें वाघास मारून महाराजांचा प्राण वांचविला होता यामुळें त्याच्यावर त्यांची विशेष भक्ति असे. तसेंच महाराजांनीं आपल्या मेहुणीशीं त्याचें लग्न करून दिलें होतें. त्यावरून त्यास महाराजांनीं कान्होजीच्या मागें त्याच्या अधिकारावर नेमिलें. ज्या वेळीं वऱ्हाडच्या सुभेदारीची सनद रघूजीस दिली, त्या वेळीं महाराजांनीं त्याच्याकडून असा लेखी करार करून घेतला कीं, "रघूजीनें ५००० स्वारांनिशीं नेहमीं गादीची सेवा करावी; ९ लाख रुपये सालीना सरकारी पोत्यास पाठवावे, तसेंच घांसदाणा[3] शिवाय करून बक्षीस आदिकरून जो पैसा त्यास मिळेल त्यापैकीं निमे रकम सरकारांत पाठवून द्यावी, व पेशवा कधीं कोणत्याही मोहिमेवर निघाला तर त्यानें १०००० स्वार त्याच्या मदतीस द्यावे." कान्होजीस कैदेंत टाकलें त्या वेळीं श्रीपतराव प्रतिनिधि कोंकणांत होता. त्याचा व कान्होजीचा अत्यंत स्नेह असल्यामुळें कोंकणांतून परत आल्यावर त्यानें कान्होजीची शिक्षा माफ करण्याविषयीं महाराजांज-

---

१ एल्फिन्स्टन. २ परसोजी, बापूजी व साबाजी हे बंधु. परसोजीचा कान्होजी, बापूजीचा बिंबाजी, व बिंबाजीचा मुलगा रघूजी. कान्होजीस प्रथमतः पुत्र नसल्यामुळें त्याची रघूजीवर फार प्रीति होती. परंतु कान्होजीस पुत्र झाल्यावर रघूजी सातान्यास आला.—नागपूरकर भोंसले यांचे कागदपत्र, लेख १. ३ हा एक चौथाई व सरदेशमुखीप्रमाणें कर होता.

वळ पुष्कळ रदबदली केली; परंतु तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं, व कान्होजीस मरेपर्यंत साताऱ्यास कैदेंत रहावें लागलें. कान्होजी भोंसले मोठा शूर व धाडशी पुरुष होता.

बाजीराव माळव्यांत सन १७३२ त गेला तेव्हां कोंकणांत बरीच गडबड झाली होती, त्या संबंधाचा इतिहास देणें अवश्य आहे.

ह्या सुमारास[1] कान्होजी आंग्रे सातारा एथें मृत्यु पावला. तो जिवंत होता तोंपर्यंत त्यानें आपल्या पराक्रमानें आपल्या शत्रूंचें कांहीं चालूं दिलें नाहीं. तो वर्णानें काळा असून अंगानें स्थूळ होता, तरी त्याचा बांधा सुदृढ होता. त्याची मुद्रा भव्य व भीतिदायक होती. त्याचे डोळे पाणीदार होते. त्याचे हुकूम नेहमीं सक्तीचे असत व त्याची शिक्षा करण्याची रीति मोठी कडक असे. तो मोठा शूर होता व आपल्या सरदार व शिपाई लोकांस फार ममतेनें वागवीत असे.

त्याला सखोजी व संभाजी असे दोन औरस पुत्र होते, व तुळाजी, मानाजी, धोंडजी व येसाजी असे चार दासीपुत्र होते. कान्होजीच्या मागें सखोजी हा कुलाब्याकडील प्रांताचा अधिकार पाहूं लागला, व संभाजी हा सुवर्णदुर्ग एथें राहून तिकडील प्रांताचा अधिकार चालवूं लागला. सन १७३१ त चिमणाजी आपानें सखोजीच्या मदतीनें जंजिऱ्यावर स्वारी केली, परंतु त्या कामांत त्याला यश आलें नाहीं. कारण त्या वेळीं गाजीखान नांवाचा एक मोंगलांचा सरदार चौल एथें राहत असे त्यानें कुलाब्यावर हल्ला करून सखोजीचा बराच मुलूख हैराण करून टाकला. त्यामुळें चिमणाजी

---

१ कान्होजी अमुकच वर्षीं वारला असें निश्चयानें सांगतां येत नाहीं. ग्रांटडफमध्यें तो इ० स० १७:.८ त वारला असें दिलें आहे. लो व ग्रोस यांनीं तो इ० स० १७३१ त वारला असें लिहिलें आहे. परंतु वाडीचा फोंड सावंत व इंग्लिश यांच्यामध्यें सन १७३० त जो तह झाला त्यांत कान्होजीच्या नांवाचा उल्लेख केलेला आहे त्यावरून लो व ग्रोस साहेबांच्या लिहिण्यास ज्यास्त बळकटी येते.–क्यांबेल.

आपा व सखोजी यांनीं जंजिरा घेण्याचा बेत रहित करून आपला मोर्चा गाजीखानावर फिरविला. त्यांनीं खानाचा पराभव करून त्यास कैद केलें व त्याचा उत्तरचौल एथील राजकोट नांवाचा किल्ला पाडून टाकला. हें वर्तमान सन १७३२ त घडलें.

पुढें लौकरच ह्मणजे सन १७३३ त सखोजी आंग्रे मरण पावला व सर्व सत्ता एकट्या संभाजीच्या हातांत आली. तेव्हां संभाजीनें आपल्या सापत्न बंधूंपैकीं सर्वांत वडील तुळाजी यास आपणाजवळ ठेवून घेतलें व मानाजी व येसाजी यांस कुलाब्याचा बंदोबस्त करण्याकरतां रवाना केलें. मानाजीस आरमार व फौज यांची व्यवस्था सांगितली व येसाजीस त्या प्रांताच्या आंतील बंदोबस्ताचें काम सांगितलें. पुढें कांहीं कारणामुळें मानाजी हा संभाजी व येसाजी यांच्या बरोबर भांडला. प्रथमतः त्याचें त्या दोघांपुढें कांहीं चालेना; तेव्हां तो रेवदंड्यास पळून जाऊन पोर्तुगीज लोकांच्या आश्रयास राहिला. पुढें थोडक्याच दिवसांनीं त्यानें पोर्तुगीज लोकांच्या मदतीनें कुलाब्याच्या किल्ल्यावर हल्ला करून तो घेतला. नंतर त्यानें बाजीरावाजवळ मदत मागितली व त्याच्या साह्यानें येसाजीचा पराभव करून त्यास कैद केलें. पुढें मानाजीनें येसाजीचे डोळे काढले व प्रथमतः पोयनाड एथें व मागाहून अलीबाग एथें त्यास कैदेंत ठेविलें. परंतु तो तेथून पळून पेशव्याकडे दाद मागण्याकरतां गेला. तेव्हां "तुझा कुलाब्यावर हक्क पोहोंचत नाहीं" असें त्यास सांगून व "यापुढें मी राज्यसंबंधी कोणतीही खटपट न करतां स्वस्थ बसेन" असा त्याच्याकडून करार करून घेऊन पेशव्यानें मानाजीकडून त्याला दरमहा १० खंडी भात व ४०० रुपये देण्याचा ठराव करून घेतला, व त्याला रेवदंडा एथें ठेविलें.

या वेळीं जंजिरा एथें शिद्दी याकूत याचें फार प्रस्थ वाढलें होतें. मोंगलांनीं महाड, रायगड, दाभोळ, अंजनवेल वगैरे परगणे त्याच्या ताब्यांत दिले होते. त्याला हटविण्याचा मराठ्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला, परंतु त्यानें मराठ्यांस मुळींच दाद दिली नाहीं; इतकेंच नव्हे, तर तो

वारंवार मराठ्यांचे मुलखावर स्वाऱ्या करून त्यांतून खंडणी घेऊन जात असे. पुढें त्याच्याशीं लढाई करून त्याला पादाक्रांत करणें फार कठिण आहे असें वाटल्यावरून त्याचा कपटानें नाश केला पाहिजे अशी मसलत **श्री**पतराव प्रतिनिधि, **जि**वाजी **खं**डेराव **चि**टणीस वगैरे मंडळीनें **शाहू महा**राजांस दिली. त्या वेळीं **शि**द्दीजवळ **शे**ख **या**कुबखान[1] ह्मणून एक मोठा शूर सरदार होता. **प्र**तिनिधीनें त्याला वश करून घेतलें व त्याच्याशीं एक गुप्त तह केला. त्या तहांत असें ठरलें कीं, "**या**कूबखानास मराठ्यांनीं आरमाराचा अधिपति नेमावें, **शि**द्दीच्या मुलखापैकीं कांहीं किल्ले शिवाय करून बाकीचा सर्व प्रांत व कांहीं गांव त्यास इनाम द्यावे, तसेंच **पे**णच्या खाडीपासून **को**ल्हापुरच्या सरहद्दीपर्यंत सर्व **द**क्षिण**कों**कणाचा सेरगौडा[2] त्यास मिळावा, त्याच्या भावाला **रा**यगडचा दुय्यम अधिकारी नेमावें, व त्याच्या शिपाई लोकांस जय मिळाल्यास एक लाख रुपये बक्षीस द्यावे."

हा तह ठरल्यानंतर **शाहू महा**राजांनीं **या**कुबखानाच्या मदतीस **श्री**पतराव **प्र**तिनिधि, **य**माजी **शि**वदेव व **उ**दाजी चव्हाण यांच्या हाताखालीं एक मोठें सैन्य देऊन त्यांस इ० स० १७३३ त **कों**कणांत पाठवून दिलें. परंतु ह्या कामांत मराठ्यांना यश आलें नाहीं. **शि**द्दीपुढें **प्र**तिनिधीच्यानें टिकाव धरवेना. ह्या लढाईपासून मराठ्यांस कांडीचाही फायदा न होतां गोरगरीब लोकांचा मात्र फार नाश झाला. **प्र**तिनिधीला **शि**द्दीनें आपल्या राज्यांतून पिटाळून लाविलें. तो मोठ्या कष्टानें **गा**इलकोट ( **चि**पळूण ) च्या किल्ल्यांत येऊन पोहोंचला. परंतु ह्या ठिकाणींही **शि**द्दीनें त्याच्यावर हल्ला करून तो किल्ला घेतला व त्याची पुरी दुर्दशा करून टाकली. त्यानें मदत पाठविण्याविषयीं **सा**ताऱ्यास

---

१ हा मूळचा कोळी होता व ह्याचे पूर्वज **गु**हागरचे पाटील होते. हा लहान असतांना **शि**द्दीच्या हातीं सांपडला. तेव्हां **शि**द्दीनें त्याला मुसलमानी धर्माची दिक्षा दिली.—**ग्रां**टडफ.

२ सरगौडा हा नाडगौड्याप्रमाणेंच एक हक्क आहे. नाडगौडा म्हणजे शेंकडा ३ टक्के व सरगौडा ह्मणजे शेंकडा २ टक्के, एवढाच काय तो फरक.

बहुत वेळां लिहिलें. तेव्हां शाहू महाराजांनीं चिमणाजी आपास तिकडे जाण्यास आज्ञा केली; परंतु प्रतिनिधीची चांगली खोड मोडावी असें आपाच्या मनांत होतें, यामुळें तो त्याच्या मदतीस गेला नाहीं. महाराजांस ह्या गोष्टीमुळें फार राग आला व त्यांनीं, "तुह्मी गेलां नाहीं तर मला जाणें जरूर आहे" असें आपास बोलून दाखविलें. शेवटीं आपानें पिलाजी जाधव यास प्रतिनिधीच्या मदतीस पाठवून दिलें. त्याशिवाय सातान्यांतील दुसरा कोणीही सरदार त्याच्या मदतीस जाण्यास कबूल नव्हता. पिलाजीला मदतीस पाठविलें होतें, परंतु त्याचा प्रतिनिधीला कांहीं उपयोग झाला नाहीं व त्याची मोठी फजीती होऊन त्याला सातान्यास परत यावें लागलें.

ह्याच सुमारास ह्मणजे सन १७३४ त शिद्दी याकूत मरण पावला. त्याला एकंदर सहा मुलगे होते. याकूत वारला त्या वेळीं त्याचा थोरला मुलगा शिद्दी अवदल्ला हा जंजिन्यास राहिला व दुसरा मुलगा शिद्दी रहमान आपल्या पित्याच्या शवाचें (दफन मूठमातीचा विधि) करण्याकरतां राजपुरीस आला. त्या वेळीं बाकी राहिलेल्या चार भावांनीं ह्मणजे शिद्दी सबुदुल, शिद्दी अंबर, शिद्दी रह्यान व शिद्दी याकूत यांनीं आपसांत विचार करून अवदल्लास ठार मारलें, व जंजिन्याचे दरवाजे लावून ते बसले. या गोष्टीमुळें शिद्दी रहमान याला राजपुरींतच रहावें लागलें. याकुबखानाच्या पथ्यावर ही गोष्ट फार चांगली पडली. त्यानें लगेच शिद्दी रहमान याचा पक्ष उचलला, व पूर्वी सन १७३२ त त्यानें मराठ्यांशीं केलेल्या तहाप्रमाणें शाहू महाराजांपाशीं मदत मागितली. ह्या वेळीं बाजीराव माळव्यांत होता, त्याला महाराजांनीं या एकंदर हकीकतीचें पत्र पाठविलें. पत्र

---

१ जंजिरा एथील कागदपत्रांवरून असें दिसून येतें कीं, याकूत याचा शिद्दी संबळ म्हणून कोणी गुलाम होता. त्यानें अबदुल्ला यास मारून गादी बळकाविली. त्यानें २ वर्षें ह्मणजे सन १७३६ पर्यंत राज्य केलें. पुढें शिद्दी सलाम, शिद्दी फरज व शिद्दी सय्यद या तीन गुलामांनीं त्यास ठार करून शिद्दी रहमान यास गादीवर बसविलें.

हातीं पडतांच बाजीरावानें शिंदे व होळकर यांस माळव्याच्या बंदोबस्ताकरतां तिकडेच ठेविलें व आपण आपल्या फौजेनिशीं दक्षिणेंत यावयास निघाला. गोदावरी उतरून अलीकडे आल्यावर त्यानें " महाराजांचे आज्ञेप्रमाणें मी परभारें दंडाराजपुरीकडे गेलों " असें साताऱ्यास पत्र पाठविलें. तेव्हां महाराजांनीं आपली खाजगी फौज पेशव्याचे मदतीस कोंकणांत पाठवून दिली, व माळव्यांत शिंदे व होळकर यांच्या मदतीस हुजूर पागेपैकीं कांहीं स्वार देऊन पिलाजी जाधव यास पाठवून दिलें. बाजीराव कोंकणांत शिरतांच शिद्दी रहमान व याकुबखान हे त्यास येऊन मिळाले. त्याचप्रमाणें प्रतिनिधि व फत्तेसिंग भोंसले हेही त्याच्या मदतीस आले. त्यानें प्रथमतः तळें व घोंसाळें हे किल्ले सर केले. प्रतिनिधीनें रायगडचा किल्ला घेतला. या किल्ल्याच्या किल्लेदारास याकुबखानानें अगोदरच वश करून घेतलें होतें यामुळें किल्ला हस्तगत करण्यास प्रतिनिधीस मुळींच श्रम पडले नाहींत. शिद्दी रहमानचा भाऊ शिद्दी रह्यान हा एक मोठी टोळी घेऊन बाजीरावावर चालून आला. त्या दोघांची चांगलीच चकमक झडली. रह्यान गोळी लागून ठार झाला व बाजीरावानें त्याच्या सैन्याचा दंडाराजपुरीपर्यंत पाठलाग करून फडशा करून टाकला. नंतर त्यानें खुष्कीचे वाजूनें जंजिऱ्यास वेढा दिला व समुद्राचे वाजूनें मानाजी आंग्र्यानें तें काम पुरें केलें. परंतु त्या वेळीं तो किल्ला मराठ्यांचे हातीं आला नाहीं. पुढें किल्ला घेण्याचे नादास आपण लागलों तर त्याला बराच काळ लागून आपलीं उत्तरहिंदुस्थानांतील मोठमोठीं कामें तशींच शिलक राहतील असें बाजीरावास वाटल्यावरून, शिद्दीनें तह करण्याविषयीं बोलणें लाविलें होतें तें त्यानें मान्य करून त्याच्याशीं तह[1] केला.

---

१ हा तह कधीं झाला तें निश्चयानें सांगतां येत नाहीं. ग्रांटडफ सन १७३५ त हा तह झाला असें ह्मणतो. जरविसनें केलेल्या कोंकणच्या इतिहासांत एके ठिकाणीं १७३२ व एके ठिकाणीं १७३६ हे सन दिले आहेत; व पुणें येथील कागदपत्रांत १७३६ हा सन दिला आहे.

त्यांत असें ठरलें कीं, " जंजिऱ्याचें प्रमुखत्व शिद्दी रहमान याजकडे असावें, त्यानें मराठ्यांस ११ महालांचें अर्धें उत्पन्न द्यावें, व रायगड, तळें, घोंसाळें, अवचितगड व बिरवाडी हे किल्ले द्यावे." याप्रमाणें या युद्धाचा शेवट होऊन तो विजयी बाजीराव साताऱ्यास महाराजांचे भेटीस आला. महाराजांनीं त्याचा मोठा सन्मान करून नवीन संपादन केलेल्या रायगड वगैरे प्रांतांचा अधिकार त्यालाच सांगितला.

बाजीरावानें अतिशय सैन्य ठेविल्यामुळें त्याला फार कर्ज झालें होतें. तो दक्षिणेंत आला त्या वेळीं शिंदे, होळकर वगैरे आपल्या सरदारांस मोंगलांचा मुल्ख लुटून पैसा पाठविण्याचें काम त्यानें सांगितलें होतें. त्याच्या आज्ञेप्रमाणें मल्हारराव होळकर स्वाऱ्या करीत करीत आग्र्याचेही पलीकडे गेला होता, व जी लूट मिळे ती बाजीरावाकडे पाठवून देत होता. ह्या वेळीं दिल्लीच्या दरबारीं खानडौरान हा वजिरीच्या कामावर होता. त्यानें होळकराशीं तहाचें बोलणें लाविलें; परंतु बाजीरावाच्या आज्ञेशिवाय त्याला तह करतां येईना. तेव्हां खानडौरान यानें आपला भाऊ मुझफरखान याजबरोबर फौज देऊन त्याला होळकरावर पाठवून दिलें. त्यानें प्रथमतः मोठा आव घातला, व मराठ्यांना नर्मदेच्या पार हांकून देण्याच्या निश्चयानें तो चाल करून गेला. होळकर दिवसास त्याच्यावर आपले थोडकेसे लोक पाठवी. ते लोक थोडेसे लढून पळून जात, व रात्रीस त्याच्या लष्करावर बाणांचा वर्षाव करून त्याची नासधूस करीत. शिवाय होळकरानें प्रांतांत जिकडे तिकडे लुटालूट करून तो पैसा बाजीरावाकडे पाठविण्याचा सपाटा चालविलाच होता. मुझफरखान सिरोंजपर्यंत जाऊन मागें फिरला. तो दिल्लीस परत आला त्या वेळीं बादशाहानें त्याचें मोठें आगतस्वागत केलें, व त्यानें मोठा दिग्विजय केला अशी त्याची लोक तारीफ करूं लागले.

माळव्यांत व चंबळा नदीचे दक्षिणेस मोंगलांचे कांहीं किल्ले होते. परंतु मराठ्यांपुढें त्या किल्लेदारांचें कांहीं चालेना. मरा-

ठ्यांनीं तो प्रांत अगदीं उजाड करून टाकला. रोहिले लोकही ह्या वेळेच्या सुमारास त्या प्रांतावर हल्ला करूं लागले. वरील प्रांतापैकीं बराच भाग मराठे व रोहिले यांनीं आपल्या ताब्यांत आणला. एक वर्षापूर्वींच कंठाजी कदम बांडे यास, दमाजी गायकवाडाची सत्ता गुजराथेंत वाढत गेल्यामुळें गुजराथेंतून निघून जावें लागलें होतें. त्यानें मल्हाररावास गुजराथेवर स्वारी करण्यास बोलाविलें. त्या दोघांनीं मिळून अकस्मात् गुजराथेवर स्वारी केली व बुनासपर्यंतच्या प्रांतांतून खंडणीदाखल पैसा काढला, आणि अहमदाबादच्या उत्तरेकडील पालनपूर वगैरे शहरें लुटून ते मोठ्या त्वरेनें परत निघून गेले.

बाजीरावानें फौजफांटा अतिशय ठेविल्यामुळें त्याला मनस्वी कर्ज झालें होतें हें मागें सांगितलेंच आहे. शिंदे, होळकर हे जो लुटीचा पैसा त्याच्याकडे पाठवीत तो कोठच्याकोठेंच उडून जात असे. सावकार लोकांनीं पुढें आपला हात आंखडून धरला. शिपायांचा रोजमुरा थकला यामुळें त्यांनीं बराच गोंधळ केला. या एकंदर गोष्टींमुळें त्रासून त्यानें उदासीनतेनें धावडशीच्या स्वामींस[१] एक पत्र लिहिलें. त्याचा सारांश एणेंप्रमाणें:—"हल्लीं मी बहुतांचा देणेदार होऊन माझी कुतरओढ झाली आहे, ही मला नरकयातनाशी वाटते, व सावकार व शिलेदार यांची पायधरणी करतां करतां माझ्या कपाळाचें कातडें गेलें." यावर स्वामींकडून त्यास उत्तर आलें कीं, "असें खिन्नवदन आणि अधीर होऊन बसणें हें तुमच्यासारख्या उद्योगप्रिय पुरुषास शोभत नाहीं. तुह्मी माळवा प्रांत आधीं हस्तगत करण्याच्या उद्योगास लागा, आणि मग दिल्लीवर रोंख धरा, ह्मणजे एका कामांत दोन कामें साधतील. द्रव्याची अडचण दूर होऊन म्लेंच्छांचेंही पारिपत्य होईल." अशा प्रकारचें हें उत्तेजनदायक पत्र स्वामींकडून येऊन पोहोंचतांच बाजीराव त्याच कामाला पुढें सरसावला. त्यानें माळ्यावर आपले चौथाई व सरदेशमुखी हे हक्क बसविले, व

१ हे स्वामी बाजीरावाचे गुरु होते, व सर्व पेशवे ह्या स्वामींना फार मान देत असत व संकटसमयीं त्यांच्याच सल्ल्यानें चालत असत.

जयसिंगाच्या मध्यस्थीनें तो प्रांत आपले हस्तगत करून घ्यावा ह्मणून बादशाहाकडे मागणें केलें, आणि त्याच वेळीं सरबुलंदखानानें गुजराथची सरदेशमुखी देऊं केली होती तीही मागितली. महंमदशाहा बादशाहा व वजीर खानडौरान यांच्या मनांतून वरील हक्क बाजीरावास देण्याचें होतें. परंतु बादशाहाच्या पदरचे तुराणी सरदार ती गोष्ट कबूल करीनात. पुढें वजीर खानडौरान व बाजीराव यांच्यामध्यें जीं बोलणींचालणीं झालीं त्यांत दोघांचाही मूळचा पाया सुटला. त्याचा प्रकार असाः—"बादशाहानें चंबळानदीच्या दक्षिणेकडील मुलखाच्या वसुलपैकीं सालीना १३ लाख रुपये तीन हप्त्यांनीं पेशव्यास द्यावे, तसेंच पश्चिमेस बुंदी व कोटा ह्या संस्थानांपासून तों पूर्वेस बुधावर संस्थानापर्यंतच्या सर्व रजपूत संस्थानांपासून सालीना दहा लक्ष साठ हजार रुपये खंडणी घेण्याचा त्यानें बाजीरावास अधिकार द्यावा."[१] असें ठरवून राजा जयसिंग याच्या मध्यस्थीनें खानडौरान यानें आपला यादगारखान वकील बाजीरावाकडे पाठविला. त्याच्याजवळ त्यानें चौथाई व सरदेशमुखी या हक्कांच्याही सनदा गुप्तपणें दिल्या होत्या, व प्रसंग पाहून सनदा देणें जरूर आहे असें वाटल्यास त्या बाजीरावाच्या हवालीं कराव्या असें त्यास सांगून ठेविलें होतें. परंतु दिल्लीच्या दरबारीं पेशव्याचा धोंडोपंत पुरंदरे हा वकील होताच, त्यानें ही इत्थंभूत हकीकत पेशव्यास कळविली. तेव्हां हें वजिराचें कपट बाजीरावाला समजतांच त्यानें आपलीं पूर्वींचीं सर्व मागणीं फिरविलीं, व पहिल्यापेक्षां त्याची हांव अतिशयच वाढली. बाजीरावानें पाठीमागून जीं मागणीं मागितलीं त्यांचा तपशीलः—

१ सर्व माळवाप्रांत जहागिरीदाखल द्यावा.

२ त्या प्रांतांत रोहिले लोकांच्या हातीं जो मुलूख आहे तो त्यांजपासून घेण्याचा अधिकार द्यावा.

---

१ वरील अधिकार बाजीरावास देण्यांत खानडौरान याचा हेतु, रजपूत व मराठे यांचा आपसांत कलह लावून देण्याचा असावा असें दिसतें.

३ मांडू, धार व राशीन हे किल्ले स्वाधीन करावे.

४ चंवळानदीचे दक्षिणेकडील सर्व मुलखाची जहागीर व फौजदारीचा हक्क द्यावा.

५ बादशाही खजिन्यांतून रोख ५० लाख रुपये द्यावे किंवा त्यांबद्दल बंगाल्यांत कांहीं मुलूख द्यावा.

६ अलाहाबाद, काशी, गया व मथुरा हीं शहरें मराठ्यांचे ताब्यांत द्यावीं.

७ दक्षिणच्या सहा सुभ्यांची सरदेशपांडेपणाची[1] सनद द्यावी.

वर सांगितलेल्या एकंदर कलमांपैकीं बादशाहानें शेवटचें कलम काय तें कबूल केलें, व बाजीरावापासून त्याबद्दल ६ लाख रुपये घेण्याचें ठरवून तो हक्क बाजीरावास दिला. हा जो बाजीरावास हक्क मिळाला, तो तरी निजामउल्मुल्क व खानडौरान यांचें आपसांत वांकडें होतें ह्मणून निजामउल्मुल्काची मानहानि करण्याकरतां खानडौरान यानें बादशाहाकडून त्यास देवविला. परंतु तें कृत्य मोंगलांच्या चांगलें पथ्यावर पडलें. मराठ्यांस वर सांगितलेला हक्क मिळाल्यामुळें निजामउल्मुल्काचा मराठ्यांविषयींचा द्वेष दुणावला. त्याच वेळीं दिल्लीच्या बादशाहानेंही त्याच्याशीं आपल्या मदतीस येण्याकरितां मोठ्या गौरवानें बोलणें चालविलें, व पूर्वीप्रमाणें तो बंडखोर आहे अशी त्याजवर दृष्टि न ठेवतां, संकटसमयीं आपणास मुक्त करणारा एक आपला जुना मित्र आहे अशा रीतीनें त्यास तो मानूं लागला.

वर सांगितलेल्या गोष्टीमुळें असा परिणाम झाला कीं, निजाम फुगून जाऊन बादशाहाच्या मदतीस बरोबर सैन्य घेऊन तावडतोब दक्षिणेंतून निघाला. बाजीरावास, आपल्या बाकीच्या मागण्यांच्या संबंधानें बादशाहा कांहींच व्यवस्था करीत नाहीं असें पाहून राग आला, व त्यानें दिल्लीवर स्वारी करण्याचा निश्चय केला. बादशाहानें

---

१ सरदेशमुखीप्रमाणेंच हा हक्क होता. परंतु ह्यांत वसुलावर शेंकडा ५ टक्के घ्यावे असें होतें.

बाजीरावास भय दाखवावें ह्मणून दिल्लीच्या आसपासच्या मैदानांतून मोठमोठे तंबू ठोकले व जिकडे तिकडे आपलें सैन्य पसरून लढाईचा मोठाच आव घातला.

दिल्लीकडे मोठी धामधूम चालली आहे असें ऐकून बाजीरावानें आपलें अवजड सामान बुंदेलखंडचा राजा जगदेव याजपाशीं ठेवून व हलकें सामान होतें तें बरोबर घेऊन तो दिल्लीकडे यावयास निघाला. तो आग्र्यापासून वीस कोशांवर आला तेव्हां कांहीं लष्कर बरोबर घेऊन मल्हारराव होळकर, पिलाजी जाधव, विठोजी बुळे वगैरे बाजीरावाचे सरदार यमुनेच्या पलीकडील प्रांतांत लुटालूट करूं लागले. त्या वेळीं मोंगलांचे सुभेदार हे आपापले प्रांत धरून बसत असत. परंतु अयोध्येचा सुभेदार सादतखान ह्यानें ती वृत्ति टाकून देऊन एक मोठें लष्कर गोळा केलें, व होळकरावर अकस्मात् हल्ला करून त्याला यमुनेच्या पलीकडे घालवून दिलें. ही जी लहानशी माघार मराठ्यांना आली तिचा त्या डौली सादतखानानें फुगवून मोठा जय मानिला, व बादशाहास खोटेंनाटेंच लिहून पाठविलें कीं, "मल्हारराव होळकरास मोठी भयंकर जखम लागली, विठोजी बुळे लढाईंत ठार झाला, व मराठ्यांस चंबळा नदीच्या पलीकडे घालवून दिलें; आणि त्या गर्दींत २००० मराठ्यांची आह्मीं कत्तल केली व दोन हजार मराठे यमुनेंतून जात असतां बुडून मेले."[1] इकडे बाजीरावानें बुधावरच्या राजावर स्वारी करून त्याच्यापासून खंडणी घेऊन त्याच्या राज्यांत आपले हक्क बसविले. बाजीरावानें आपल्या सैन्याचा ज्या ठिकाणीं तळ दिला होता ती जागा समर करण्यास सोयीची नव्हती, ह्मणून सादतखान आग्र्यास येऊन पोहोंचला असें वर्तमान त्याला कळतांच त्यानें तें ठिकाण सोडलें, व तो ईशान्य दिशेस मोठें मैदान होतें तिकडे वळला. तिकडून दिल्लीहून खानडौरान व मीर कमरुद्दीन हेही बरोबर मोठी फौज घेऊन मथुरेकडे यावयास निघाले. पुढें खानडौरान व महंमदखान बंगष हे आग्रा एथें सादतखानाच्या फौजेस येऊन मिळाल्यावर

१ ग्रांटडफ.

त्याच्या फुसलावणीवरून **खा**नडौरान यानें, **पे**शव्याचा वकील **धों**डो-पंत **पु**रंदरे त्याचे बरोबर होता त्यास लावून दिलें. **सा**दतखानानें बा-दशाहास जें खोटेंनाटें लिहिलें होतें त्याची कच्ची हकीकत **धों**डोपं-तानें **बा**जीरावास कळविली होती. मराठ्यांच्या वकिलास **बा**दशाहानें घालवून दिलें ही मानहानि पाहून **बा**जीरावाची तळपायांची आग मस्तकास गेली. तो ह्मणाला, "कांहीं हरकत नाहीं, ज्या वेळीं **दि**-ल्लीच्या दरवाज्याजवळचीं घरें जाळून टाकीन त्या वेळीं बादशाहास **बा**जीराव अजून दुसरीकडे कोठें गेला नाहीं, **हिं**दुस्थानांतच आहे, याचें प्रत्यंतर येईल!"

**खा**नडौरान **सा**दतखानास येऊन मिळण्याचे पूर्वी ६ दिवस **बा**जीराव मोठ्या झपाट्यानें **दि**ल्लीकडे यावयास निघाला; व आड-वाटेनें फक्त ७ कोशांवर ऊरलास[१] येथें **क**मरुद्दीनखान होता त्याला डावी घालून, **चू**डामण **जा**ट याच्या प्रांताच्या सीमेवरील **मे**वाटच्या डोंगराला वळसा घालून रोज वीस वीस कोशांच्या मजला करीत तो **दि**ल्लीपुढें अकस्मात् येऊन थडकला. त्यानें प्रथमतः शहरांतील कांहीं हत्ती, उंट बाहेर चालले होते ते पकडून नेले, व कांहीं हिंदु लोक देवदर्शनार्थ बाहेर पडले होते त्यांना लुटलें. **बा**जीरावास जरी फार राग आला होता, तरी त्यानें तें शहर जाळलें नाहीं किंवा लुटलें नाहीं. हा शहाणपणा केला. त्याला असें वाटलें कीं, शहरची लूट केली तर आपणास परत जाण्यास फार अडचण पडेल, व घरें जाळून टा-कलीं तर त्यांत आपण बादशाहाचा अपमान केला असें होऊन आ-पला जो हेतु साधायाचा आहे त्याला त्या गोष्टीमुळें मोठें विघ्न ये-ईल. नंतर दुसऱ्या दिवशीं **बा**जीरावानें एक बादशाहास, व एक राजा **ब**ख्तमल्ल यास, अशीं दोन पत्रें लिहिलीं. ह्यांत काय लिहिलें होतें तें कळायाला कांहीं मार्ग नाहीं, तथापि दुसऱ्या दिवशीं बादशाहानें **बा**जीरावास आपला वकील परत पाठवून देण्याविषयीं विनंति केली. **बा**जीरावानें प्रत्युत्तरादाखल बादशाहास असें कळविलें कीं,

---

१ हें कोणतें ठिकाण असावें याचा पत्ता लागत नाहीं.–**ग्रांटडफ**.

"आमच्या वकिलाच्या जिवाची हमी घेतल्याखेरीज आह्मांस वकील पाठवितां येत नाहीं." शिवाय त्यानें आणखीही असें कळविलें कीं, "आमची फौज शहरच्या अगदीं नजीक असल्यामुळें शहराचें वरेंच नुकसान होण्याचा संभव आहे, याकरितां आह्मी आमचा तळ तूर्त झील तलावाकडे हालवितों." ह्या त्याच्या लिहिण्याचा तेथील मूर्ख दरबारी मंडळीनें भलताच अर्थ केला, व बाजीराव आपणांस भिऊन मागें मागें पळतो आहे असा त्यांनीं कुतर्क काढला व लगेच युद्धाची कडेकोट तयारी चालविली. मुझफरखान, मीर हुसेनखान कोका, राजा शिवसिंग व दुसरे सरदार व मानकरी लोक बरोबर ८ हजार फौज घेऊन बाहेर पडले. त्यांची हालचाल कशी काय आहे याचा तपास काढण्याकरितां बाजीरावानें प्रथमतः आपला सरदार सुतोजी जाधव यास पाठवून दिलें; व तें सर्व सैन्य आपणावर हल्ला करण्याकरितां येत आहे असा सुतोजीनें निरोप पाठवितांच, मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे हे एकदम त्याच्यावर चाल करून गेले. त्या झटापटींत मोंगलांकडील ६०० लोक मेले. राजा शिवसिंग धारातीर्थी आपला देह ठेवून निजधामास गेला, मीर हुसेनखान जबर जखम लागून आसन्नमरण होऊन पडला, व मोंगलांचा एक हत्ती व २००० घोडे मराठ्यांनीं धरून नेले. मराठ्यांचे फार थोडे लोक पडले, व जे थोडेसे जखमी झाले त्यांत इंद्राजी कदम हाच काय तो नांव घेण्यासारखा मनुष्य होता.

अशा रीतीनें त्या युद्धाचा शेवट होऊन बाजीरावाचें सैन्य जरा विश्रांति घेत बसलें आहे इतक्यांत, मीर कमरुद्दीनखान कांहीं नव्या दमाचे लोक बरोबर घेऊन आपणावर चाल करून येत आहे असें बाजीरावाच्या दृष्टीस पडलें. त्यानें लगेच त्याच्याशीं लढाई सुरू केली. परंतु काळोख पडत चालल्यामुळें ती लढाई पुढें तहकूब झाली. त्या दंग्यांत पेशव्याचे सुमारें तीस लोक पडले. पुढें खानडौरान व सादतखान हे कमरुद्दिनाच्या मदतीस येत आहेत अशी बातमी पेशव्यास लागल्यामुळें त्यानें रातोरात आपल्या सैन्याचा तळ हालविला,

व उजाडायला पश्चिमेस सुमारें ८ मैल तो निघून गेला. दुसरे दिवशीं सकाळीं वजीर **खा**नडौरान व **सा**दतखान हे **क**मरुद्दिनास येऊन मिळाले. परंतु त्यांनीं **बा**जीरावाचा पाठलाग वगैरे कांहीं केला नाहीं. इकडे **पे**शवा **रे**वारी, **मं**दावर वगैरे आपल्या रस्त्यावरील प्रांत लुटीत लुटीत **ग्वा**ल्हेरीकडे चालला, व पावसाळ्याचे आंत **य**मुना नदी ओलांडून **दु**आब प्रांत लुटण्याचा त्यानें बेत केला. परंतु **मा**ळव्याच्या वसुलाला **नि**जाम कदाचित् अडथळा करील ह्मणून त्यानें **चि**मणाजी आपास पत्र पाठविलें कीं, “ **नि**जामाच्या हालचालीवर चांगलें लक्ष ठेवा, व तो **न**र्मदा उतरून अलीकडे येण्याचा इलाज करील तर त्याच्या पिछाडीवर हल्ला करून त्याच्या तंगड्या त्याच्याच गळ्यांत घाला.” परंतु **बा**जीरावाला आपल्या संकेताप्रमाणें **दु**आब प्रांतावर हल्ला करतां आला नाहीं; कारण त्याच सुमारास, “ **कों**कणांत बरीच गडबड उडाली आहे तर आपण तावडतोब निघून यावें” असें **शाहू म**हाराजांचें पत्र त्यास येऊन पोहोंचलें. त्यामुळें बादशाहानें तहाचें बोलणें सुरू केलें होतें त्याप्रमाणें **मा**ळवा प्रांताचें सर्व आधिपत्य व स्वारीखर्चाबद्दल १३ लाख रुपये घेण्याचा ठराव करून घेऊन तो **द**क्षिणेंत निघून आला. परत येण्याचे वेळीं त्यानें आपला वकील **धों**डोपंत **पु**रंदरे यास पुनः **दि**ल्लीच्या दरबारीं पाठवून दिलें. **पे**शवा सन १७३७ त **सा**ताऱ्यास येऊन पोहोंचला, व तेथें **शा**हू **म**हाराजांची भेट घेऊन एकदम **कों**कणांत निघून गेला.

पोर्तुगीज लोकांच्या मदतीनें **कु**लाबा किल्ला **मा**नाजी **आं**ग्र्याच्या हातीं लागला, परंतु या कामगिरीबद्दल **आं**ग्र्यानें त्या लोकांस **रे**वदंड्यानजीक कांहीं मुलूख देऊं केला होता तो दिला नाहीं, यामुळें पोर्तुगीज लोकांनीं **सं**भाजी **आं**ग्र्याचा पक्ष स्वीकारून ते **मा**नाजीपासून **कु**लाबा परत घेण्याचा यत्न करूं लागले. तेव्हां **मा**नाजीनें **शा**हू **म**हाराजांजवळ मदत मागितली. त्याला मदत करण्याकरितां **म**हाराजांनीं **बा**जीरावास **कों**कणांत जाण्यास आज्ञा केली. तो **कों**कणांत गेल्यावर **कु**लाब्याजवळ त्याची व पोर्तुगीज लोकांची लढाई

झाली, तींत पोर्तुगीज लोक पळून गेले व **बाजीरावास** जय मिळाला. ह्या कामगिरीबद्दल **मानाजीनें शाहू महाराजांस** ७००० रुपये रोख व सालीना ३००० रुपये किमतीचें चिनई व विलायती सामान देण्याचा करार केला. हें वर्तमान सन १७३७ त घडलें.

नंतर **बाजीरावानें साष्टी** प्रांतावर हल्ला केला. त्याच्या पदरीं **विसाजीपंत लेले** ह्मणून एक कारकून होता, त्यानें पोर्तुगीज लोकांच्या पदरचे बरेच लोक वश करून घेतले. प्रथमतः मराठ्यांनीं तारीख ६ एप्रिल रोजीं रात्रीस छापा घालून **वसई**नजीक नदीच्या पलीकडे **घोडबंदर** ह्मणून एक किल्ला होता तो घेतला, व तेथील पोर्तुगीज सरदार व शिपाई लोक यांस कापून काढलें. दुसऱ्या दिवशीं ह्मणजे तारीख ७ रोजीं मराठे नदीचा कांठ धरून बसले, व **वसई** व **साष्टी** एथील पोर्तुगीज लोकांमधील दळणवळण त्यांनीं बंद पाडलें. नंतर मराठे **ठाण्या**वर हल्ला करण्याकरतां निघाले. त्या वेळीं तेथें **लुई बोटेलो** हा पोर्तुगीज लोकांचा सरदार होता. तो तेथून **करंज्यास** पळून गेला. **ठाण्यास कप्तान पेरीरा** व **वांदऱ्यास कप्तान फिराझ्** हे दोन सरदार मात्र आपापलीं ठाणीं धरून बसले होते. **कप्तान पेरीरा** यानें दोन वेळां मराठ्यांचा हल्ला मागें परतविला. परंतु दुसऱ्या हल्ल्यांत त्याला मोठी जखम लागून तो मरणोन्मुख होऊन पडला. त्याच्या जागेवर दुसरा एक सरदार आला. परंतु तो मराठ्यांचें नुसतें नांव ऐकूनच पळून गेला व **ठाणें** मराठ्यांनीं सर केलें. नंतर **बाजीरावानें** आपला मोर्चा **वांदऱ्या**वर फिरविला. ह्या ठिकाणीं इंग्लिश लोकांनीं पोर्तुगीज लोकांस गुप्त रीतीनें दारूगोळ्याची मदत केली होती. तिकडील मुलूख जिंकण्याकरतां **बाजीरावानें** कांहीं आरब लोक व मावळे व हेटकरी नोकरीस ठेविले. परंतु इतक्यांत मराठ्यांच्या नाशाकरतां **दिल्लीस** मोठ्या कडाक्यानें तयारी सुरू झाली आहे असें त्यास समजतांच, बरेंच पुष्कळ सैन्य बरोबर घेऊन तो **हिंदुस्थानांत** स्वारी करण्याच्या हेतूनें **कोंकणांतून** निघून गेला.

---

# भाग ८.

## बाजीराव बल्लाळ पेशवे यांची कारकीर्द, इ० स० १७३८ पासून १७४० पर्यंत.

मराठ्यांच्या नाशाकरतां महंमदशाहा बादशाहानें केलेला प्रयत्न.—निजामउल्मुल्क फौजेसह माळव्यांत येतो.—बाजीराव आपल्या फौजेसह नर्मदा उतरतो.—भोपाळची लढाई.—निजामउल्मुल्काचा कोंडमारा.—त्याला बादशाहाकडून मदत येत नाहीं.—तो आपला पुत्र नासिरजंग यास मदतीस बोलावितो.—नासिरजंगास न येऊं देण्याविषयीं बाजीरावानें केलेली व्यवस्था.—निजाम मोठ्या कष्टानें दुराईसराई एथें येऊन पोहोंचतो.—तो बाजीरावास शरण येतो.—त्यांच्यांत तह होतो.—पोर्तुगीज लोकांबरोबर युद्ध.—तारापुरची लढाई.—रघूजी भोंसले कटक परगणा लुटतो.—रघूजीची उद्दाम वर्तणूक व बाजीराव त्याचें पारिपत्य करण्याकरतां निघतो.—वाटेंत त्याला नादिरशाहाच्या स्वारीचें वर्तमान कळतें.—नादिरशाहानें दिल्लीवर स्वारी करून जी भयंकर कत्तल केली तिची हकीकत.—बाजीराव त्याच्याशीं सामना देण्याची तयारी करतो.—चिमणाजी आपा वसईच्या किल्ल्यास वेढा देतो.—वसई हातीं आल्यावर तो शिंदे, होळकर यांस बाजीरावाच्या मदतीस पाठवून देतो.—नादिरशाहा दिल्लीच्या बादशाहास तक्तावर बसवून इराणास परत जातो.—त्यानें दिल्लीहून नेलेली लूट.—त्याच्या स्वारीमुळें दिल्ली एथें घडलेला परिणाम.—बाजीराव बादशाहास पत्र पाठवितो.—बादशाहाकडून त्याला आलेला नजराणा.—तो उत्तरहिंदुस्थानांतील रजपूत राजे व बुंदेलखंडचे राजे यांच्याशीं निजामाच्या नाशाकरतां सख्य करतो.—तो कर्नाटकच्या स्वारीचा बेत रहित करतो.—रघूजी भोंसले हा साताऱ्याच्या दरबारीं ब्राह्मणांचें वर्चस्व पाहून त्यांचा द्वेष करतो.—बाजीराव युक्तीनें रघूजीस कर्नाटकावर स्वारी करण्याची मसलत देतो.—तो नासिरजंगाच्या फौजेस वेढा घालतो.—मुंगीपैठण एथील तह.—संभाजी आंग्रे कोंकणांत गडबड करतो.—शाहू महाराज मानाजीच्या मदतीस बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यास पाठवितात.—बाजीराव नानासाहेबांच्या मदतीस आपास पाठवून देतो.—नानासाहेब संभाजी आंग्र्याचा हिराकोट एथें पराभव करतो.—उत्तरहिंदुस्थानांत जास्त मुलूख काबीज करण्याचे हेतूनें बाजीराव नर्मदेपर्यंत येऊन पोहोंचतो.—तो आजारी पडतो.—कलमडें एथें त्याचा मृत्यु.— त्याच्या मृत्यूमुळें झालेलें दुःख.—कोंकणांत

आपा व नाना यांस ही दुःखकारक वार्ता कळते.—ते कोंकणची व्यवस्था करून निघून येतात.—बाजीरावाच्या राजनीतींतील गुणदोष.

मराठ्यांचा नाश करण्याकरतां महंमदशाहा बादशाहानें निजामउल्मुल्कास दिल्लीस बोलाविलें होतें त्याप्रमाणें तो दिल्लीस जाऊन पोहोंचला. निजामानें तें काम विशेष दक्षतेनें व तत्परतेनें करावें ह्मणून बादशाहानें त्याचा थोरला मुलगा गाजीउद्दीन यास माळवा व गुजराथ या दोन प्रांतांची सुभेदारी दिली.

आपल्या पदरच्या मांडलिक राजांपासून जितकी फौज मिळवितां येईल तितकी मिळवावी अशाविषयीं बादशाहानें निजामउल्मुल्कास पूर्ण अधिकार दिला होता. परंतु एवढा द्राविडीप्राणायाम करूनही, त्याचे खासगी व बाहेरून मदतीस बोलाविलेले मिळून फक्त ३४००० लोक काय ते त्याचे जवळ जमले. त्याचा तोफखाना मात्र फार उत्तम होता. सादतखानाचा पुतण्या अबुल मनसूरखान सफतरजंग ( प्रसिद्ध सुजाउद्दौला याचा बाप ) व कोट्याचा राजा ह्यांची त्यानें आपल्या पिछाडीचा बंदोबस्त करण्याकडे नेमणूक केली. निजाम त्या स्वारीची एकंदर व्यवस्था फार जपून व मोठ्या काळजीनें पहात होता. प्रथमतः यमुना उतरून तो दुआब प्रांतांत उतरला. नंतर यमुनेच्या दक्षिणतीरानें जाऊन काल्पी येथें ती नदी पुनः तो उतरला, व बुंदेलखंडच्या राजांस बरोबर घेऊन तो माळवा प्रांतांत दाखल झाला. ह्या प्रसंगीं फक्त बुंदीचा राजा काय तो निजामाच्या मदतीस आला नव्हता.

बाजीराव नर्मदेवर जाऊन पोहोंचेपर्यंत त्याच्याजवळ एकंदर ८०००० सैन्य जमा झालें. तरी या प्रचंड सैन्यांत यशवंतराव दाभाडे, गायकवाड, रघूजी भोंसले वगैरे मराठे सरदार नव्हतेच. हे सरदार आले नाहींत याचें कारण पेशव्याचें व त्यांचें अंतस्थ वैमनस्य होतें हें होय.

बाजीराव सन १७३८ त नर्मदा उतरला त्या वेळीं निजामउल्मुल्क सिरोंज एथें होता. त्या दोन्ही सैन्यांची सन १७३८ च्या

जानेवारी महिन्यांत भोपाळ एथें गांठ पडली. बाजीरावाच्या मनांत निजामाची चांगलीच खोड जिरवावयाचें होतें; परंतु त्याचें सैन्य वाटेच्या श्रमानें फार थकलें होतें, ह्मणून त्याला एकदम हल्ला करतां आला नाहीं. या वेळीं निजामानें जर बाजीरावाच्या सैन्यावर हल्ला केला असता तर त्याला निजामाचा पराभव करण्यास बरेंच जड गेलें असतें. परंतु निजामानें तसें कांहीं न करतां तो भोपाळच्या किल्ल्यानजिक आपल्या सैन्याचा तळ देऊन वसला. निजामानें हा तळ आपल्या मतें सुरक्षित अशा स्थळीं दिला होता. त्याच्या पुढच्या अंगास एक मोठा ओढा असून मागच्या अंगास एक विस्तीर्ण तलाव होता. परंतु ही जी जागा त्यानें शोधून काढिली तीच पुष्कळ अंशीं त्याच्या नाशास कारणीभूत झाली. बाजीरावाची व त्याची प्रथम जी चकमक झडली, तींत जयसिंगाचा मुलगा, बुंदेलखंडच्या राजाचे स्वार व दुसरे रजपूत लोक बरोबर घेऊन आला होता. त्या लढाईंत ९०० रजपूत लोक पडले, व त्यांचे ७०० घोडे बाजीरावानें धरून नेले. पेशव्याचे फक्त १०० लोक पडले व ३०० जखमी झाले. ह्या लढाईंत राणोजी शिंदे, पिलाजी जाधव व सयाजी गुजर हे प्रमुख होते. ही लढाई चालली असतां, निजाम आपलें ठाणें सोडून बाहेर पडेल तर त्याच्यावर एकदम हल्ला करून त्याचा फडशा उडवावा अशा हेतूनें, तेथून जवळच दोन बाणांच्या टप्यावर आपल्या निवडक फौजेनिशीं बाजीराव उभा होता. परंतु त्याच्या मनांत होतें तसें घडून आलें नाहीं. नंतर बाजीरावानें निजामास चोहींकडून वेरा घालून त्याचा कोंडमारा करून टाकला, व त्याच्या सैन्यास धान्यादिकांचा अगदीं तोटा पाडला. सफतरजंग व कोट्याचा राजा यांची एक टोळी दाणावैरण आणण्याकरतां बाहेर पडली. परंतु मल्हारराव होळकर व यशवंतराव पवार ह्यांनीं तिच्यावर हल्ला करून तींतील १९०० लोक ठार केले. दिवसेंदिवस वेढ्यांत सांपडलेल्या लोकांची फारच कठिण अवस्था होऊं लागली. त्यांना मूठभर आटा व कटोराभर पाणीही मिळेनासें झालें. बाजीरावाचे लोक आपणावर




कोणत्या वेळेस कोणत्या अंगानें तुटून पडतील याचा निजामास कांहींच अंदाज लागेना. यामुळें त्याचे शिपाई रात्रंदिवस खडा पहारा करीत बसले होते. **नि**जामाच्या सैन्यापैकीं पुष्कळ लोक—विशेषतः रजपूत—आपणांला आश्रय देऊन आपलें रक्षण करावें ह्मणून **बा**जीरावाची विनंति करूं लागले. परंतु वेढ्यांत सांपडलेल्या शत्रूच्या लोकांची जितकी जास्त संख्या असेल तितका शत्रु लवकर जेरीस येतो हें तत्व **बा**जीरावास चांगलें माहीत होतें, यामुळें त्यानें त्यांचें बोलणें त्या वेळीं मान्य केलें नाहीं. **नि**जामउल्मुल्क मोठा धोरणी व कावेबाज असून अशा रीतीनें आपल्या पेंचाटींत कसा सांपडला याचेंच **बा**जीरावाला राहून राहून आश्चर्य वाटत असे. **बा**जीरावानें **भो**पाळाहून **चि**मणाजी **आ**पास पत्र पाठविलें त्यांत तो असें ह्मणतो कीं, “ **न**बाब ( **नि**जामउल्मुल्क ) एवढा वृद्ध व अनुभवशीर योद्धा असून तो अशा रीतीनें कसा गाफिल राहिला याचें मला फार मोठें नवल वाटतें. **दि**ल्लीकडे अशी बातमी आहे कीं, ह्या ठिकाणीं **नि**जामउल्मुल्काचा पुरा फडशा उडणार.”

**नि**जामउल्मुल्कानें मदतीकरतां **बा**दशाहास पत्र पाठविलें. तेव्हां त्याच्या मुक्ततेकरतां **दि**ल्लीस वरकांती मोठ्या जारीनें तयारी चालली. वजीर **खा**नडौरान व **नि**जाम यांचें पूर्वीपासून वैमनस्य होतें, यामुळें **नि**जामाची **बा**जीरावानें केलेली दुर्दशा पाहून त्याला मनांतून फार आनंद झाला. शिवाय बादशाहानें आपल्या सैन्यास असा हुकूम केला कीं, “मला स्वतः **नि**जामाच्या कुमकेस जावयाचें आहे, तर मी निघेपर्यंत कोणींही हालचाल करूं नये.” **बा**जीरावास वरील वर्तमान कळलें तेव्हां, उत्तरेकडून कदाचित् **नि**जामास मदत येईल ह्मणून जी त्याला भीति होती ती बहुतेक दूर झाली; कारण बादशाहा आंतून **नि**जामाचा द्वेष करतो असें **बा**जीरावास ठाऊक होतें, व त्यामुळें तो त्याच्या मदतीस कधींही येणार नाहीं हें **पे**शवा पूर्णपणें समजून होता. **नि**जामानें **दि**ल्लीस पत्र पाठविलें त्याच वेळीं दुसरें एक पत्र त्यानें आपला पुत्र **ना**सिरजंग यासही **द**क्षिणेंत पाठविलें होतें. त्यावरून

**ना**सिरजंगानें **है**दराबाद व **औ**रंगाबाद एथें मोठें सैन्य जमा केलें. **नि**जाम या वेळीं इतका भिऊन गेला होता कीं, **ना**सिरजंगानें आपल्या कुमकेस लवकर निघून यावें ह्मणून त्यानें **भो**पाळ एथून जासुदांवर जासूद पाठविण्याचा सपाटा चालविला होता.

**बा**जीरावास वरील खबर कळली तेव्हां त्यानें **से**नासाहेब सुभे **र**घूजी **भों**सले यास आपल्या मदतीस यावें ह्मणून पत्रांवर पत्रें पाठविलीं. त्यांत कांहीं आर्जवांचीं व कांहीं धमकीचींही होतीं. परंतु **र**घूजी मदतीस आला नाहीं. **पे**शव्यानें, **से**नापति **य**शवंतराव **दा**भाडे त्या वेळीं **सु**रतेजवळ **सो**नगड एथें होता त्यास मदतीस पाठवून देण्याविषयीं **शा**हू **म**हाराजांस विनंतिपत्र लिहिलें, व **म**हाराजांनींही "**पे**शव्याच्या मदतीस जरूर निघून जावें" ह्मणून **दा**भाड्यास स्वदस्तूरचें पत्र लिहून निक्षून आज्ञा केली. **नि**जामाच्या कुमकेस येणारें सैन्य त्या वेळीं **औ**रंगाबादच्या उत्तरेस **फु**लमरें एथें जमलें होतें, व **चि**मणाजी **आ**पा त्या सैन्याची वाट पहात **ता**पीच्या कांठीं दबा धरून बसला होता. त्या वेळीं **आ**पास **बा**जीरावानें असें लिहिलें होतें कीं, "या वेळीं तुझ्यानें जितकी फौज जमा करवेल तितकी जमा कर; **फ**त्तेसिंग **भों**सले, **शं**भूसिंग **जा**धव व **स**रलष्कर यांस **द**क्षिणेंतून आपल्या मदतीस बोलाव; व **से**नापति **दा**भाडे, **गा**यकवाड, **बां**डे वगैरे सरदार माझ्या मदतीस निघाले नसतील तर त्यांनाही आपल्याकडेच बोलावून घे; आणि सर्व मिळून **ना**सिरजंगाच्या फौजेवर नजर ठेवा. जर या वेळीं सर्व मराठे एकचित्त होऊन नेटानें प्रयत्न करतील, तर मराठ्यांना सर्व **द**क्षिणचें आधिपत्य मिळण्यास मुळींच विलंब लागणार नाहीं."

पुढें **नि**जामउल्मुल्क **भो**पाळाहून निघून जाण्याविषयीं प्रयत्न करूं लागला; परंतु तोफा वगैरे अवजड सामान त्याच्याबरोबर फार असल्यामुळें त्याला मागें फिरावें लागलें. त्याचें सैन्य पूर्वीच्या जागीं परत येत असतां **बा**जीरावानें त्याच्यावर हल्ला केला. त्यामुळें त्याला **भो**पाळच्या किल्ल्यापर्यंत मागें हटावें लागलें. त्याचें सैन्य किल्ल्यांत शिरूं

लागलें, परंतु आंतील जागा सर्व सैन्यास पुरे इतकी नसल्यामुळें कांहीं लोक तटाच्या बाहेरच्या अंगास राहिले. तटाला खिंडार पाडण्यासारख्या तोफा **बाजीरावा**बरोबर नव्हत्या. तथापि त्याच्या सैन्यानें बाणांचा व गोळ्यांचा **निजामा**च्या सैन्यावर असा मारा चालविला होता कीं, त्यामुळें **निजामउल्मुल्क** फारच घाबरून गेला. शेवटीं मारीन किंवा मरेन असा मनाचा धडा करून जड जड सामान होतें तें **भोपाळ** व **इस्लामगड** एथें टाकून व कांहीं तोफा व उंटावरच्या जेजाला बरोबर घेऊन तो बाहेर पडला. **बाजीरावा**नें त्यांच्यावर हल्ला करून तोफखाना घेण्याचा प्रयत्न केला. परंतु त्या हल्ल्यांत तोफांच्या माऱ्यामुळें त्याचे बरेच लोक पडले. तोफखान्याचे आश्रयानें रोज एक किंवा दीड कोसाची मजल करीत **निजामउल्मुल्क** मोठ्या शर्थीनें **सिरोंज**च्या नजीक **दुराईसुराई** एथें जाऊन पोहोंचला. यापुढें **बाजीरावा**बरोबर आपला निभाव लागणें कठिण असें समजून, प्रथम **बाजी-**

---

१ एथून **बाजीरावा**नें **धावडशी**च्या स्वामींस पत्र पाठविलें होतें तें एणेंप्रमाणें:—

श्रीमंत **परमहंस महाराज** श्रीस्वामींचे सेवेशीं चरणरज **बाजीराव बल्लाळ** प्रधान. कृतानेक विज्ञापना येथील कुशल **महाराजां**चे आशीर्वादें पौष वद्य चतुर्दशीपावेतों मुक्काम **भूपाळ** यथास्थित असों विशेष. या प्रांतीं फौजेसहित आलों. **नबाबा**चा व आमचा मुकाबला व्हावा तों **नबाब भूपाल** टप्पा अशिरीयास गेले. छ० ३ रमजानीं एक युद्ध जाहलें. दुसरें कालही एक युद्ध **नबाबाचें** व लोकांचें ( आमच्या फौजेचें ) झालें. बरासा तमाशा **नबाबांनीं** पाहिला. **महाराजां**चे प्रतापें मोर्चे नबाबावरील सलाबत ( सिद्धि ) बरीशी चढली. नबाब **भोपाळ**चे आश्रयास तीस चाळीस हजार फौजेनिशीं बसले. आमचे मोर्चे बाद घोडविरि ( ? ) बसले आहेत. कराळचा ( बंदुकवाले घोडेस्वार ) मार देत आहेत. मोंगलांचा आरगानरगा ( दाणावैरणीची बंदी ) केला आहे. दाणा, गल्ला, वैरण, काडी कुलबाद झाली आहे. बासगाचीच ( ? ) गत यास झाली आहे. स्वामींच्या आशीर्वादें **निजामउल्मुलख** या ठिकाणीं बुडत आहे. अगर सुटका झाली तरी उत्तमच होईल. **नबाब** किल्लेबंद झाले त्यामुळें त्याची अब्रू राहिली नाहीं. आपला आशीर्वाद समर्थ आहे. सर्व आशीर्वाद **महाराजां**चा आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.—पत्रें, यादी वगैरे (पत्र ४४).

रावानें जानेवारी महिन्यांत त्याच्यावर हल्ला केला त्या दिवसापासून २४ व्या दिवशीं ह्मणजे तारीख ११ फेब्रुवारी सन १७३८ रोजीं निजाम पेशव्यास शरण आला, व त्यानें तहाचें बोलणें लाविलें. त्या वेळीं निजामापाशीं बाजीरावानें जें जें मागितलें तें तें सर्व त्यानें कबूल केलें. "संपूर्ण माळवा प्रांत व नर्मदा व चंबळा ह्या नद्यांच्या मधील सर्व मुल्ख व लढाईच्या खर्चाबद्दल ५० लाख रुपये बादशाहाकडून देववितों" असा निजामाचा स्वदस्तुरचा लेख लिहून घेऊन बाजीरावानें त्याचा पिच्छा सोडिला. नंतर कांहीं दिवस बाजीराव चंबळा नदीचे दक्षिणेकडील मुलखावर खंडणी बसविण्याकरतां तिकडेच राहिला.

बाजीराव उत्तरहिंदुस्थानांत निजामाबरोबर लढाई करण्याच्या कामांत गुंतला असतां कोंकणांत चिमणाजी आपा हाही पोर्तुगीज लोकांबरोबरच्या लढाईत गुंतला होता. त्यानें, पोर्तुगीज लोकांनीं विशेष गडबड करूं नये ह्मणून, व्यंकटराव घोरपडे यास कांहीं स्वार बरोबर देऊन गोव्याकडे रवाना केलें, व उत्तरकोंकणांत खंडूजी माणकर[1] यास पाठवून दिलें. त्यानें प्रथमतः तारापुराजवळ अशिरी ह्मणून किल्ला आहे त्यास वेढा दिला. ह्या वेळीं डॉन आंटोनिओ कार्डिम फ्रायस् ह्या प्रसिद्ध पुरुषाची वसई व साष्टी यांच्या सुभेदारीवर नेमणूक झाली होती, व त्यानें, पोर्तुगीज लोकांचा जो मुल्ख मराठ्यांनीं घेतला होता त्यापैकीं कांहीं त्यांच्याशीं लढून परत घेतला. कर्नल पेड्रो डी मेलो यानें ९०० युरोपियन व ४००० पोर्तुगीज काळे[2] लोक बरोबर घेऊन अशिरी एथें खंडोजी माणकर याच्यावर हल्ला करून त्याचा मोड करून टाकला, व ठाणें मराठ्यांपासून एकदम हल्ला करून परत घेण्याचा मोठ्या नेटानें उद्योग चा-

---

१ माणकर याचे वंशज कुलाबा जिल्ह्यांत माणगांव तालुक्यांत खरवली एथें राहतात. खरवली गांव त्यांस इनाम आहे. २ हिंदुस्थानांत पोर्तुगीज लोकांनीं जे लोक बाटविले होते त्यांपैकीं.

लविला. मुंबई येथील इंग्लिशांच्या गव्हरनरानें ह्या हल्ल्याचें वर्तमान मराठ्यांस कळविलें, व पोर्तुगीज लोकांशीं तह करावा अशी त्यांस मसलत दिली. परंतु इतक्यांत मल्हारराव होळकर हा खंडोजी माणकराचे मदतीस ठाण्यास आला. नंतर लवकरच डॉन आंटोनिओ फ्रायस् यानें स्वतः ठाण्याच्या किल्ल्यावर हल्ला केला. परंतु होळकरानें त्याचा पराभव करून त्यास मागें हटविलें. ह्या झटापटींत फ्रायस् साहेब गोळी लागून पडला, व पोर्तुगीज लोक पळून गेले.

पुढें इ० स० १७३९ त महाराजांनीं चिमणाजी आपाबरोबर शिंदे, होळकर, वगैरे सरदार देऊन त्यास कोंकणांत पाठवून दिलें. ह्या वेळीं चिमणाजी आपा मोठ्या जय्यत तयारीनें कोंकणांत आला होता. राणोजी शिंद्यानें प्रथमतः जानेवारी महिन्यांत कतलवाडी व डहाणू हे किल्ले सर केले, व फेब्रुवारी महिना संपत आहे तोंच शिरगांव, केळवें व तारापूर हेही आणखी पोर्तुगीज लोकांशीं लढाई करून घेतले. तारापूर एथें मात्र फार भयंकर युद्ध झालें. मराठ्यांनीं किल्ल्याच्या तटास ४ सुरुंग लावले होते. त्यांपैकीं २ चांगले उडाले व तटाला बरेंच मोठें खिंडार पडलें. बाजी भिवराव, रामचंद्र हरी, यशवंतराव पवार व आंग्र्याचा सरदार तुकाजी पवार हे आपापले लोक बरोबर घेऊन किल्ल्याकडे धांवले. परंतु पोर्तुगीज लोकांनीं त्यांचें कांहीं चालूं दिलें नाहीं, व कांहीं वेळपर्यंत जय कोणास मिळणार तें कांहींच कळेना. नंतर राणोजी भोंसला खंदकांतून, ज्या ठिकाणीं खिंडार पडलें नव्हतें तेथें गेला, व शिड्या लावून हातांत नंग्या तरवारी घेऊन त्याचे लोक वर चढले. परंतु ह्या ठिकाणींही पोर्तुगीज लोक जिवावर उदार होऊन लढले; व बहुतेकांनीं देह ठेवीपर्यंत मराठ्यांचा किल्ल्यांत शिरकाव होऊं दिला नाहीं. किल्ल्यांत जे पोर्तुगीज लोक मराठ्यांच्या हातीं

---

१ जान हार्नी किंवा स्टीफन ला यांपैकीं त्या वेळीं कोण होता तें निश्चयानें सांगतां येत नाहीं.—ग्रांटडफ.

सांपडले त्यांत त्यांचा मुख्य सरदार **डॉन फ्रान्सिस** डी **आलार-केओ** हाही मराठ्यांच्या हातांत सांपडला.

अशा रीतीनें पोर्तुगीज लोकांबरोबरची लढाई मोठ्या निकरानें सुरू असतां व **रघूजी भोंसल्याचा** चुलता **राणोजी भोंसला** आदि-करून प्रतापी वीर **तारापूर** वगैरे ठिकाणीं आपल्या शौर्याची कमाल करीत असतां **रघूजी भोंसला** आपली सत्ता पूर्वेकडे विस्तृत करीत होता. **निजामउल्मुल्काला बाजीरावानें भोपाळ** एथें कोंडून धरलें होतें त्या संधींत त्यानें **कटक** परगणा लुटला, व उत्तरेस **अलहाबा-देपर्यंत** स्वारी करून तेथील सुभेदार **सुजाखान** यास ठार मारिलें, व तोही प्रांत लुटून तिकडून अतोनात पैसा घेऊन तो गेला. वरील स्वारी करण्याबद्दल त्यानें **शाहू महाराजांची** परवानगी मागितली न-व्हती. तेव्हां अशा प्रकारची त्याची उद्दाम व बेमर्याद वर्तणूक पा-हून **बाजीरावास** फार राग आला. त्याचें पारिपत्य करण्याकरितां **बाजीराव पुण्याहून** बरोबर फौज घेऊन निघाला, व त्यानें आपला विनीचा सरदार **आवजी कावरे** यास **वऱ्हाड** प्रांतांत लुटालूट कर-ण्याकरितां पुढें पाठवून दिलें. परंतु हे अपयशी **कावरेबुवा वऱ्हाडांत** जातात तोंच त्यांच्यावर **रघूजीनें** स्वारी करून त्यांचा इ० स० १७३९ च्या फेब्रुवारीच्या अखेरीस पुरा नाश करून टाकला. **बा-जीरावानें** हें अपजयाचें वर्तमान ऐकिलें तेव्हां त्याला फारच राग आला, व **रघूजीची** पक्की रग जिरविण्याकरितां तो दरकूच दरमजल करीत निघाला.

परंतु मार्गांत त्याला निराळेंच वर्तमान समजलें त्यामुळें त्याला त्या वेळीं तो बेत रहित करावा लागला. त्याला असें कळलें कीं, **इराणचा** बादशाहा **नादिरशाहा** यानें **दिल्लीवर** स्वारी करून मोंगलांचा परा-भव केला, **खानडौरान** लढाईंत पडला, व **सादतखान** यास शत्रूंनीं कैद केलें.

---

१ ह्याच आवजी **काव-याचा**, डभईच्या लढाईच्या प्रारंभीं दमाजी गायकवाड यानें सन १७३१ त पराभव केला होता.

ह्या ठिकाणीं नादिरशाहाच्या स्वारीचा जरा खुलासेवार इतिहास दिला असतां अगदींच अप्रासंगिक होणार नाहीं. कारण दिल्लीचें राज्य दुर्बळ होत चाललेंच होतें, परंतु तें एकदम अतिशय दुर्बळ होण्याला व विशेष प्रयास न पडतां मराठ्यांच्या हातांत येण्याला ही स्वारी वरीच कारणीभूत झाली.

नादिरशाहा हा इराणचा बादशाहा. तो पूर्वीं कंदाहारास वेढा घालीत होता तेव्हां कांहीं अफगाण लोक गिझनीजवळील[1] प्रांतांत पळून आले होते. तेव्हां नादिरशाहानें त्यांस पकडावें किंवा देशपार करावें ह्मणून दिल्लीच्या दरबारास विनंति केली. परंतु त्या लोकांचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य त्या वेळीं दिल्लीच्या दरबारास नव्हतें; शिवाय अशा रीतीनें आपणाला लिहिण्याचा नादिरशाहाला अधिकार नाहीं असेंही दरबारी लोक ह्मणूं लागले. दरबारी लोकांच्या सांगणीवरून बादशाहानें नादिरशाहास कांहींच उत्तर पाठविलें नाहीं. नादिरशाहास या गोष्टीमुळें फार राग आला, व तो एकदम गिझनी व काबूल यांजवर चाल करून आला. नंतर त्यानें आपला एक जासूद दिल्लीस पाठविला. परंतु त्यास अफगाण लोकांनीं पहाडांत मारून टाकलें. तेव्हां हिंदुस्थानावर स्वारी करण्याला हें कारण सबळ आहे असें नादिरशाहास वाटल्यावरून तो त्या खटपटीस लागला. काबूल प्रांत विशेष आयास न पडतां त्याच्या हातीं लागला. परंतु तेथचा नीट बंदोबस्त करण्याकरितां त्याला कांहीं महिने तेथें रहावें लागलें. नंतर तो हिंदुस्थानांत येण्याकरितां कूच करूं लागला. ह्या वेळीं दिल्लीच्या दरबारीं मराठ्यांची फार भीति होती; शिवाय दरबारी मंडळीच्या आंतल्या आंत फळ्या झाल्या होत्या. यामुळें नादिरशाहाची हालचाल कशी काय आहे इकडे कोणाचेंच लक्ष पोहोंचलें नाहीं. इ० स० १७३८ च्या नवंबर महिन्यांत नादिरशाहा पहाडांतून खालीं उतरला, व त्या ठिकाणीं एक मोंगलांचा सरदार होता त्याचा पराभव करून सिंधुनदावर नावांचा पूल बांधून तो

१ हा प्रांत त्या वेळीं दिल्लीच्या बादशाहाच्या ताब्यांत होता.

**पं**जाबांत शिरला. हें वर्तमान **दि**ल्लीस समजलें तेव्हां मात्र तेथील सर्व लोकांची पांचांवर धारण बसली.

**ना**दिरशाहा **दि**ल्लीपासून ९० कोसांच्या आंत येईपर्यंत त्यास मोंगलांकडून कांहींएक अडथळा झाला नाहीं. नंतर **म**हंमदशाहानें, **नि**जामउल्मुल्क त्या वेळीं **दि**ल्ली एथें होता त्याच्याबरोबर बरीच फौज देऊन त्याला **क**र्नाळ एथें पाठवून दिलें, व त्या ठिकाणीं छावणी देऊन तो **ना**दिरशाहाची वाट पहात बसला. **ना**दिरशाहा **क**र्नाळ एथें येऊन पोहोंचण्याच्या सुमारास **अ**योध्येचा नबाब **सा**दतखान हाही **क**र्नाळ एथें येऊन पोहोंचला. पुढें मोंगलांची व इराणी लोकांची लढाई झाली तींत मोंगलांचा पुरा पराभव झाला, **खा**नडौरान मारला गेला, व **सा**दतखान शत्रूंच्या हातांत सांपडला. ही लढाई चालली असतां **नि**जामउल्मुल्क लढाईत न शिरतां स्वस्थ बसून राहिला होता. वरील लढाई तारीख १३ फेब्रुवारी सन १७३९ त झाली. ह्या पराजयानंतर **म**हंमदशाहानें आपण शरण आलों असें बोलणें लावण्याकरतां **नि**जामउल्मुल्कास **ना**दिरशाहाकडे पाठवून दिलें, व मागून आपण स्वतः कांहीं लोक बरोबर घेऊन त्याच्या छावणींत गेला. नंतर कांहीं दिवसांनीं **म**हंमदशाहास बरोबर घेऊन **ना**दिरशाहा **दि**ल्लीस आला. तो मार्च महिन्याच्या आरंभीं **दि**ल्लींत आला, व ते दोन्ही पादशाहा **खा**समहालांत जाऊन उतरले. **ना**दिरशाहानें सर्व शहरभर आपल्या लोकांच्या चौक्या बसविल्या, व जागजागीं पहारेही ठेविले.

**ना**दिरशाहानें एवढा बंदोबस्त केला तरी **दि**ल्लीचे लोक स्वस्थ बसले नाहींत. त्याला **दि**ल्लींत येऊन एक दिवस झाला नाहीं तोंच तो मेला अशी त्या लोकांनीं कंडी उठविली. तेव्हां **दि**ल्ली एथील रहिवाशी लोकांचा द्वेष ज्यास्तच दुणावला. ते लोक, जे इराणी लोक त्यांच्या हातांत सांपडण्यासारखे होते त्यांवर तुटून पडले, व **दि**ल्लीच्या लोकांच्या क्रोधाग्नींत त्यांपैकीं बरेच जणांच्या आहुती पडल्या.[1]

---

१ हझीन ह्या वेळीं ७०० लोक मारले गेले असें म्हणतो, व **स्कॉट** १००० मारले गेले असें म्हणतो.

नादिरशाहा प्रथमतः हा दंगा बंद करण्याच्या खटपटीस लागला. परंतु तो बंद न होतां सर्व रात्रभर एकसारखा सुरू होता. नंतर सूर्योदयीं, आपण स्वतः गेल्यानें हा दंगा बंद होईल असें समजून तो घोड्यावर बसून निघाला. रस्त्यांत प्रथमतः त्याच्या देशबांधवांचीं प्रेतें त्याच्या नजरेस पडलीं; इतक्यांत दगड, तीर व कांहीं अग्न्यस्त्रें यांचा कित्येक घरांतून त्याच्यावर सारखा वर्षाव सुरू झाला, व त्याच संधींत त्याच्यावर एकानें गोळीही टाकली! परंतु ती त्याला न लागतां त्याच्याजवळ एक उमराव होता त्याला लागून तो ठार झाला. तेव्हां त्याला अतिशय राग येऊन त्यानें शहरांतील लोकांची कत्तल करण्यास हुकूम दिला! ती कत्तल सूर्योदयापासून अपराण्हकाल होईपर्यंत चालली होती; आणि लूट, विषयवासना व सूड उगविण्याची इच्छा यांमुळें जे अनर्थ करण्यास मनुष्य प्रवृत्त होतो, ते सर्व त्या कत्तलींत झाले. शहरांत पुष्कळ ठिकाणीं आग लागली, सर्व शहरचे रस्ते मनुष्यांच्या प्रेतांनीं भरून गेले, रक्ताचे पूर वाहले, व लोक आपला जीव बचावण्याकरतां सैरावैरा पळत सुटले, असा एकच कल्होळ माजून गेला!

अशा प्रकारचा रक्तस्राव पाहून नादिरशाहा खुष झाला. नंतर महंमदशाहाच्या रदबदलीवरून त्यानें ती कत्तल[1] बंद करण्या-

---

१ या गोष्टीविषयीं जे साधारण वृत्तांत आहेत त्यांत तफावती आहेत. एक हकीकत अशी सांगतात कीं, ही कत्तल चालली असतां नादिरशाहा मोठ्या बाजारांतील रुकुद्दौल्याच्या मशिदींत बसला होता. तेथें महंमदशाहा व त्याचे उमराव धीर धरून गेले. ते खालीं माना घालून उभे राहिले होते. मग नादिरानें त्यांस बोलण्याची आज्ञा केल्यावर, महंमदशाहास अश्रु आले, व तो म्हणाला कीं, "आतां माझ्या रयतेस जीवदान द्या." ही गोष्ट असंभाव्य दिसत नाहीं. परंतु हिला डौ साहेबाच्या इतिहासाचा मात्र आधार आहे. हझीन म्हणून कोणी एक गृहस्थ त्या वेळीं तेथें होता त्यानें लिहिलेली हकीकत "सैर मुताखरीन" हा ग्रंथ लिहिणारानें उतरून घेतली आहे. ती व सरबुलंदखानाजवळ एक हिंदुस्थानी चिटणीस होता त्यानें लिहिलेली हकीकत आहे ती, हे दोन या कत्तलीचे चांगले लेख आहेत. त्या चिटणिसाच्या हकीकतींत पुढील गोष्टी तपशीलवार

विषयीं आपल्या लोकांस हुकूम केला. हुकूम होतांच त्याच्या लोकांनीं कत्तल बंद केली. नादिरशाहाची त्याच्या लष्करी लोकांत अशा प्रकारची कैद होती हें पाहून त्याची तारीफच केली पाहिजे!

इतकें झालें तरी दिल्लीच्या लोकांचीं दुःखें संपलीं नव्हतीं. नादिरशाहाचा हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा मुख्य उद्देश, हिंदुस्थान लुटून द्रव्य मिळवावें एवढाच होता, व दिल्लींत आल्यापासून तें द्रव्य कसें वसूल करावें याच गोष्टीचा तो विचार करीत होता. या कामांत त्याचा प्रथमचा मदतगार सादतखान हा होता. परंतु दिल्लीस आल्यावर सादतखान लवकरच मरण पावला. तेव्हां तें काम त्यानें सरबुलंदखान व तहमस्पखान ह्मणून कोणी एक इराणी सरदार होता त्या दोघांस सांगितलें.

त्यांनीं प्रथमतः बादशाही खजिना, प्रख्यात मयूरासन व जवाहीर हें सर्व हस्तगत करून घेतलें. नंतर त्यांनीं मोठमोठ्या अमीरउमराव लोकांवर जुलूम करून त्यांना नागवून टाकले, व शेवटीं ते साधारण प्रतीचे अंमलदार व गोरगरीब यांवर तुटून पडले. त्यांनीं शहरची नाकेबंदी केली, व एकंदरीनें प्रत्येक मनुष्यावर जुलूम करून व त्यास मारहाण करून त्यापासून द्रव्य काढलें. ह्या जुलमामुळें पुष्कळ लोक मेले, व पुष्कळांनीं आत्महत्या केली. ह्या संबंधानें एका ग्रंथकारानें असें वर्णन केलें आहे कीं, "निद्रा व विश्रांति हीं शहरांतून पळून गेलीं; प्रत्येक घरांत व खोलींत दुःखाचे उमासे ऐकूं येऊं लागले; पूर्वीं मोठी कत्तल झाली होती, परंतु सांप्रत निरनिराळ्या लोकांचे खून होऊं लागले!"

---

दाखल केल्या आहेत. ती कत्तल अर्धा दिवस चालली होती, व असंख्य लोक मारले गेले असें हझीन म्हणतो. १२०००० पासून १५०००० मरण पावले असें फ्रेझर ह्मणतो. परंतु "नादिरनाम्यांत" ३०००० मेले असें सांगितलें आहे. स्कॉट साहेब फक्त ८००० मेले असें सांगतो, परंतु त्याला आधार कांहींएक देत नाहीं. आतां त्या कत्तलीच्या कामास २०००० लष्कर लागलें होतें, व त्यास कोणी आडही आला नव्हता, असें असून २ प्रहरांत फक्त ८००० लोक मेले असतील ही गोष्ट बरीच अविश्वसनीय वाटते.—एल्फिन्स्टन.

अशा प्रकारचें भयंकर वर्तमान **बा**जीरावास कळलें तेव्हां त्याला मोठी काळजी उत्पन्न झाली, व एकाएकीं उद्भवलेल्या ह्या जबरदस्त शत्रूचा समाचार घेण्याचा त्यानें निश्चय केला. त्याला असें वाटलें कीं, **र**घूजी **भों**सल्याचा व आमचा कलह हा आपसांतील आहे, त्याचें या गोष्टीपुढें कांहींच महत्व नाहीं, तसेंच पोर्तुगीज लोकांबरोबर चाललेली लढाईही तिच्यापुढें कांहींच नाहीं. ह्या वेळीं **बा**जीराव **न**शिराबाद येथें होता. त्याला असें कळलें कीं, **ना**दिरशाहाचा हेतु **दि**ल्लीच्या तख्तावर आपण बसावें असा आहे. पुढें त्याला आणखी असेंही समजलें कीं, **ना**दिरशाहाचे एक लाख लोक **द**क्षिणेंत चाल करून येत आहेत. परंतु त्यामुळें **बा**जीराव मुळींच घाबरला नाहीं. अशा बलिष्ठ शत्रूस हात दाखविण्याचा प्रसंग आपणास अनायासें प्राप्त होत आहे असें पाहून त्याला जास्त उत्साह व स्फुरण आलें, व **ना**दिरशाहाबरोबर सामना देण्याची तो कडेकोट तयारी करूं लागला. **बा**जीराव ह्मणाला, "ह्या वेळीं **द**क्षिणेंतील सर्व हिंदूंनीं व मुसलमानांनीं मला मदत केली पाहिजे; मी तर आपले मराठे या कामाकरतां **न**र्मदा नदीपासून **चं**बळा नदीपर्यंत पसरणार." त्यानें **ना**सिरजंगास, "**ना**दिरशाहा हा आपणां दोघांचाही शत्रु आहे, तर त्याचें पारिपत्य करण्याकरितां मला येऊन मिळावें" ह्मणून पत्र लिहिलें. त्याचप्रमाणें त्यानें **चि**मणाजी **आ**पासही पत्र पाठविलें कीं, "सध्या पोर्तुगीज लोकांबरोबरची लढाई तहकूब ठेवावी, व एकंदर सैन्य घेऊन मला तावडतोब येऊन मिळावें."

**चि**मणाजी **आ**पास हें पत्र मिळण्यापूर्वी **कों**कणांत पोर्तुगीज लोकांबरोबरची लढाई कशी काय चालली होती तें सांगणें अवश्य आहे.

हें पत्र येण्यापूर्वी **खं**डोजी **मा**णकर याच्या टोळीनें **व**रसोवा व **दा**रवी हे दोन किल्ले पोर्तुगीज लोकांपासून घेतले. ह्या वेळीं बहुतेक **सा**ष्टी परगणा मराठ्यांच्या ताब्यांत आला होता; व **व**सईच्या किल्ल्यास वेढा घालण्याचें काम **चि**मणाजी **आ**पानें नुकतेंच सुरू

केलें होतें. ह्या वेळ्यांत परस्परांच्या लढण्याच्या कसबाची पराकाष्ठा झाली. सन १७३९ च्या फेब्रुवारी महिन्याच्या १७ व्या तारखेस चिमणाजी आप्पाचा सरदार शंकराजी[1] नारायण यानें खुष्कीवरून किल्ल्यास वेढा घातला व पाण्यांतून मानाजी आंग्र्यानें वेढ्याचें काम पुरें केलें. त्या वेळीं किल्ल्यांतील लोकांनीं, शिद्दीप्रमाणें आमच्याशीं तह करावा ह्मणून चिमणाजी आपाशीं बोलणें लाविलें. परंतु चिमणाजी आपानें तें मान्य केलें नाहीं. त्याला तो किल्ला घेणें जरूरच होतें. कारण तो किल्ला पोर्तुगीज लोकांचे ताब्यांत राहिला असता तर, त्या वेळेपर्यंत पोर्तुगीज लोकांचीं जीं जीं ठाणीं मराठ्यांनीं घेतलीं होतीं तीं तीं त्यांना फार श्रम न पडतां परत घेतां आलीं असतीं. तेव्हां पावसाळा सुरू होण्याचे अगोदर तो किल्ला सर करण्याचा आपानें निश्चय केला. त्यानें किल्ल्यास मोर्चे लाविले. पोर्तुगीज लोकांनीं तोफांचा मारा सुरू केला, तेव्हां मराठ्यांचे पुष्कळ लोक प्राणास मुकले. मराठ्यांनींही तोफांचा मारा सुरू करून किल्ल्यास एक लहानसें भोंक पाडलें. परंतु त्यांतून त्यांना हल्ला करतां येईना. नंतर किल्ल्यास एक मोठें भगदाड पाडावें ह्मणून तटाखालीं सुरुंग लाविले. परंतु पोर्तुगीज लोकांनीं त्याच बेतानें आंतून सुरुंग पाडून ठेविले असल्यामुळें मराठ्यांचा तो प्रयत्न फुकट गेला. नंतर मराठ्यांनीं पुनः ५ सुरुंग तयार केले. ह्या पांचांपैकीं ३ सुरुंग अगदीं जवळ जवळ होते व दोन बरेच दूर होते. प्रथम त्या दोहोंपैकीं एकाला आग घातली, परंतु तो चांगलासा उडाला नाहीं. नंतर जवळ जवळ तीन होते त्यांना आग घातली; त्यांपैकीं दोन एकदम उडून किल्ल्यास मोठें भगदाड पडलें. त्याबरोबर मराठे त्या ठिकाणीं हल्ला करण्याकरतां मोठ्या आवेशानें धांवत गेले, व कांहीं तटावरही चढले. इतक्यांत राहिलेला तिसरा सुरुंग उडाला. त्यामुळें मराठ्यांचें फार

---

[1] हा शंकराजी नारायण सचिव नव्हे.

मोठें नुकसान झालें. तटावरील लोकांच्या चिंध्या चिंध्या होऊन ते वर हवेंत परांसारखे उडून खालीं पडले, खालील लोक तटाखालीं सांपडून चिरडून मेले, व जे कांहीं थोडेसे शिलक राहिले त्यांच्यावर पोर्तुगीज लोकांनीं गोळ्यांचा भडिमार करून त्यांनाहीं मृत्युपंथास लाविलें! नंतर पांचव्या सुरुंगास आग घातली. हा सुरुंग **सेंट स-बास्टियन** नांवाच्या बुरुजाखालीं खोदला होता, व तो **मल्हारराव हो-ळकराच्या** देखरेखीखालीं तयार केला होता. हा सुरुंग उडतांच अर्धा बुरूज एकदम खालीं ढांसळला. मराठ्यांनीं ह्या ठिकाणींही लगट केली. ह्या ठिकाणीं पोर्तुगीज लोकांचे ४० लोक पडले व शंभरांवर जखमी झाले. मराठ्यांचेही बरेच लोक मेले. पोर्तुगीज लोकांनीं तट पडला होता त्या ठिकाणीं मातीच्या टोपल्या भिंती-सारख्या रचून तेथें नवीन तोफा आणून मारा चालविला. हा वेढा एकंदर तीन महिनेपर्यंत पडला होता; व मराठ्यांनीं, बाहेरून आंतील लोकांस अन्नपाण्याचा जो पुरवठा होत असे तो बंद करून टाकला होता. त्यामुळें पोर्तुगीज लोकांना अन्नपाण्याचा तोटा पडून ते फार हैराण झाले. खुष्कीच्या बाजूनें **चिमणाजी आपा** व समुद्राच्या बाजूनें **मानाजी आंग्रे** ह्या दोघांनीं आंतील लोकांची सर्व नाकेबंदी करून टाकली होती. शेवटीं निरुपाय होऊन त्यांनीं **चिमणाजी आपाशीं** तहाचें बोलणें सुरू केलें, व तें तारीख १६ मे सन १७३९ रोजीं **चिमणाजी आपानें** कबूल केलें, आणि किल्ला आठ दिवसांत खाली करून द्यावा ह्मणून त्यांना सांगितलें. ह्या **वसईच्या** वेढ्यांत पोर्तुगीज लोकांचे सुमारें ८०० लोक पडले, व मराठ्यांचे पांच हजारांवर पडले असा **चिमणाजी आपाचा** स्वदस्तूरचा लेख आहे. **चिमणाजी आपानें** मोठ्या छातीनें **वसईचा** किल्ला सर केला, व अशा प्रकारचें वेढ्याचें काम मराठ्यांच्या हातून दुसरें झालेंच नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. परंतु ह्या एकंदर लढाईंत मराठ्यांचे फार लोक मेले. मराठी दस-

रांत मेलेल्या व जखमी झालेल्या लोकांची एकंदर संख्या १२ पासून १४ हजारपर्यंत दिलेली आहे.

---

१ असें **ग्रांटडफ** ह्मणतो. परंतु 'पेशव्यांच्या बखरीं'त ह्या वेढ्याच्या संबंधानें असें लिहिलें आहे कीं, तीन महिनेपर्यंत मोठ्या निकरानें लढूनही किल्ला हातीं येत नाहीं असें पाहून **चिमणाजी आपा** मोठा निराश झाला. त्यानें एके दिवशीं आपल्या सर्व सरदारांस जवळ बोलावून सांगितलें कीं, "किल्ला हस्तगत होत नाहीं याकरतां मजला तोफेचे तोंडीं बांधून माझें डोकें तरी किल्ल्यांत पाडावें, नाहीं तर किल्ला घ्यावा." त्या वेळीं सर्व सरदारांनीं "आपला निश्चय तोच आमचा नेम आहे, परंतु कांहीं तरी किल्ल्यांतील भेद समजल्याशिवाय तो हस्तगत होणें कठिण; याकरतां त्याची कांहीं तरी मसलत काढली पाहिजे" [असें ह्मटलें]. पुढें सर्वांनुमतें असें ठरलें कीं, **खंडूजी माणकर** यानें किल्ल्यांतील गुराख्याचें काम करावें, **अंजूरकर** म्हणून **पांचकळशे** सुतार सरदार होते त्यांनीं किल्ल्यांत सुतारकीचें काम करावें व **तुळभाजी मोरे** यांनीं कासार बनून किल्ल्यांत जावें. ह्याप्रमाणें वरील तिन्ही सरदारांनीं निरनिराळ्या वेषानें किल्ल्यांत जाऊन माहिती मिळविली. नंतर त्यांनीं आपल्या लष्करांतून किल्ल्याच्या तटापर्यंत एक सुरुंग तयार केला, व त्यांत दारूचे बुधले भरून त्यास बत्ती दिली. त्या वेळीं किल्ल्याचा एक बुरूज उडाला, परंतु तो पुनः जागच्या जागीं बसला. नंतर दुसरा सुरुंग तयार केला. या वेळची **आपाच्या** थोरपणाची अशी गोष्ट सांगतात कीं, "किल्ल्यांतील एका मुख्य फिरंगी सरदाराची बायको किल्ल्याच्या पश्चिमेच्या आंगच्या चोरदारानें बाहेर पडून मचव्यांत बसून **गोव्यास** जाण्याकरतां निघाली. परंतु तें गलबत मराठ्यांनीं पकडून तिला **चिमणाजी आपाकडे** आणली. ती फार सुस्वरूप होती. **आपांनीं** तिला पाहातांच, "ही कशाला धरून आणली?" असें बोलून तिला लुगडेंचोळी देऊन परत किल्ल्यांत पोहोंचती केली. ती परत गेल्यावर, "**चिमणाजी आपा** मोठा पुण्यवान् आहे, या लढाईत तुह्मांस यश येणें नाहीं, असें तिनें आपल्या नवऱ्यास सांगितलें." पुढें **चिमणाजी आपाशीं** कांहीं अटी ठरवून फिरंगी तो किल्ला सोडून गेले. वरील हकीकत **ग्रांटडफ** देत नाहीं. परंतु **फिरंग्याची** बायको हातीं लागली असतां **आपांनीं** तिचा गौरव करून परत किल्ल्यांत पाठविली ही गोष्ट **वसईचे** किरिस्तांव लोक अद्याप मोठ्या आवेशानें व कृतज्ञतापूर्वक सांगतात. असो. **वसईस सिल्व्हेरा** डी **मिनेझिस** हा फिरंग्यांचा सरदार होता; पण तो एका हल्ल्यांत पडल्यावर **क्यापटन** डी **सौझाफेरीरा** हा त्यांचा मुख्य झाला, व त्यानेंच नाइलाजास्तव तो किल्ला खालीं करून दिला.

बसईचा किल्ला सर होतांच चिमणाजी आपानें शिंदे व होळकर यांस तावडतोब बाजीरावाच्या मदतीस पाठवून दिले. परंतु इतक्यांत नादिरशाहा परत इराण देशास निघून गेला अशी बातमी येऊन पोहोंचली. त्यानें जातांना महंमदशाहाबरोबर तह केला. त्यांत सिंधुनदाच्या पलीकडील सर्व मुलूख त्यानें घेतला. त्यानें मोंगल घराण्यांतील एका शाहाजादीशीं आपल्या मुलाचें लग्न लाविलें. शेवटीं त्यानें महंमदशाहास सिंहासनावर बसविलें; त्याच्या मुकुटाचे सर्व अलंकार त्यानें आपल्या हातानें लेवविले; व सर्व उमराव लोकांस त्याची आज्ञा मुकाट्यानें मान्य करण्यास आज्ञा केली; शिवाय त्यानें सर्व रजपूत राजे, शाहू महाराज व बाजीराव यांस अशीं पत्रें पाठविलीं कीं, " आजपासून मी महंमदशाहास आपला बंधु असें समजतों, याकरितां सर्वांनीं त्याच्या आज्ञेंत चाललें पाहिजे. कोणी या पत्राची अवज्ञा करील तर मी पुनः हिंदुस्थानांत येऊन त्याचें चांगलें पारिपत्य करीन. "

नादिरशाहा ५८ दिवस दिल्लींत होता. त्यानें जातांना आठ नऊ कोट रुपये, शिवाय कोट्यावधि रुपयांचें सोनें व रुपें, व नानाप्रकारचें उंची सामान व कापड इतकें नेलें. याशिवाय त्यानें जें जवाहीर नेलें त्याच्या किमतीस तर पारच नाहीं ! तसेंच त्यानें पुष्कळ हत्ती, घोडे व उंट नेले; आणि शेंकडों हुशार कारागीर लोक तो आपल्या देशास घेऊन गेला.[1]

१ स्कॉट याच्या ग्रंथांत ज्या रकमा लिहिल्या आहेत त्या एकंदर ८–९ कोट रुपयेपर्यंत भरतात. नादिरनाम्यांत २५ कोटी लिहिलें आहे. फ्रेझर ३० कोटी म्हणतो; हानवे ३७५०००००० पौंड म्हणजे जवळ जवळ ३७ कोट रु० ह्मणतो. ही स्वारी होण्याचीं जीं कारणें सांगतात त्यांचा डौक्त हिंदुस्थानाच्या इतिहासांत संग्रह केला आहे. त्यांवरून असें दिसतें कीं, नादिरशाहास निजामउल्मुल्क व सादतखान ह्या दोघांनीं बोलाविलें, व कर्नाळच्या लढाईत जी माघार आली ती त्यांच्याच मसलतीमुळें आली. याप्रमाणें त्यांनीं आपल्या धन्याचा विश्वासघात केला ह्मणून नादिरशाहा त्यांच्या दाढ्यांवर थुंकला, व त्यानें त्यांस आपल्या दरबारांतून

**ना**दिरशाहा निघून गेल्यानंतर **दिल्लीचे** लोक जसे कांहीं बेशुद्ध होऊन राहिले. त्यांचा सर्वस्वापहार झाला होता. पुष्कळांचीं घरें मोडून गेलीं होतीं, व शहरचा बराच भाग ओसाड पडला होता. रस्त्यांत पुरल्याशिवाय पुष्कळ प्रेतें कुजत पडल्यामुळें सर्व शहरभर दुर्गंधी सुटली होती. नंतर पुष्कळ दिवसांनीं **दिल्लीचें** दरबार स्वप्नावस्थेंतून जागृत झालें. जसा राजधानींत सर्व वस्तूंचा नाश झाला होता तसेंच सर्व राज्यांतील सैन्याचेंही वाटोळें झालें होतें. खजिना रिता पडला होता, व राज्याचा वसूल अगदीं नाहींसा झाला होता. अद्याप **दिल्लीच्या** दरबारास मराठ्यांची भीति होतीच; तसेंच जे प्रांत मराठ्यांच्या पुंडाईनें ओसाड पडले नव्हते ते **ना**दिरशाहाच्या फौजेनें उद्ध्वस्त करून टाकले होते. इतक्या थराला गोष्टी आल्या असून दरबारी लोकांच्या आंतल्या आंत दुफळ्या होत्या त्या कायमच होत्या. अशा प्रकारची दिल्लीच्या राज्याची शोचनीय स्थिति झाल्यामुळें तें आयासाशिवाय मराठ्यांच्या तोंडांत पडलें असतें. परंतु त्याच सुमारास कांहीं विशेष गोष्टी घडून आल्यामुळें थोडा वेळपावेतों **दिल्लीच्या** राज्यावर तो प्रसंग आला नाहीं.

**ना**दिरशाहा **दिल्लीहून** निघून गेल्यानंतर **बा**जीरावानें, आह्मीं आपले अंकित आहों अशा अर्थाचें एक पत्र बादशाहाकडे पाठविलें व मामुल वहिवाटीप्रमाणें त्या पत्रासोबत १०१ मोहरा नजर पाठविल्या. बादशाहानें त्या पत्राचा मोठ्या आदरानें स्वीकार करून त्याला उलट खलिता पाठविला. त्यांतील सारांश असा:—

---

हांकून दिलें. हें त्यांस त्यांच्या विश्वासघाताचें चांगलेंच फळ मिळालें. याप्रमाणें त्या उभयतांची अप्रतिष्ठा झाल्यामुळें त्यांनीं प्राणत्याग करण्याचा निश्चय केला. परंतु ते एकमेकांविषयीं नेहमीं स्पर्धा करीत असत यामुळें कोणाचा कोणास भरंवसा येईना. तेव्हां ठरावाप्रमाणें वर्तणूक झाल्याची चौकशी करण्यास परस्परांनीं परस्परांकडे हेर पाठविले. ह्या दोघांत **निजामउल्मुल्क** ज्यास्त कपटी होता. त्यानें कांहीं साधें पिण्याचें औषध घेऊन मृतवत् पडल्याचें नुसतें ढोंग केलें. पण **सादतखानाला** हें **निजामउल्मुल्काचें** कपट न कळून त्यानें खरोखर विष खाऊन लागलाच प्राण दिला ! —एल्फिन्स्टन.

" आपलें पत्र पोहोंचून बहुत संतोष झाला; आपण आमच्याशीं सदोदित स्नेहभावानें असावें अशी या दरबारची फार इच्छा आहे. आपले पूर्वीपासून चालत आलेले मानपान व जहागिरी यांस इकडून किमपि व्यत्यय येणार नाहीं. आपला आमच्याशीं जो संबंध आहे त्यांत मात्र अंतर आणूं नये." ह्या खलित्याबरोबर बाजीरावास जो नजराणा आला तो.

( साडेतीन वस्त्रें. )

१ पागोटें ( यास पागोटें किंवा मंदीलही ह्मणतात. )
१ झगा ( किनखाबी. )
१ पायजमा ( किनखाबी. )
·॥· दुपेटा ( भरजरीचा. )
३॥.

( अलंकार. )

१ मोत्यांचा तुरा.
१ शिरपेंच रत्नजडित.
१ मोत्यांची कंठी.

( हत्यारें. )

१ उत्कृष्ट प्रतीची तरवार.
१ घोडा.
१ हत्ती.

याचें नांव गजांतलक्ष्मी! शनवारचे वाड्यापुढें शेंकडों हत्ती झुलत होते, पागेंत हजारों घोडे होते, जामदारखान्यांत हवा तितका जरतार व किनखाब होता, शिलेखान्यांत लाखों तरवारी होत्या; परंतु बादशाहाकडून बाजीरावास जो नजराणा आला तो पाहून त्याला किती आनंद झाला असेल त्याची कल्पना वाचकांनींच करावी!

हें सर्व झालें तें ठीकच झालें. परंतु मागें निजामानें कबूल केल्याप्रमाणें, जरी माळव्याच्या सुभेदारीवर कोणाची नेमणूक झाली नाहीं तरी, बादशाहाकडून माळव्याची सनद बाजीरावास आली

नाहीं. तेव्हां ह्या गोष्टींत **नि**जामउल्मुल्काचें कांहीं तरी कपट असलें पाहिजे अशी **बा**जीरावाची खात्री झाली. परंतु **नि**जामउल्मुल्काचें सैन्य अद्याप **उ**त्तरहिंदुस्थानांतच होतें, व **बा**जीरावाचे **शिं**दे, **हो**ळकर आदिकरून शूर सरदार आपापल्या सैन्यासह अजून त्यास येऊन मिळाले नव्हते, ह्मणून त्या वेळीं तो स्वस्थ बसला, व **मा**ळवा प्रांताचा बंदोबस्त करीत तेथेंच राहिला. त्यानें **चं**बळानदीचे पश्चिमेस **को**ट्यापासून **अ**लाहाबादेपर्यंतच्या सर्व रजपूत राजांशीं सख्य केलें. तो **छ**त्रसाल राजाचे मुलगे **ज**गद्देव व **ह**रदेव ह्यांच्याशीं फार प्रेमानें वागत असे. त्यांच्याशीं त्यानें, मुसलमानांपासून प्रसंग पडेल त्या वेळीं रक्षण करण्याकरितां एकमेकांनीं एकमेकांस मदत करावी, असा गुप्त तह केला. ह्या दोन राजपुत्रांनीं, **य**मुना व **चं**बळा यांच्या पलीकडे **बा**जीराव ज्या ज्या स्वाऱ्या करील त्या त्या स्वाऱ्यांत त्याला मदत देण्याचें कबूल केलें, व त्याच वेळीं दुसरें असें ठरलें कीं, **बु**धावर संस्थानाखेरीज बाकी मुलुखांतून जी लूट किंवा जो दुसरा कांहीं फायदा होईल तो ज्यानें त्यानें ज्याच्या त्याच्या सैन्याच्या मानानें वांटून घ्यावा. त्यांनीं **बा**जीरावास आणखी असें वचन दिलें कीं, "जर तुह्मी कदाचित् एकादे वेळीं **द**क्षिणेंत लढाईला गुंतलां, व त्या वेळांत एकादा शत्रु **बुं**देलखंडावर चाल करून आला, तर आह्मी दोन महिनेपर्यंत **बुं**देलखंडाचें रक्षण करूं. दोन महिन्यांनंतर तुह्मांस आमचे मदतीस येतां आलें नाहीं तर आह्मी तेवढ्या वेळापुरतें आह्मांस योग्य वाटेल त्याला मदतीस बोलावूं, व तुह्मी आह्मांस येऊन मिळाल्यावर त्याच्या बरोबरचा संबंध तोडून टाकूं." ह्या वेळीं **झां**शी परगणा शिवाय करून बाकी जो भाग **छ**त्रसाल राजानें पूर्वींच **बा**जीरावास दिला होता त्याचें उत्पन्न सालीना ९ लाख रुपये **बा**जीरावास येत असे.

वर सांगितल्याप्रमाणें **उ**त्तरहिंदुस्थानांतील रजपूत राजे व त्यांतून विशेषतः **बुं**देलखंडचे राजे यांच्याशीं सख्य करण्यांत **पे**शव्याचा मुख्य हेतु **नि**जामउल्मुल्काबरोबर पुनः लढाई सुरू करण्याचा होता.

त्याच्यावर बाजीरावानें थोड्याच काळापूर्वी मिळविलेला जय, तसेंच त्याचें दिल्लीकडे राहणें ही गोष्ट, त्याचें उतारवय, व त्याच्या मुलांत गादीविषयीं उत्पन्न होणारे भावी तंटे, ह्या एकंदर गोष्टींवरून दक्षिणेंतून त्याची सत्ता अजीबाद काढून टाकण्याला ही संधि बरी आहे असें पेशव्यास वाटलें. परंतु ह्या महत्कृत्यास ज्या तयारीनें सुरुवात करणें जरूर होतें, तशा प्रकारची ह्या वेळीं पेशव्याची तयारी नव्हती. तेव्हां कर्नाटकांत स्वारी करून तिकडून बरीच लूट आणतां येईल अशा उद्देशानें बाजीरावानें तिकडे स्वारी करण्याचा बेत केला; शिवाय अर्काटचा नवाब सफतर्अल्ली याचा दिवाण मीर असद यानेंही त्याला येण्याविषयीं गुप्त रीतीनें लिहिलें होतें. परंतु ह्या वेळीं रघूजी भोंसले व दमाजी गायकवाड ह्यांचीं पेशव्याच्या विरुद्ध कारस्थानें मोठ्या जारीनें सुरू होतीं. तेव्हां आपण इतक्या दूरच्या पल्ल्यावर गेलों तर त्यांच्या कृत्यांवर नजर ठेवण्यास आपणास जड जाईल ह्मणून त्यानें कर्नाटकावर स्वारी करण्याचा आपला बेत रहित केला.

दरबारांत ब्राह्मणांचें वर्चस्व पाहून रघूजी भोंसला त्यांचा फार द्वेष करीत असे. महाराजांस मुलगा होण्याचा आतां संभव नव्हता. तेव्हां रघूजीस असें वाटूं लागलें कीं, कदाचित् महाराज आपणास दत्तक घेतील, व तसें झालें ह्मणजे सर्व सत्ता आपल्या हातीं येईल. कदाचित् फत्तेसिंग भोंसल्यास महाराज दत्तक घेतील अशी एक शंका होती, परंतु तो अगदीं निर्बुद्ध व भेंकड होता यामुळें त्याला महाराज दत्तक घेतील असें रघूजीस वाटेना.

परंतु वर सांगितलेली रघूजीची महत्वाकांक्षा सिद्धीस जाण्याला फार अडचणी होत्या. जरी दरबारांत पेशव्याच्या विरुद्ध बरीच मंडळी होती तरी महाराजांच्या जवळ असणारी सर्व मंडळी पेशव्याच्या पक्षाचीच असे, व महाराजांचाही विशेष भरंवसा याच मंडळीवर असे. तेव्हां ब्राह्मणांच्या मध्यस्थीशिवाय रघूजीला कांहीइतकीही गोष्ट करतां येत नसे.

**र**घूजी **भों**सले व **बा**जीराव यांचें वैमनस्य होतें व ते दोघे एकमेकांस पाण्यांत पहात असत, तरी पुढें त्या दोघांची गांठ पडली तेव्हां **बा**जीरावानें मोठ्या युक्तीनें आपले सर्व बेत त्याला कळविले व **क**र्नाटकांतील लुटीची त्याला आशा दाखवून तिकडे स्वारी करण्याविषयीं त्याचें मन वळविलें.[1]

**र**घूजी **क**र्नाटकांत निघून गेल्यावर **नि**जामउल्मुल्क अजून **उ**त्तरहिंदुस्थानांतून परत आला नाहीं अशी संधि पाहून **बा**जीरावानें **द**क्षिणेंत लढाई सुरू केली. ह्या वेळीं **नि**जामउल्मुल्काचा दुसरा मुलगा **ना**सिरजंग हा १० हजार फौजेनिशीं **औ**रंगाबादेजवळ तळ देऊन बसला होता. त्याला **बा**जीरावानें प्रथमतः वेढा घातला. परंतु थोडक्याच दिवसांत **ना**सिरजंगाच्या मदतीस एक फार मोठें सैन्य व

---

१ ह्या वेळीं **शा**हू **म**हाराजांनीं **र**घूजीस पत्र पाठविलें त्याचा सारांश एणेंप्रमाणें:—

" राजमान्य राजेश्री **र**घूजी **भों**सले **से**नासाहेब सुभे यांस.—**तुं**गभद्रेच्या दक्षिणेकडील **क**र्नाटक प्रांताची व्यवस्था खालीं लिहिल्याप्रमाणें करण्यांत यावी.

१ **त्रि**चनापल्ली, २ **तं**जावर, ३ **अ**र्काट, ( **जिं**जीसुद्धां ), ४ **श्री**रंगपट्टण, ५ **से**रा, ६ **अ**डोणी, ७ **क**र्नूल, ८ **क**डपा आणि ९ **फू**टमहाल. ह्या एकंदर प्रांतांचा जो वसूल येईल त्यांत **स**रदेशमुखी, **रा**जबाबती, व **सा**होत्रा हे हक्क वजा करून बाकी जो ऐन **मो**कासा राहील त्यापैकीं निंमे **कु**साजी **ये**साजी **भों**सले ( हा कोण असावा तें कांहीं समजत नाहीं ) यांस द्यावा व बाकी निंमे भाग गादीचा आहे असें समजावें.

अशा रीतीनें पहिल्या ४ प्रांतांचें सर्व उत्पन्न व बाकी राहिलेल्या प्रांतांची **स**रदेशमुखी, **बा**बती व अर्धा **मो**कासा ह्यांचें जें उत्पन्न येईल तें, हीं दोन्हीं एकत्र करून त्यांपैकीं निंमे रकम तुम्ही आपले स्वारांचे खर्चाबाबद घ्यावी, व बाकीची निंमे रकम मुख्य प्रधान यांचे मार्फत सरकारी पोत्यास पाठवून द्यावी, तुम्ही व ते दोघांनीं एक विचारें सर्व किल्ले प्रांत सर करणें. किल्यास वेढा देणें त्यांत घोडेस्वार तुमचे असावे व पायदळ प्रधान पंत यांचें असावें. ह्या वर्षीं तुम्ही ७ लाख रुपये सरकारांत पाठवून द्यावे. लिहिल्याप्रमाणें कार्य करून यावें. जास्त लिहिण्याची जरूर नाहीं. सर्व भरंवसा तुमचेवर आहे. कळावें."
—**ग्रां**टडफ.

तोफखाना आला. ही मदत **ना**सिरजंगास येऊन मिळतांच त्यानें **बा**जीरावावर हल्ला करून त्याचा पराभव केला, व मराठ्यांनीं केलेल्या अडथळ्यास दाद न देतां तो **गो**दावरी उतरून अलीकडे आला. नंतर वाटेनें गांवचे गांव जाळीत पोळीत तो **अ**हमदनगराकडे यावयास निघाला. इतक्यांत **कों**कणांतून **चि**मणाजी **आ**पा आपल्या सैन्यासह **बा**जीरावास येऊन मिळाला. नंतर **बा**जीरावानें **ना**सिरजंगावर वरचेवर हल्ले करून त्याला अगदीं भंडावून सोडलें व परत **गो**दावरीचे पार हांकून दिलें. पुढें कांहीं महिने ही लढाई चालली होती. परंतु आपणास ह्या लढाईपासून विशेष फायदा होणार नाहीं असें **बा**जीरावास वाटल्यावरून त्यानें **ना**सिरजंगाशीं **मुं**गीपैठण येथें तह केला. त्यांत असें ठरलें कीं, "यापुढें कोणीं कोणाचे मुलखास उपद्रव देऊं नये." ह्या वेळीं **बा**जीरावास **न**र्मदेच्या कांठचे **हिं**दिआ व **कि**रकोन हे प्रांत मिळाले.

मराठ्यांची सारी फौज **कों**कणांतून गेली हें पाहून **सं**भाजी **आं**ग्र्यानें पुनः **कों**कणांत मोठी गडबड चालविली. त्यानें **मा**नाजीवर स्वारी करून **चौ**ल, **अ**लिबाग, **सा**गरगड, **त**ळें वगैरे किल्ले घेऊन **कु**लाब्याच्या किल्ल्यास वेढा दिला व किल्ल्यांतील शिबंदीचें गोडें पाणी बंद केलें. तेव्हां **मा**नाजीनें, **बाळाजी बाजीराव** त्या वेळीं **सा**तान्यास **शा**हू **म**हाराजांजवळ होता त्याला आपलें रक्षण करावें ह्मणून पत्र पाठविलें. पत्र पावतांच **बाळाजी बाजीरावा**नें **म**हाराजांच्या आज्ञेवरून **वा**सुदेवराव **जो**शी, **वि**ठ्ठल **शि**वदेव व **अं**ताजी **ना**रायण यांच्या बरोबर ९०० स्वार देऊन त्यांस तावडतोब **कों**कणांत रवाना केलें; व तें पत्र जासुदाबरोबर **चि**मणाजी **आ**पाकडे पाठवून दिलें. तें पत्र **आ**पास **पा**रनेर येथें मिळालें. नंतर मोठमोठ्या मजला करून तो **घो**डनदीस येऊन पोहोंचला व तेथून त्यानें **मा**नाजीस आश्वासनाचें पत्र लिहून रवाना केलें. नंतर दुसऱ्या दिवशीं वीस कोसांची मजल करून तो **लो**हगांवास आला व तेथून त्यानें **मा**नाजीस कुमक क-

१, 'पत्रें, यादी वगैरे' (का० सं० ).

रावी ह्मणून **मुं**बईच्या **इं**ग्रज लोकांस पत्र पाठविलें, आणि रातोरात **ना**नासाहेब ( **बा**ळाजी **बा**जीराव ) यास भेटीस बोलावून त्याच्या बरोबर फौज देऊन त्याला **कों**कणांत रवाना केलें. **ना**नासाहेब तेथून निघाला तो पांचव्या दिवशीं **कु**लाब्यास जाऊन पोहोंचला. नंतर **चि**मणाजी **आ**पाही तीन दिवस **पु**ण्यांत राहून **कों**कणांत निघून गेला. **ना**नासाहेब **कु**लाब्यास जाऊन पोहोंचला त्याच दिवशीं **सं**भाजी **आं**ग्र्याची एक टोळी **हि**राकोटचे आश्रयानें होती तिच्यावर त्यानें हल्ला करून तीपैकीं पंचवीस तीस लोक ठार मारले व **तु**ळाजीस[1] कैद केलें. **इं**ग्लिशांचें आरमार **ना**नासाहेब येण्यापूर्वीच **कु**लाब्यास येऊन पोहोंचलें व त्या लोकांनीं **सं**भाजीचें आरमार **सु**वर्णदुर्गाकडे घालवून दिलें, आणि पूर्वी **सं**भाजीनें आपली छावणी समुद्रकिनाऱ्यावर दिली होती तेथून त्यास उठवून लाविलें. **सु**वर्णदुर्गास परत जाण्यास मार्ग मिळावा ह्मणून **सं**भाजीनें **इं**ग्लिशांशीं सामोपचाराचें बोलणें लाविलें, परंतु त्यांनीं तें मान्य केलें नाहीं. त्या वेळीं **सं**भाजी **सु**वर्णदुर्गास कसा परत गेला याविषयीं मराठी दप्तरांत कांहींच दाखला सांपडत नाहीं. **चि**मणाजी **आ**पा **ना**नासाहेबास येऊन मिळाल्यावर ती लढाई मोठ्या जारीनें पुढें चालली.

**ना**सिरजंगाबरोबर चालविलेल्या युद्धाचा शेवट आपल्या मनाप्रमाणें झाला नाहीं, असें पाहून **बा**जीराव फार खिन्न झाला. शिवाय त्याला कर्जाविषयीं सावकार लोकांचे तगादे लागल्यामुळें तिकडूनही तो त्रासून गेला होता. खालीं दिलेल्या पत्रांतील मजकूर वाचला

---

१ हा **का**न्होजीच्या दासीपुत्रांपैकीं एक असून तो **सं**भाजीच्या पक्षाकडला होता. हा **मा**नाजीचा सख्खा वडील भाऊ.

२ हें पत्र त्यानें **धा**वडशीच्या स्वामींस लिहिलेलें आहे; त्यांत तो असें ह्मणतो कीं, "मी संकटें, कर्ज व निराशा यांत गुंतून गेलों आहें, आणि विष पिण्यास तयार असणारा मनुष्य जसा असतो तसा झालों आहें. राजाजवळ माझे शत्रु आहेत, व या वेळीं मी **सा**ताऱ्यास गेलों तर ते माझ्या उरावर पाय ठेवितील. जर मला मरण येईल तर मी **ई**श्वराचा फार आभारी होईन."

ह्मणजे तो किती त्रासला होता हें सहज ध्यानांत येईल. नंतर **सा**तारा किंवा **पु**णें ह्यांपैकीं कोणत्याच ठिकाणीं न जातां त्यानें थेट **उ**त्तरहिंदुस्थानाची वाट धरली. त्याच्या मनांत **उ**त्तरहिंदुस्थानांत आणखी मुल्ख जिंकून घ्यावा असें होतें. त्या उद्देशानें तो **न**र्मदेपर्यंत येऊन पोहोंचला. परंतु त्यानें योजिलेले मोठमोठे बेत मनांतल्या मनांत राहून ह्या ठिकाणीं त्याचें अवतारचरित्र संपावें असा ईश्वरी संकेत होता! तेथें त्याच्या प्रकृतीस एकाएकीं विकृति होऊन प्रतिकृति करण्याचा कांहींच मार्ग उरला नाहीं. त्याला ज्वराची भावना झाली. पुढें तो ज्वर दिवसेंदिवस जास्त वाढत जाऊन अन्नद्वेष झाला. ह्या दुखण्यांतून आपण पार पडत नाहीं असें त्याचें त्यास वाटूं लागलें. आपला अंतकाळ समीप आला असें पाहून त्या शूर पुरुषानें आपले **शिं**दे, **हो**ळकर वगैरे जिवाचे सरदार जवळ बोलाविले, व मुसलमानांचें पारिपत्य करण्याविषयीं त्यांस उपदेश केला, आणि निरवानिरवीच्या ज्या दुसऱ्या कांहीं गोष्टी सांगावयाच्या होत्या त्याही त्यानें त्यांजपाशीं सांगून ठेविल्या. पुढें नेहमींप्रमाणें बोलत चालत असतां वैशाख शुद्ध १३ शके १६६२ ह्मणजे तारीख २८ माहे एप्रिल सन १७४० ह्या दिवशीं सकाळीं अकरा वाजतां त्यास **न**र्मदेच्या कांठीं मुक्काम **क**[1]लमडें परगणे **रा**[1]वेर या गांवीं देवाज्ञा झाली[2].

**बा**जीराव मरण पावला त्या वेळीं त्याचें वय ४९ वर्षांचें होतें. ह्या वयाच्या मानानें तो आपल्या ज्वानींतच मेला असें ह्मटलें तरी चालेल. हा अद्वितीय विक्रमशाली वीर अवचित दुष्ट काळाच्या जबड्यांत सांपडला तेव्हां त्याच्या अकालिक व आकस्मिक मृत्यूमुळें बहुतेक **हिं**दुस्तान देश व विशेषतः **म**हाराष्ट्र देश दुःखसागरांत बुडून गेला. **शिं**दे, **हो**ळकर आदिकरून महाप्रतापी योद्धे, जे रणांगणांत प्रत्यक्ष काळही येऊन उभा राहिला तरी त्याचा समाचार घ्यावयास

१ हीं दोन्ही स्थानें खानदेशांत **न**र्मदातटाकीं आहेत. २ **बा**जीरावास दहन केलें त्या ठिकाणीं तुळशीवृंदावन आहे असें कळतें.—पेशव्यांची बखर.

समर्थ होते, तेही धाय मोकलून रडूं लागले! असा जिकडेतिकडे हाहाकार झाला! फार काय सांगावें? प्रत्यक्ष **नि**जामउल्मुल्क ह्मणजे त्याचा केवळ हाडवैरी, परंतु त्याला हें वर्तमान कळलें तेव्हां तो ह्मातारा देखील ढळढळां रडूं लागला! तो ह्मणाला, "अस्तगूफेरुल्ला! सुनिये साहेब, इस् मुल्खमें एक बाजी, और सब् पाजी. फिलहाल मेरी छान्नवे बरसकी उमर है, इस्के दरमियान् बाजीरावके मुवाफिक् अहलेअदल, रहेमदिल्, और जवामर्द ऐसा कोइ सरदार मेरे दुश्मनोमें नजर नहिं आया. बाद उस्के कजाके, अगरचे: तुमने मराठे लोगोंको पिकस्त दिया, तो तुमने कुछ मर्दुमी की ऐसा नहिं."

ही दुष्ट वार्ता **सा**ताऱ्यास **शा**हू **म**हाराजांस कळतांच घटकाभर ते आपलें देहभान विसरून गेले! तो **बा**जीराव नाहीं मेला तर साक्षात् मृत्यूनें हिसडा देऊन आज माझ्या राज्यरूपी इमारतीचा आधारस्तंभ जमीनदोस्त करून टाकला असें त्यांस वाटूं लागलें! **चि**मणाजी **आ**पा व **ना**नासाहेब हे त्या वेळीं **कों**कणांतच होते. एके दिवशीं हे चुलतेपुतणे **रे**वदंडा घेण्याची मसलत करीत बसले असतां ही आकाशची कुऱ्हाड धाडकर त्यांच्या मस्तकावर येऊन पडली! मग काय विचारतां! **आ**पा व **ना**ना तेथल्या तेथें मूर्च्छा येऊन पडले! **पु**ण्यांत शनवारचे वाड्यांत जो आकांत झाला तो तर सांगतां येत नाहीं! त्याची कल्पना करण्याचें वाचकांवर सोंपवून, अजून पुढें बऱ्याच गोष्टी सांगावयाच्या आहेत त्यांना आरंभ करणें जरूर आहे! असो. पुढें **आ**पानें **शं**कराजी **ना**रायण यास **कों**कणची सर्व व्यवस्था सांगितली व **खं**डोजी **मा**णकर यास सैन्यावर मुख्य नेमिलें, आणि **ना**नासाहेबास बरोबर घेऊन तो **पु**ण्यास निघून आला. पुढें लवकरच पेशवाईचीं वस्त्रें **म**हाराजांकडून **बा**ळाजीच्या नांवें करून घ्यावीं ह्मणून त्यास घेऊन तो **सा**ताऱ्यास निघून गेला.

आतां पुढील प्रकरणास आरंभ करण्यापूर्वी **बा**जीरावाविषयीं शेवटचे दोन शब्द लिहिणें जरूर आहे. **बा**जीराव सन १७२०

---

१ **बा**पटकृत 'पहिले **बा**जीराव **पे**शवे यांचें चरित्र.'

त मुख्य प्रधान झाला. तेव्हांपासून मरे तोंपर्यंत त्याची २० वर्षांची कारकीर्द स्वाऱ्या करण्यांत गेली. परमेश्वर त्याला आणखी कांहीं वर्षें ज्यास्त आयुष्य देता तर त्याच्या हातून आणखी फार मोठमोठीं कार्यें झालीं असतीं. त्याचा बहुतेक काळ लढायांत गेल्यामुळें राज्याची अंतस्थ व्यवस्था सुधारण्यास त्याला फुरसतच मिळाली नाहीं. त्याचा स्वभाव फार दयाळू होता, व ह्या स्वभावामुळें त्याच्या हातून जशीं चांगलीं कृत्यें झालीं तसे कांहीं प्रमादही घडले. निजामउल्मुल्कासारखा प्रबळ शत्रु हातांत सांपडला असतां त्याला त्यानें सोडून दिलें हा त्याच्या हातून प्रमाद घडला असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. ह्यामुळें मराठ्यांच्या राज्यविस्ताराला बराच अडथळा आला. तो आपल्या शत्रूंचें पुरें पारिपत्य करता तर त्याला वारंवार त्यांच्यापासून त्रास सोसावा लागला नसता. कारण तसें झालें असतें ह्मणजे त्याला आपला वेळ दुसरीं मोठमोठीं कामें करण्याकडे लावतां आला असता. शिवाय त्याला त्याच्या स्वतःच्याही राज्यांत बरेच शत्रु होते. प्रतिनिधि, रघूजी भोंसले, दाभाडे, गायकवाड वगैरे मंडळी नेहमीं त्याच्या वाईटावर बसली होती. ह्या मंडळीचा जमाव फार मोठा असल्यामुळें त्यांचें प्राबल्य मोडण्याचा त्यानें वक्तशीर प्रयत्न केला असता तरी त्यांत त्याला फारसें यश आलें नसतें. ही मंडळी कदाचित् बखेडे करील ह्मणून त्याला वारंवार साताऱ्यास यावें लागत असे व त्यांच्या हालचालीवर नजर ठेवावी लागत असे. वर सांगितलेल्या कारणांमुळेंही त्याचा पुष्कळ काळ फुकट गेला. त्याच्या कारकीर्दींत कोल्हापूर व सातारा हीं राज्यें एकमेकांपासून पृथक् झालीं हेंही चांगलें झालें नाहीं. परंतु त्या गोष्टीस बाजीरावाचा इलाज नव्हता. कोल्हापुरचें राज्य पृथक् झाल्यामुळें अर्थात् तेथल्या राजाला साताऱ्याच्या गादीविषयीं कळकळ राहिली नाहीं. तेंच साताऱ्याच्या गादीच्या अमलाखालीं असतें तर त्यापासून मराठ्यांना फार मोठा फायदा झाला असता, व कर्नाटकांत शाहू महाराजांच्या

मुलखाला जो वारंवार उपद्रव होत असे तोही झाला नसता. **बा**जीरावानें मराठ्यांच्या आपसांतील दुफळ्या मोडण्याचा यत्न केला असता, व अशा रीतीनें सर्व मराठे एकचित्त होऊन त्यांनीं द्रव्यद्वारा, शरीरद्वारा व बुद्धिद्वारा **बा**जीरावास साह्य केलें असतें, तर सर्व **हिं**दुस्थानांत मराठ्यांचें एकछत्री राज्य करण्याला त्या पराक्रमी योद्ध्याला फार अवकाश लागला नसता.

**शि**वाजीच्या मागें नांव घेण्यासारखा पराक्रमी वीर एक **बा**जीरावच झाला. असा स्वदेशाचें ब्रीद बाळगणारा, इभ्रतदार, शहाणा, शूर नरवीर त्याच्या मागून कोणीही निपजला नाहीं. तो अल्पवयस्क वारल्यामुळें त्याचा मुख्य हेतु तडीस गेला नाहीं; तथापि त्याचें नांव **हिं**दुस्थानाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सारखें गाजत होतें; त्यानें सर्व **हिं**दुस्थानभर आपल्या नांवाचा सारखा दरारा बसविला होता; तो ऐश्वर्याच्या अगदीं शिखरावर जाऊन बसला होता; आणि त्यानें हिंदूंची बाजी राखून आपणास गाजी ह्मणवून घेतलें. अवघ्या २० वर्षांच्या कारकीर्दींत तो सर्व लोकांच्या जिवाला चटका लावून गेला! एकंदरीनें पुढील ओंवींत जसें वागण्याविषयीं साधूंचा बोध आहे, तसेंच त्याच्या हातून घडलें यांत संशय नाहीं.

काया बहुत कष्टवावी । उत्कट कीर्ति उरवावी ॥
चटक लावुनि सोडावी । कांहीं एक ॥ १ ॥

**रा**मदास.

---

# भाग ९.

## बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब.

## इ० स० १७४० पासून १७४९ पर्यंत.

बाळाजी बाजीराव यास पेशवाईचा अधिकार मिळतो.—दरबार व शाहू महाराजांचा त्यास उपदेश.—बाबूजी नाईक हा कर्जाबद्दल पेशव्यास तगादा लावतो व महादाजीपंत पुरंदरे त्यास कर्जमुक्त करतो.—दिल्लीच्या राज्याची स्थिति.—जाट लोक.—अलिवर्दीखान बंगाल प्रांताचा नबाब होतो. रोहिले लोक.—कर्नाटकांतील स्वतंत्र संस्थानें.—तंजावरची हकीकत.—इंग्लिश व फ्रेंच.—पोर्तुगीज लोकांची निकृष्टावस्था.—रघूजीनें केलेल्या कर्नाटकच्या स्वारीची हकीकत.—बाळाजी बाजीराव दिल्लीच्या बादशाहाजवळ माळव्याच्या हक्कासंबंधानें मागणी करतो व त्या उभयतांमध्यें पुढें जो करार झाला त्याचीं कलमें.—पोर्तुगीज लोकांबरोबरची लढाई व चिमणाजी आपाचा मृत्यु.—बाळाजी बाजीरावाची हुशारी पाहून शाहू महाराज त्यास कोंकणांत जिंकलेल्या मुलुखाची जहागीर व दुसरे कांहीं हक्क देतात.—रघूजीचा दिवाण भास्करपंत हा बंगाल प्रांतावर स्वारी करतो.—पेशवा प्रयागावर स्वारी करण्याचा घाट घालतो परंतु तो साधत नाहीं.—तो धारच्या पवाराशीं सख्य करतो.—बादशाहा बाळाजी बाजीरावास मोंगलांच्या राज्यावर चौथाई देतो.—भास्करपंत बहार प्रांतावर स्वारी करतो.—त्या स्वारीची हकीकत.—मीर हबीब हा भास्करपंतास अनुकूल होतो, व मराठे बंगालचा बराच भाग काबीज करतात.—अलिवर्दीखान हा बादशाहा व बाळाजी बाजीराव यांजपाशीं मदत मागतो.—तो भास्करपंताचा पराभव करतो.—तो पळून वऱ्हाडांत परत येतो.—रघूजी भास्करपंतास बरोबर घेऊन पुनः बंगाल्यांत शिरतो.—बादशाहा माळव्याची सनद देऊं करून बाळाजी बाजीराव यास, रघूजीस बंगाल प्रांतांतून घालवून देण्यास सांगतो.—बाळाजी बंगाल्यांत जाऊन रघूजीचा पराभव करतो व त्याला त्या प्रांतांतून घालवून देतो.—बादशाहा पेशव्यास माळव्याची सनद देतो. त्या संबंधानें झालेले करार.—तो वसुलाच्या संबंधानें जमाखर्चाचा हिशेब शाहू महाराजांस देतो.—रघूजी सातान्यावर स्वारी करण्याचा घाट घालतो, परंतु बाळाजी बाजीराव शाहू महाराजांच्या मध्यस्थीनें त्याच्याशीं तह करून तें प्रकरण मिटवितो.—माळव्याच्या संबंधानें दमाजी गायकवाड याजपाशीं वसुलाचा हिशेब मागण्याचा विचार.—महाराजांकडून पेशव्यास आणखी नवीन मुलखाची सनद मिळते.—जिवाजी खंडेराव गोवळकोंटचा किल्ला घेतो.—कर्नाटकांत बाबूजी नाईक व

तद्देशीय संस्थानिक यांच्यांत तंटे उपस्थित होतात.—**शाहू महाराज बाबूजीस कर्नाटकच्या** सुभ्यावरून दूर करतात.—**रघूजीच्या** सरदारांचे **अलिबर्दीखान** खून करतो.—**रघूजी** बंगाल्यावर स्वारी करतो परंतु त्याला कांहीं कारणामुळें स्वदेशीं परत यावें लागतें.—**अलिवर्दीखानास** मदत न केल्याबद्दल **बाळाजीनें** केलेला बहाणा.—**सदाशिवराव भाऊची कर्नाटकावर** स्वारी.—पेशव्यास **बुंदे**-लखंडच्या राजाकडून ज्यास्त मुलूख मिळतो.—पेशवा शेतकीस उत्तेजन देतो.—**अबदालीची हिंदुस्थानावर** पहिली स्वारी.—**महंमदशाहा** बादशाहाचा मृत्यु.—**निजामउल्मुल्काचा** मृत्यु.—त्याच्या मुलांत गादीविषयीं तंटे लागतात.—**महाराजांस** पुत्रशोक होतो.—धाकटी राणी **सगुणाबाईसाहेब** यांचा मृत्यु.—**महाराजांस** भ्रम होतो.—**भवानीबाईचा** पुत्र **राजाराम** यास दत्तक घेण्याचा विचार.—थोरली राणी **सकवारबाईसाहेब** यांचें कारस्थान.—**शाहू महाराज बाळाजी बाजीराव** यास पुढें राज्य चालविण्याच्या संबंधानें स्वदस्तुरची यादी करून देतात.—**सकवारबाई महाराजांस** वाड्यांत बंदोबस्तानें ठेविते.—ती पेशव्याच्या विरुद्ध कारस्थान चालविते.—**शाहू महाराज** यांचा मृत्यु.—**बाळा**-जीची दक्षता.—**महाराजांचा** दहनविधि व **सकवारबाई** सती जाते.

**बाजीराव** मरण पावल्यावर कांहीं दिवसांनीं **चिमणाजी आपा नानासाहेबास** बरोबर घेऊन **साताऱ्यास** आला हें मागें सांगितलेंच आहे. **बाजीराव** वारला त्या वेळीं **रघूजी भोंसले कर्नाटकांत त्रिच**-नापल्लीस वेढा देण्याचे कामांत गुंतला होता. त्याला ती वातमी क-ळतांच **बाबूजी नाईक बारामतीकर** यास बरोबर घेऊन तोहि मोठ्या त्वरेनें **साताऱ्यास** निघून आला. **रघूजीच्या** मनांत पेशवाईचीं वस्त्रें **नानासाहेबास** न मिळूं देतां **बाबूजी नाईक** यास देववावीं असें होतें. त्यानें **शाहू महाराजांपाशीं नाइकाची** फार शिफारस केली, व त्या-लाच पेशवाईचीं वस्त्रें द्यावीं ह्मणून तो हरप्रयत्नानें **महाराजांचें** मन वळवूं लागला. शिवाय **बाबूजी नाईक** फार मोठा संपत्तिमान् असल्यामुळें त्याच्याकडून ह्या कामाबद्दल अतोनात द्रव्य मिळेल असेंही त्यानें **म**-हाराजांस सांगितलें. परंतु त्याचा तो सर्व प्रयत्न व्यर्थ गेला. **प्रतिनि**-धीचें **पेशव्याशीं** जरी पूर्वीपासून वैमनस्य होतें तरी **रघूजीचा** पुढील एकंदर कावा त्याच्या लक्षांत आल्यामुळें तोही त्याला अनुकूल नव्हता. तसेंच **दमाजी गायकवाड** हाही त्या वेळीं त्याचें पाठबळ करायाला त-

यार नव्हता. ह्या सर्व कारणांमुळें व विशेषत: चिमणाजी आपाच्या खटपटीमुळें इ० स० १७४० च्या आगष्ट महिन्यांत नानासाहेबालाच पेशवाईचा अधिकार मिळाला.

पेशवाईचीं वस्त्रें नानासाहेबास देण्याचे वेळीं शाहू महाराजांनीं एक वडा दरबार भरविला, व मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें स्वहस्तें देऊन नानासाहेबास उपदेश केला तो एणेंप्रमाणें:—"बाजीराव यांणीं थोरले बाळाजीपंत यांचे मागें बहुत सेवा निष्ठेनें करून मोठमोठीं कार्यें करून दाखविलीं. शेवटीं इराणीचें ( नादिरशाहाचें ) पारिपत्य करून पादशाही स्थापावी ह्मणोन रवाना केले. तेथें आयुष्य थोडें जालें. इराणींनीं जी पादशाही दौलत लुटून नेली ते अटकेपार जाऊन इराणी पादशाहाचें पारिपत्य करून दौलत माघारी आणावी ऐसा मनोदय. उमेद धरिली असतां ईश्वराचे इच्छेनें असें घडून आलें. त्यास त्यांचे पुत्र तुह्मी, त्याप्रमाणें पराक्रम करून सेवा करावयास योग्य आहां. बाजीराव यांचा हेतु राहिला, व आमचा संकल्प दिल्लीची पादशाही कमजोर झाली ती इराणी आले त्यांजपासोन रक्षोन निम्में हिंदुस्थान घ्यावें असें लिहिलें. ते पादशाही रक्षोन हिंदुस्थान सर्व आपलें करावें ऐसा बेत केला तो तुह्मीं सिद्धीस न्यावा. अटकेपार घोडे चालवावे.[२]"

नंतर चिमणाजी आपा व नानासाहेब पुण्यास निघून आले. आपल्या मनोदयानुरूप कार्य झालें नाहीं ह्मणून रघूजी भोंसल्यास फार वाईट वाटलें व तो बाबूजी नाईक यास बरोबर घेऊन कर्नाटकांत त्रिचनापल्ली एथें निघून गेला. आपला अशा रीतीनें अपमान झाला ह्मणून नाइकासही फार वाईट वाटलें. बाजीरावास नाइकाचें फार कर्ज होतें तेव्हां नानासाहेबाचा कांहीं तरी विचका करावा अशा

१ हा मजकूर 'काव्येतिहाससंग्रहां'तील 'थोरले शाहू महाराजांचे चरित्रां'तून घेतला आहे. २ हा हेतु पुढें सन १७५८ सालीं सिद्धीस गेला. परंतु तें पाहण्याला शाहू महाराज जीवंत राहिले नाहींत ही मोठी दुर्दैवाची गोष्ट समजली पाहिजे!

उद्देशानें नाइकानें आपल्या कर्जाबद्दल पेशव्यास मोठा तगादा लाविला. हें संकट कसें वारावें याचा बाळाजीस कांहीं उपाय सुचेना. अशा ऐन संकटाच्या प्रसंगीं पेशव्याचा दिवाण महादाजीपंत पुरंदरे यानें त्यास मदत केली. त्यानें लगेच पेशव्याच्या सर्व कर्जाची हमी घेऊन त्याला त्या संकटांतून मुक्त केलें. ह्या गोष्टीमुळें पेशवा त्याचा अतिशय आभारी झाला व त्याच्यावर अत्यंत लोभ करूं लागला.

त्या वेळीं मराठ्यांची व एकंदर हिंदुस्थान देशाची स्थिति कशी होती तें सांगणें अवश्य आहे.

त्या वेळीं दिल्ली एथें महमंदशाहा बादशाहा राज्य करीत होता. नादिरशाहा परत इराणास गेला त्या वेळीं त्यानें काबूल, ठट्ठा व मुलतान हे प्रांत आपल्या राज्यांत सामील केले होते. बादशाहा स्वतः भेकड व व्यसनी असल्यामुळें त्याचें तेज दिवसेंदिवस कमी कमी होत चाललें होतें. उत्तरहिंदुस्थानांतले जे रजपूत राजे पूर्वीं दिल्लीच्या बादशहाचे मांडलिक ह्मणून राज्य करीत होते ते बहुतेक सर्व आतां स्वतंत्र रीतीनें अंमल करूं लागले होते. दिल्लीच्या बादशाहाचा पक्ष ज्यांनीं अजून जोरानें धरला होता अशीं तीन रजपूत संस्थानें होतीं. त्यांपैकीं जोधपूर व उदेपूर ह्यांची मराठ्यांनीं स्वाऱ्या करकरून बहुतेक वाट लावलीच होती. परंतु जयपूरचा राजा सवाई जयसिंग याचा व बाजीरावाचा अत्यंत स्नेह असल्यामुळें तेवढें संस्थान मात्र बराच जीव धरून होतें.

सिंधुनदाच्या कांठीं शूद्रांपैकीं जाट या जातीचे लोक पूर्वीं राहत असत. त्यांचा चूडामण नांवाचा कोणी सरदार आपल्या लोकांसह औरंगजेबाच्या कारकीर्दीच्या अखेरीस आग्रा व जयपूर यांच्यामधील मुलखांत येऊन वसाहत करून राहिला होता. पुढें औरंगजेबाच्या मरणानंतर मोंगलांच्या राज्यांत जी बलबलपुरी माजली त्या संधींत त्या सरदारानें लुटालूट करून पुष्कळ पैसा गोळा केला व भरतपुरास मोठा कोट बांधला. मराठे व जाट यांचा मुलूख जरी एकमेकांपासून फार लांब होता, तरी जाट लोक जे हळूहळू उदयास येऊं लागले त्याचें मुख्य

कारण, मराठे लोकांच्या सत्तेचा मोठ्या जोरानें जो विस्तार होत चालला होता तेंच होय. पुढें जसे जसे मराठे **चं**बळानदीच्या उत्तरेकडे स्वाऱ्या करूं लागले तसा तसा त्यांचा व जाट लोकांचा जास्त परिचय होत गेला, व ते एकमेकांशीं मोठ्या स्नेहभावानें वागूं लागले. हे जाट लोक ह्या वेळीं बरेच सत्ताधारी होऊन बसले होते.

ह्याच वेळेच्या सुमारास **अ**लिवर्दीखान हा **बं**गाल, **ब**हार व **ओ**ढ्या हे प्रांत बळकावून बसला. हा **अ**लिवर्दीखान पूर्वी **बं**गालचा नबाब **सु**जाउद्दीन याच्या हाताखालीं एक लहानसा अंमलदार होता. **सु**जाउद्दीन यानें प्रथमतः त्याला **ब**हार प्रांताचा सुभेदार नेमिलें होतें. **सु**जाउद्दीनाच्या मागें **स**रफरझखान गादीचा मालक झाला व तो **डा**क्का येथें रहात असे. त्या वेळीं **सु**जाउद्दीनाचा जांवई **मु**र्शिदकुलीखान हा **ओ**ढ्या प्रांताच्या सुभेदारीवर होता, व त्याच्याजवळ **मी**र[१] हबीब नांवाचा एक आरब दिवाण होता. **सु**जाउद्दीन मेल्यावर **स**रफरझखान हा **बं**गालचा नबाब झाला खरा; परंतु **अ**लिवर्दीखानानें त्याच्या विरुद्ध बंड करून त्याला ठार मारून टाकिलें. व **मु**र्शिदकुलीखानास **ओ**ढ्या प्रांतांतून घालवून दिलें. त्याचा दिवाण **मी**र हबीब हा प्रथमतः पळून गेला, परंतु मागून **अ**लिवर्दीखानाच्या पदरीं येऊन राहिला. यानंतर मराठ्यांनीं **बं**गाल्यावर ज्या स्वाऱ्या केल्या त्यांत हा मराठ्यांच्या कसा उपयोगीं पडला तो भाग पुढें येईल. **अ**लिवर्दीखान अशा रीतीनें **बं**गालचा नबाब झाल्यावर त्यानें **दि**ल्लीच्या बादशाहास पुष्कळ नजराणा पाठविला. त्यावरून तो द्रव्यलोभी बादशाहा खूष होऊन त्यानें त्याच्याकडे तें पद कायम केलें.

ह्याच वेळेच्या सुमारास कांहीं नवीन राज्येंही स्थापन होऊं लागलीं होतीं. **दि**ल्लीच्या दक्षिणेस सुमारें १०० मैलांवर व **गं**गेच्या पूर्वेस **अ**योध्येपासून पहाडापर्यंतचा मुलूख, रोहिले म्हणून अफगाण लोकांची

१ **सै**र **मु**ताखरीनमध्यें **मी**र हबीब हा इराणचा एक व्यापारी होता असें म्हटलें आहे; परंतु मराठ्यांच्या बखरींत त्याला आरब असें म्हटलें आहे.

एक जात आहे त्या जातीनें जिंकून घेतला होता. त्यांच्यांत अली[1] महंमद म्हणून एक सरदार होता. त्यानें एके प्रसंगीं दिल्लीच्या बादशाहाचा वजीर कमरुद्दीनखान याचा पराभव करून आपलें स्वातंत्र्य कायम केलें.

दक्षिण व कर्नाटक यांचा स्वराज्य व जहागीर शिवायकरून जो वसूल येई तो निजामउल्मुल्क व मराठे हे वांटून घेत असत.

कर्नाटकांत पुष्कळ लहान लहान संस्थानें झालीं होतीं. कर्नूल, कडपा व सावनूर एथील नवाब हे विजापूर व गोवळकोंडें ह्या जुन्या राजघराण्यांपैकीं पुरुष होते. ते सर्व आपापल्या संस्थानांत बहुतेक स्वतंत्र रीतीनें अंमल करीत असत, व बहुतकरून मराठ्यांच्याच तंत्रानें चालत असत; आणि त्रिचनापल्ली अर्काटच्या नवाबाचा जांवई चंदासाहेब ह्याच्या ताब्यांत होती.

तंजावर एथें व्यंकोजीचा[2] नातू सयाजी हा एकाद्या नामधारी राजाप्रमाणें गादीवर होता, व सर्व सत्ता एका मुसलमान दिवाणाच्या हातांत होती. सयाजीनें मद्रासच्या इंग्लिश लोकांचा आश्रय धरला होता. त्यामुळें त्या मुसलमान सरदारानें त्याला काढून टाकलें व त्याचा सावत्रभाऊ प्रतापसिंह यास सन १७४१ त गादीवर बसविलें. प्रतापसिंहास ही परतंत्रता न आवडून त्यानें त्याच वर्षी त्या दिवाणास ठार मारून सर्व राज्याचीं सूत्रें आपल्या हातांत घेतलीं.

इंग्लिश व फ्रेंच यांच्या वसाहती कारोमांडल व मद्रास या किनाऱ्यांवर फैलावत चालल्या होत्या. ह्या लोकांना पुढें लौकरच हिंदुस्थानच्या राजकारणांत शिरण्याचा जरी प्रसंग आला, तरी अद्याप म्हणजे १७४० पर्यंत ते दुसऱ्याच्या विशेष वाटेस न जातां, आपल्या व आपल्या व्यापाराच्या संरक्षणाकरितां जेवढे उपाय करणें जरूर

---

१ हा मूळचा धनगर होता. तो लहान असतां त्याचा एका रोहिल्यानें प्रतिपाळ केला व त्याचें नांव त्यानें अली महंमद असें ठेविलें.—ग्रांटडफ.

२ शिवाजीचा सावत्र भाऊ.

होते तेवढेच करीत होते. इंग्लिशांनीं सन १७३९ त चिमणाजी आपाच्या मध्यस्थीनें बाजीरावाशीं तह केला होता, यामुळें त्यांना मराठ्यांपासून उपद्रव होत नसे.

पोर्तुगीज लोकांच्या ताब्यांत कांहीं ठाणीं राहिलीं होतीं. परंतु त्यांचे व मराठ्यांचे वारंवार युद्धप्रसंग झाल्यामुळें, व त्यांची मूळचीच संख्या फार थोडी असल्यामुळें ते लोक अगदीं बलहीन झाले होते.

वर सांगितल्याप्रमाणें मोंगलांच्या एवढ्या अफाट राज्याच्या चिंधड्या चिंधड्या उडून गेल्या होत्या, व जिकडे तिकडे मराठ्यांची सत्ता विस्तृत होत चालली होती. परंतु मराठ्यांचे नेहमीं आपसांत तंटे होत असल्यामुळें ती सत्ता जशा जोरानें वाढावी तशी वाढत नव्हती.

बाजीरावानें रघूजी भोंसल्यास सन १७३९ त कर्नाटकच्या स्वारीवर पाठविलें असें मागील भागांत सांगितलें आहे. ह्या स्वारींत पेशवे, प्रतिनिधि, व भोंसले यांचें सैन्य होतें; शिवाय सोंडूर व गुटी एथील घोरपडे यांसही येऊन मिळण्याविषयीं शाहू महाराज व पेशवे (बाजीराव) यांनीं पत्रें पाठविलीं होतीं. त्यावरून प्रसिद्ध संताजी घोरपडे याचा नातू मुरारराव घोरपडे हा त्या स्वारींत रघूजीच्या मदतीस आपल्या सैन्यासह आला होता[1]. अशा रीतीनें रघूजीजवळ एकंदर ५० हजार सैन्य जमलें. अशा अवाढव्य सैन्यासह तो आडवळणी रस्त्यानें पैनघांटांत दामलचेरी बारीच्या नजीक दोस्तअ-[2]

१ राजारामाचे कारकीर्दींत, संताजी घोरपडे यास त्यानें फार वाईट रीतीनें वागविलें व त्याचा अंतही फार दुःखद स्थितींत झाला, त्यामुळें त्याच्या वंशांतील पुरुष साताऱ्याच्या राजांचा फार द्वेष करीत असत. पुढें कांहीं तडजोड होऊन मुरारजी घोरपडे शाहू महाराजांच्या पक्षास अनुकूल झाला, व आपलें पूर्वींचें सेनापतिपद मागूं लागला. परंतु त्याला तें न देतां तुंगभद्रेजवळ कांहीं प्रांतांची जहागीर देऊन महाराजांनीं त्याची समजूत केली.—ग्रांटडफ.

२ हा कर्नाटक–पैनघांटचा नबाब होता. इ० स० १७०६ त दाऊदखान पन्नी ह्यानें सादत उल्लाखान नांवाच्या एका सरदारास कर्नाटक–पैनघाट एथील सुभेदारीवर पाठविलें होतें. तो इ० स० १७३२ त मरण पावला. त्याच्या मागून त्याचा नातू दोस्त अली हा आपणास नबाब असें ह्मणवूं लागला, व तिकडील मुलखाचा स्वतंत्र रीतीनें अधिकार चालवूं लागला.—ग्रांटडफ.

ल्लीवर येऊन पडला. त्याची व **दोस्तअल्लीची** फार मोठी लढाई झाली. तींत **दोस्तअल्लीचा** पराभव होऊन तो मारला गेला व त्याचा दिवाण **मीर असद** ह्याला मराठ्यांनीं कैद केलें. नंतर मराठे वावटळीप्रमाणें सर्व **कर्नाटकभर** पसरले व भराभर खंडण्या गोळा करूं लागले. सरते शेवटीं **दोस्तअल्लीचा** मुलगा **सफ्तरअल्ली** यानें मराठ्यांस पुष्कळ द्रव्य दिलें व त्यांच्याशीं तह केला. त्यांत असें ठरलें कीं, "मराठ्यांनीं **त्रिचनापल्लीचा** अधिकारी **चंदासाहेब** यास जिंकून तो प्रांत **सफ्तरअल्लीस** द्यावा व त्याबद्दल नबाबानें मराठ्यांस कांहीं प्रांत जहागीर द्यावा." अशा प्रकारचा खाऊ मराठ्यांपुढें ठेविल्यावर मग काय विचारतां? प्रथमतः **चंदासाहेबास** मराठे **त्रिचनापल्लीवर** हल्ला करितील ह्मणून जो संशय आला होता तो नाहींसा करण्याकरतां **रघूजी** शंभर सवाशें कोस **महाराष्ट्राकडे** पाठीमागें आला. इतक्यांत त्याला **बाजीरावाच्या** मृत्यूचें वर्तमान समजलें. ह्या वेळीं त्याच्या सैन्याची छावणी **शिवगंगेच्या** कांठीं होती. नंतर **बावूजी नाईक बारामतीकर** यास **शाहू महाराजांकडून** पेशवाईचा अधिकार देण्याची खटपट करण्याकरतां **रघूजी सातान्यास** आला. परंतु त्याचे सर्व प्रयत्न निष्फल झाल्यामुळें **बावूजी नाइकास** बरोबर घेऊन तो परत **कर्नाटकांत** गेला हें मागें सांगितलेंच आहे. ह्या वेळीं **श्रीपतराव प्रतिनिधि** व **फत्तेसिंग भोंसले** हेही त्याच्या बरोबर होते. **रघूजी** आपल्या छावणींत परत गेल्यावर पुढें **कर्नाटकांत** मराठ्यांनीं काय काय केलें याची साग्र हकीकत सांपडत नाहीं. तथापि इतका शोध लागतो कीं, त्या वेळीं **तंजावरच्या** राजानें **रघूजीशीं** सख्य केलें. मराठ्यांनीं **त्रिचनापल्लीस** वेढा घालून तें शहर तारीख २६ मार्च सन १७४१ रोजीं घेतलें व **चंदासाहेबास** कैद करून

---

१ मराठ्यांमध्यें हा **हुसेन दोस्तखान** या नांवानें विशेष प्रसिद्ध होता. तो **सातान्यास** ७ वर्षेंपर्यंत नजरकैदेंत होता. त्याला किल्ल्यांत किंवा एकाद्या बिकट ठिकाणीं न ठेवतां शहरांत मोकळें ठेविलें होतें, व तो बाहेर निघाला म्हणजे त्याच्याबरोबर एक शिपाई असे. त्याची सुटका इ० स० १७४८ झाली.

साताऱ्यास पाठवून दिलें. नंतर रघूजीनें तो किल्ला मुरारराव घोरपडे याच्या ताब्यांत दिला व त्याच्या जवळ जें लष्कर ठेविलें त्यांत पेशव्याचें पायदळ बरेंच होतें. ह्या पायदळाचा खर्च शाहू महाराजांनीं द्यावा असें ठरलें, व अर्काट प्रांताची सालीना जी खंडणी येईल तीपैकीं २० हजार रुपये बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यास देत जावे असा ठराव झाला. हा ह्या वर्षी बाळाजीस बराच मोठा फायदा झाला.

बाजीराव मृत्यु पावल्यावर माळव्यावरचा त्याचा हक्क उडवून दिल्लीच्या बादशाहानें अजिम उल्लाखान याची त्या प्रांताच्या सुभेदारीवर नेमणूक केली. परंतु बाळाजी बाजीरावास पेशवाईचा अधिकार मिळाल्यावर त्यानें प्रथमतः, दिल्लीच्या बादशाहानें बाजीरावास माळव्याच्या संबंधानें जे हक्क देऊं केले होते ते मिळावे म्हणून आपल्या व चिमणाजी आपाच्या सहीचा एक अर्ज तिकडे पाठवून दिला. तसेंच पूर्वी बादशाहानें जो पैसा देऊं केला होता त्याचीही त्यानें मागणी केली. हे अर्ज त्यानें जयसिंग व निजामउल्मुल्क यांच्या मार्फत बादशाहाकडे रवाना केले. ह्या वेळीं बाळाजीजवळ पैशाची टंचाई झाली होती, यामुळें जितकी रकम रोकड मिळेल तितकी त्याला पाहिजे होती. बादशाहानें प्रथमतः १९,००,००० रुपये बाळाजीस दिले. नंतर त्या उभयतांमध्यें करार झाला त्याचीं कलमें:—

( १ ) बादशाहाचे हुजुरांत आह्मांस पदवी प्राप्त होऊन आमची इभ्रत वाढावी असा आमचा अर्ज आहे.

( २ ) आह्मी लिहून देतों कीं, माळवा सोडून दुसऱ्या प्रांतावर आह्मी स्वारी करणार नाहीं, व लुटालूट करून देशाची नासाडी करणार नाहीं.

( ३ ) कोणीही मराठा सरदार नर्मदेच्या पलीकडे उत्तरहिंदुस्थानच्या सुभ्यांत जाणार नाहीं. त्याची जबाबदारी आह्मी आमचे माथ्यावर घेतों.

( ४ ) कोणी तरी लायकीचा मराठा सरदार ५०० स्वारांनिशीं बादशाहाचे हुजूर नेहमीं नोकरींत राहील.

( ५ ) या सालीं जो ऐवज आह्मांस बादशाहांनीं इनाम दिला आहे तो आह्मी ग्रहण करितों. परंतु पुढें आह्मी बादशाही दरबारांतून एक छदामही मागणार नाहीं. बादशाहाचें दरबार पृथ्वीचा (?) मध्य आहे. आह्मी आपले कामांत व बादशाहाचे सेवेंत हमेष तत्पर राहूं.

( ६ ) जेव्हां जेव्हां सरकारचें गाजी सैन्य बाहेर निघेल तेव्हां तेव्हां त्या लष्कराबराबर ४००० स्वारांची टोळी आह्मी पाठवूं. परंतु जर ज्यास्त लोकांची जरूर असेल तर त्यांचा खर्च मात्र हुजुरांतून मिळावा.

( ७ ) चंबळा नदीच्या पलीकडील जमीदारांपासून ठरलेल्या पेशकशाखेरीज एक छदामही आह्मी अधिक घेणार नाहीं.

( ८ ) चंबळा नदीच्या पलीकडील मुलखांत कोणा एकाद्या लहानसहान जमीदाराचें शासन करण्यास हुजूर फर्मावितील तर आह्मी ४ हजार स्वार तिकडे पाठवूं, व हें लष्कर तें कार्य शेवटास नेण्यास हरप्रयत्न योजील.

( ९ ) किल्लेदार लोकांच्या जहागिरी, व कानगो (कारकून वगैरे) व मुफ्ती (?) लोकांचे हक्क, व इनाम जमिनी, व नेमणुका व धर्मादाय, वगैरे हुजूरच्या देणग्यांमध्यें आह्मी व्यत्यय आणणार नाहीं. ज्यांना ज्यांना त्या दिल्या आहेत त्यांनीं त्यांनीं त्यांचा उपभोग घेऊन बादशाहाची हमेष बढती व्हावी ह्या हेतूनें दुवा देत असावें ह्मणून त्या आह्मी चालवूं.

अशा रीतीनें जरी त्या उभयतांत करार झाला होता तरी त्या वेळीं बादशाहानें **बाळाजी बाजीराव**ास त्या प्रांताची सनद दिली नाहींच.

---

१ सर जान मालकमकृत मध्यहिंदुस्थानाच्या इतिहासाचें कीर्तनेकृत भाषांतर.

बाजीराव वारल्यामुळें चिमणाजी आपा नानासाहेबास घेऊन पुण्यास आला. त्या वेळीं त्यानें शंकराजी नारायण व खंडोजी माणकर यांस कोंकणांत ठेविलें होतें. त्या दोघांनीं अनेक लढाया मारून शिद्दी व पोर्तुगीज यांचा पराभव केला. खंडोजी माणकर यानें इ० स० १७४१ त रेवदंडा हबशापासून घेतला. तसेंच धारावी, यशवंतगड, मनोहरगड, मांडवी, घोडबंदर व उरण हेही प्रांत सर केले. ह्या वेळीं चिमणाजी आपा पुण्यास होता. रेवदंडा घेतला हें वर्तमान ऐकून चिमणाजी आपास फार आनंद झाला. नंतर ११ दिवसांनीं ह्मणजे सन १७४१ च्या जानेवारी महिन्यांत चिमणाजी आपाचा पुण्यास अंत झाला. चिमणाजी आपा फार शूर होता. आपाच्या मरणामुळें नानासाहेबास फार दुःख झालें, व त्याच्या जवळचा अनुभवशीर व वडील मनुष्य नाहींसा झाल्यामुळें तो अगदीं एकटा पडल्यासारखा झाला. तो जरी आपल्या बापाइतका शूर नव्हता तरी दुसरे गुण ह्मणजे प्रसंगावधान, चातुर्य, राजनीतिनैपुण्य वगैरे त्याच्या अंगांत वास करीत होते; व ह्या गुणांत तो आपल्या बापापेक्षां कांकणभर जास्त होता असेंही ह्मटलें तरी चालेल. त्यानें कित्येक बिकट प्रसंगीं काडीइतकें न डगमगतां मोठ्या धिमेपणानें व एखाद्या अनुभवशीर मुत्सद्याप्रमाणें अक्कल लढवून एवढा अवाढव्य राज्यशकट जोरानें हांकला ही गोष्ट त्याला फार भूषणप्रद आहे.

चिमणाजी आपा वारल्यानंतर बाळाजी बाजीराव उत्तरेकडील[1] मुलखांतून स्वदेशीं परत आला. नंतर सुमारें एक वर्षपर्यंत पुणें व सातारा एथें आलटूनपालटून राहून त्यानें राज्याची अंतस्थ स्थिति सुधारण्यांत काळ घालविला. बाळाजीची अशा प्रकारची हुशारी

---

१ बाळाजी बाजीराव हा सामप्रिय होता. तो ह्या वेळीं, निजामउल्मुल्क हा नासिरजंगाचें बंड मोडण्याकरितां दक्षिणेंत जात होता त्याला भेटून बादशाहापासून आपणास माळव्याची सनद देववावी म्हणून बोलणें करण्याकरितां नर्मदेच्या कांठीं जाऊन राहिला होता, व तेथेंच त्याची व निजामउल्मुल्काची मुलाखत झाली.

पाहून **शाहू म**हाराज फार खुप झाले व पोर्तुगीज लोकांपासून जिंकून घेतलेल्या सर्व मुलखाची सनद त्यांनीं **बा**ळाजीस दिली; शिवाय **गुज**राथ प्रांत खेरीजकरून **न**र्मदेच्या उत्तरेकडील सर्व मुलखाची जी खंडणी वसूल करावयाची त्याचा सर्व अधिकारही त्यांनीं त्यासच दिला. **शाहू म**हाराजांनीं एवढा मोठा अधिकार **पे**शव्यास दिला यामुळें त्याचें महत्व केवढें वाढलें हें सहज लक्षांत येईल.

**बं**गालचा नवाब **अ**लिवर्दीखान यानें त्या प्रांताचा अधिकार कसा मिळविला हें मागें सांगितलेंच आहे. त्यानें **मु**र्शिदकुलीखान याचा पराभव केल्यावर **खा**नाचा दिवाण **मीर ह**बीब हा पळून गेला होता. त्यानें, **र**घूजी **भों**सल्याचा दिवाण **भा**स्करपंत त्या वेळीं **व**ऱ्हाडांत होता त्याला **क**टक प्रांतावर हल्ला करावा म्हणून मसलत दिली. परंतु **र**घूजी त्या वेळीं **क**र्नाटकांत होता म्हणून त्याच्या आज्ञेशिवाय **भा**स्करपंताला ती गोष्ट करतां येईना. **भा**स्करपंतानें त्या संबंधानें **र**घूजीस पत्र पाठविलें. परंतु त्याचें उत्तर येण्यापूर्वीच **अ**लिवर्दीखानानें तो सर्व प्रांत जिंकून घेतला, व **मीर ह**बीब ह्याला त्याचा अधिकार कबूल करणें भाग पडलें. नंतर पुढें लवकरच चांगलीशी संधि आली तेव्हां **भा**स्करपंत **बं**गाल्याकडे फौज घेऊन गेला. तो **बं**गाल्याकडे गेला असें पाहून, **न**र्मदेच्या उत्तरेकडील प्रांताचा जो अधिकार **शाहू म**हाराजांकडून **बा**ळाजीस मिळाला होता तो स्थापित करण्याकरतां, **म**ह्राराजांची आज्ञा घेऊन **र**घूजीची हालचाल जेथून सोप्या रीतीनें बंद करतां येईल अशा ठिकाणीं जाण्याकरतां **बा**ळाजी **बा**जीराव **हिं**दुस्थानांत निघून गेला. **न**र्मदा उतरल्यावर त्यानें **ग**रा व **मं**डल हीं दोन ठिकाणें घेतलीं. नंतर पुढें पावसाळा सुरू झाल्यामुळें त्याला **न**र्मदेच्या कांठीं छावणी देऊन राहणें भाग पडलें. पावसाळा संपल्यावर त्याच्या मनांत **प्र**यागावर स्वारी करण्याचें होतें. परंतु इतक्यांत **गु**जराथेंतून **द**माजी **गा**यकवाड यानें **मा**ळव्यावर हल्ला केला त्यामुळें त्याला **मा**ळव्यांत परत यावें लागलें. **पे**शवा परत फिरतांच **गा**यकवाडाचें सैन्य **मा**ळव्यां-

तून निघून गेलें. पेशव्यानें प्रयागावर स्वारी केली तर आपलें मोठें नुकसान होईल व बंगाल्यांत आपणास व्हावा तसा लाभ होणार नाहीं ह्मणून रघूजीनें गायकवाडास माळव्यावर स्वारी करावयास सांगून पेशव्याचा बेत फिका पाडला असावा असें दिसतें.

बाळाजी माळव्यांत आला तेव्हां धारचा आनंदराव पवांर[1] त्याला भेटावयास आला. तेव्हां बाळाजी बाजीरावानें त्याला भेट देऊन त्याच्याकडे धार व त्याच्या आसपासचा मुलूख यांचा अधिकार कायम केला. ह्या प्रसंगीं बाळाजीचा मुत्सद्दीपणा चांगला नजरेस येतो. धारच्या पवाराशीं सख्य केल्यामुळें तो पेशव्यास अनुकूल झाला हें निराळेंच; पण विशेष मोठा फायदा म्हटला ह्मणजे गुजराथेंतून माळव्यावर ज्या स्वाऱ्या होण्याचा संभव होता त्यांच्या लोटाला मध्यंतरीं माळव्याच्या पश्चिमेच्या वाजूनें धारचें संस्थान हा एक मजबूद धक्काच झाला. बाळाजी मंडळ एथें आल्यापासून जयसिंग व निजामउल्मुल्क यांच्या मध्यस्थीनें दिल्लीचा बादशाहा व पेशवा यांच्यामध्यें तहाचीं बोलणीं सुरू झालीं होतीं. त्या वेळीं बादशाहानें बाळाजी बाजीरावास मोंगलांच्या राज्यावर चौथाई देण्याचें कबूल केलें. परंतु महंमदशाहानें ह्यावद्दलची सनद करून दिली नाहीं. चौथाईबद्दल जो पैसा द्यावयाचा तो मात्र कधीं रोख व कधीं नेमणुकांच्या रूपानें बाळाजीस मिळत असे. वरील तहांत पेशव्याचा मुख्य उद्देश माळव्याची सनद मिळविण्याचा होता, व व दिल्लीच्या दरबारी लोकांच्या मनांतून तें प्रकरण लांबणीवर टाकून रघूजी भोसले व बाळाजी यांचें वैर ज्यास्त वाढवावयाचें होतें.

माळव्यांत अशा प्रकारची गडबड चालली असतां भास्करपंतानें बहार प्रांतावर स्वारी केली. त्या वेळीं कटक परगण्यांत अलिवर्दीखानाचा नातू सुजाउद्दौला[2] ह्यानें बंड केलें होतें, त्यामुळें

---

१ आनंदराव पवार सन १७३१ त त्रिंबकराव दाभाडे यास मिळाला होता, तेव्हांपासून बाजीरावाचा त्याच्यावर फार राग होता.

२ इ० स० १७५६ त कलकत्ता येथें १४६ इंग्लिश लोकांस एका लहान कोठड़ींत कोंडून ज्यानें ठार मारलें तोच हा सुजाउद्दौला.

ह्या संधींत आपण स्वारी केली तर आपणास बराच फायदा होईल असें भास्करपंतास वाटलें, व एवढ्याकरतांच त्यानें बहार प्रांतावर स्वारी केली; कारण तें बंड मोडण्याकरतां अलिवर्दीखान आपली सर्व फौज घेऊन कटक प्रांताकडे गेला होता. वरील गोष्टीमुळें भास्करपंताला तो मुलूख आयताच मोकळा सांपडला. परंतु अलिवर्दीखानानें त्या बंडाचा लवकरच मोड केला व तो सन १७४२ च्या एप्रिल महिन्यांत मूर्शिदाबादेकडे यावयास निघाला. इतक्यांत त्याला मराठे बहार प्रांतांत शिरल्याची बातमी लागली. भास्करपंत रामगडाजवळ डोंगरांतून येऊन नंतर उजव्या बाजूकडे वळला व तिकडील मुलुखावर हल्ला करून त्यानें तो प्रांत अगदीं उद्वस्त करून टाकला.

ह्या वेळीं बंगाल्यांत मराठ्यांची फौज दहा बारा हजारांपर्यंत होती, परंतु खऱ्या संख्येच्या चौपट फौज आली आहे अशी तेथें अफवा उठली होती. अलिवर्दीखानाजवळ फक्त सात आठ हजार फौज होती, तथापि त्यानें मराठ्यांबरोबर लढाई देण्याचा निश्चय केला. पुढें मराठ्यांची व त्याची एक फार मोठी लढाई झाली तींत त्याचा पराभव झाला, त्याचें युद्धोपयोगी सामान मराठ्यांनीं पळवून नेलें, त्याचे पुष्कळ लोक मेले व बरेच पळून गेले; आणि त्याच्याजवळ फक्त तीन हजार लोक शिलक राहिले. त्याला मराठ्यांपासून पुष्कळ दिवस फार त्रास भोगावा लागला. परंतु मराठ्यांचीं वाजवीपेक्षां फाजील मागणीं कबूल न करतां लढाई करून मेलों तरी बेहेत्तर आहे, असा त्यानें निश्चय केला. सरते शेवटीं तो पुढें चाललाच आहे, मराठे पाठीमागून लांडगेतोड करतातच आहेत, अशा दुःखकारक स्थितींत तो कट्वा एथें येऊन पोहोंचला. ह्या वेळीं एका हल्ल्यांत मराठ्यांनीं मीर हबीब यास कैद केलें. पुढें तो मराठ्यांस अनुकूल झाला, व ज्या योगानें भास्करपंताचा आपणावर विश्वास बसेल अशी प्रत्येक गोष्ट तो करूं लागला. भास्करपंताच्या मनांत पावसाळ्यांत आपल्या मुलखीं प-

रत यावयाचें होतें; परंतु **मीर हबीब** यानें त्याला न जाण्यावि-षयीं विनंति केली. पहिल्या प्रथम **भास्करपंताचा** त्याच्यावर वि-श्वास बसेना व पावसाळ्यांत तेथें रहावें असें त्यास वाटेना. तेव्हां त्याचा विश्वास बसावा ह्मणून **मीर हबीब** यानें त्याजपासून एक लहानशी टोळी मागून घेतली, व ती घेऊन तो **मूर्शिदाबादेवर** चालून गेला, व त्या ठिकाणीं त्याचा भाऊ होता त्याला बरोबर घे-ऊन त्यानें तेथला **जगत्शेट अलमचंद** ह्मणून एक मोठा सा-वकार होता त्याची पेढी लुटली, व सुमारें २५ लाख रुपयांची लूट मारून तो **भास्करपंतास** येऊन मिळाला. तेव्हां **भास्करपंताचा** त्या-च्यावर विश्वास बसून पावसाळ्यांत तेथेंच रहावें असा त्यानें निश्चय केला. नंतर त्यानें एक वळसा घेऊन **हुगळी** शहरावर हल्ला केला व तें शहर मोठ्या युक्तीनें घेतलें. **कट्व्यापासून मिदनापूरपर्यंतचा** सर्व मुलूख मराठ्यांनीं घेतला, व **मूर्शिदाबाद** प्रांतांत शिरण्याचा त्यांचा बेत होता, परंतु **हुगळी** नदीस पूर आल्यामुळें त्यांना त्या प्रांतांत जातां आलें नाहीं.

**भास्करपंतानें बंगाल्यांत** अशा रीतीनें धुमाकूळ उडवून दिला असतां **दिल्लीच्या** बादशाहाकडून **बंगालची** राहिलेली खंडणी मा-गण्याकरतां एक कामगार आला. त्याच्या बरोबर **अलिवर्दीखा-नानें** बादशाहास असा निरोप पाठविला कीं, "जोंपर्यंत मला मरा-ठ्यांकडून उपद्रव पोहोंचतो आहे तोंपर्यंत खंडणी देण्यास मला अनुकूलता नाहीं. कारण मराठे राज्यांत चोहोंकडे लुटालूट करीत आहेत त्यामुळें राज्याचा वसूल येत नाहीं. या वेळीं खावंदांनीं मला योग्य मदत देऊन माझें रक्षण केलें पाहिजे." **अलिवर्दीखानानें,** आपणास मदत करावी ह्मणून, ह्या वेळीं **बाळाजी बाजीरावासही** विनंति केली, व **वऱ्हाडावर** स्वारी केली तर इकडे **रघूजीचा** सर-दार जो त्रास देत आहे तो बंद होईल असेंही त्यास कळविलें; व तें काम **पेशव्यानें** करावें ह्मणून त्याच्याकडे त्यानें बराच पैसा पाठ-वून दिला. परंतु ज्या लोकांबरोबर त्यानें तो पैसा पाठवून दिला

होता त्यांच्यावर वाटेंत अयोध्येचा नबाब सफ्तरजंग यानें हल्ला करून तो मधल्यामध्यें आपणच घेऊन गेला.

अलिवर्दीखानानें बादशाहा व बाळाजी बाजीराव यांच्यापाशीं मदत मागितली होती तरी तो त्याच आशेवर स्वस्थ बसला नव्हता. त्यानें पावसाळा संपल्यावर भास्करपंतावर हल्ला करण्याची मोठी कडेकोट तयारी चालविली होती. भास्करपंताची छावणी या वेळीं कट्वा एथें होती. पावसाळा संपतो आहे तोंच अलिवर्दीखानानें हुगळी व आजी ह्या नद्यांवर नावांचे पूल बांधले. आजीनदीच्या पुलावरून जात असतां पुलाच्या दोऱ्या तुटून त्याचे १९०० लोक बुडून मेले, तथापि न डगमगतां आपले राहिलेले लोक बरोबर घेऊन तो पलीकडे गेला व भास्करपंतावर अकस्मात् जाऊन पडला. ह्या वेळीं मराठ्यांचें बरेंच नुकसान झालें व ते बहार प्रांतांत पळून गेले. परंतु तो मागें फिरतांच ते पुनः मिदनापूर प्रांतांत शिरून मुलखास अतिशय उपद्रव देऊं लागले. अलिवर्दीखानानें पुनः त्यांच्यावर हल्ला करून त्यांना पिटाळून लाविलें. त्यानें त्यांचा अशा जोरानें पाठलाग केला कीं त्यांनीं पाठीमागें वळून सुद्धां पाहिलें नाहीं! बालसोर एथें जो मराठ्यांचा पराभव झाला त्यामुळें ते फारच घाबरले व ओढ्या प्रांतांतून त्यांनीं थेट वऱ्हाडचा रस्ता धरला. भास्करपंत वऱ्हाडांत येऊन पोहोंचण्यापूर्वीं रघूजी भोंसले कर्नाटकांतून परत आला होता. त्याला भास्करपंताचा उद्देश योग्य आहे असें वाटलें व तो आपल्या सैन्यासह भास्करपंत गेला होता त्या वाटेनें पुनः बंगल्यांत शिरला.

मराठे बंगल्यांत शिरले हें वर्तमान बादशाहास कळलें तेव्हां त्यानें अयोध्येचा नबाब सफ्तरजंग यास भास्करपंताला बंगाल्यांतून हांकून देण्यास सांगितलें; त्याच प्रमाणें त्यानें पेशव्यासही विनंति केली; व पेशव्यानें अलिवर्दीखानास मदत करावी ह्मणून आजिमाबादच्या वसुलाची चौथाई व माळव्याची सनद देण्याचा त्याच्याशीं करार केला. बाळाजीला तेंच पाहिजे होतें. तो तत्काळ आपली फौज

घेऊन **अ**लाहाबाद प्रांतांतून **बो**गळीपूर एथें येऊन दाखल झाला. पण येथून राजरस्त्यानें आपण गेलों तर आपली फौज कदाचित् वाटेनें शेतीभाती व इतर लागवड यांचें नुकसान करील ह्मणून तो आडवाटेनें **मू**र्शिदाबादेस येऊन पोहोंचला. ह्या ठिकाणीं **बा**ळाजीनें **अ**लिवर्दीखानाजवळ आपणास देऊं केलेला पैसा मागितला, तेव्हां नबाबाला तो देण्याचें कबूल करणें भाग पडलें. त्या वेळीं **र**घूजी **भों**सले **क**ट्वा व **ब**रद्वान या प्रांतांच्या दरम्यान येऊन पोहोंचला होता. त्याला पेशवा व नबाब ह्यांच्यामध्यें झालेला करार कळला तेव्हां त्यानें पुढें येण्याचा आपला रोंख फिरवून तो डोंगराळ प्रदेशांत निघून गेला. **अ**लिवर्दीखानानें लगेच त्याचा पाठलाग सुरू केला. परंतु तें काम त्याला झेंपणार नाहीं असें **बा**ळाजीस वाटल्यावरून त्यानें निराळ्याच रस्त्यानें जाऊन व नबाबाच्या सैन्यास मागें टाकून एकाएकीं **र**घूजीच्या सैन्यावर हल्ला केला, व त्याचा फडशा उडवून दिला; तेव्हां **र**घूजी **ओ**ढ्या प्रांतांतून परत स्वदेशीं आला. ही फत्ते झाल्यावर **बा**ळाजी **मा**ळव्यांत परत आला, व पूर्वींच्या कराराप्रमाणें तो बादशाहापाशीं **मा**ळव्याची सनद मागूं लागला. **पे**शव्यानें बादशाहाच्या मर्जीप्रमाणें **बं**गालची कामगिरी बजाविल्यामुळें बादशाहाला नाहीं ह्मणायाला आतां तोंडच राहिलें नाहीं. तथापि **पे**शव्यास एवढा मोठा प्रांत अजीबात देऊन टाकला तर आपली नाचक्की होईल असें त्याला वाटल्यावरून त्यानें त्याचा वडील पुत्र **अ**हमदशाहा ह्याला त्या प्रांताचा नांवाला अधिकारी करून व त्याचा **बा**ळाजी **बा**जीराव हा हस्तक असें **ज**यसिंग व **नि**जामउल्मुल्क यांच्या सल्ल्यानें ठरवून त्या प्रांताची सनद **बा**ळाजीकडे पाठवून दिली[1] (इ० स०

---

१ वर जी **मा**ळव्याची सनद बादशाहानें **बा**ळाजीस दिली म्हणून लिहिलें, ती सन १७४३ त **र**घूजीस **पे**शव्यानें **बं**गाल्यांतून हांकून देईपर्यंत मिळाली नव्हती असें **ग्रां**टडफ म्हणतो. परंतु त्यानें ह्या सनदेचा सारांश दिला आहे त्यांत **म**हंमदशाहाच्या कारकीर्दीच्या २४ व्या वर्षीं **ज**मादिउल् अवल् या महिन्यांत ती लिहिली असें लिहिलें आहे. तो वेळ म्हणजे सन १७४२ च्या मे महिन्याचा सुमार, येतो.— एल्फिन्स्टनकृत **हिं**दुस्थानाचा इतिहास.

१७४३). पूर्वीं **चिमणाजी आपा** व **बाळाजी बाजीराव** या दोघांनीं आपल्या सहीनिशीं बादशाहास जो करार लिहून दिला होता त्यांतील कलमांत व आतांच्या सनदेच्या कलमांत विशेष फरक एवढाच झाला कीं, पूर्वीं बादशाहास मदतीची जरूर लागेल त्या वेळीं त्यांनीं ४००० स्वार आपल्या खर्चानें देण्याचें कबूल केलें होतें; परंतु ह्या सनदेंत ४००० होते ते १२००० झाले. मात्र अधिक जे ८००० स्वार देण्याचें ठरलें त्यांचा खर्च बादशाहानें द्यावा असें ठरलें. एकंदर करार बिनतक्रार बोलीप्रमाणें अमलांत येतील अशा संबंधानें बादशाहाच्या वतीनें **जयसिंग** जामीन झाला; व **पेशव्याच्या** वतीनें **राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर, यशवंतराव पवार** व **पिलाजी जाधव** हे जामीन झाले. ह्या सरदारांनीं बादशाहास असें लिहून दिलें कीं, "आह्मी **राणोजी शिंदे, मल्हारजी होळकर, यशवंतराव पवार**, व **पिलाजी जाधव** स्वदस्तूर लिहून देतों कीं, **बाळाजीराव** मुख्य प्रधान यांनीं बादशाहाची नोकरी करणें कबूल केलें आहे, त्यास जर ते यापुढें चाकरी करण्यास मागें पुढें पाहतील तर, आह्मी त्यांस दोन गोष्टी सांगून तसें करूं देणार नाहीं. आणि आह्मीं सांगितलें असतांही जर **बाळाजीराव** चाकरी न करण्याचा हट्ट धरतील तर आह्मी सारे पंडित प्रधान यांची चाकरी सोडून देऊं. दाखल्याभावीं हा दस्तऐवज लिहून दिला असे." हा दस्तऐवज सन १७४३ त बादशाहाचे कारकीर्दीच्या २४ वर्षी, तारीख ७ रबिलावल रोजीं लिहून दिला[1].

अशा प्रकारें हें फार मोठें काम करून सन १७४३ त **बाळाजी बाजीराव शाहू महाराजांस** भेटण्याकरतां **सातान्यास** आला, व एकंदर वसुलाच्या जमाखर्चाचा हिशेब त्यानें **महाराजांस** दाखविला. हा हिशेब राजाचे फौजेचे आपण सेनापति या नात्यानें **पेशव्यानें महाराजांस** दाखविला. जमा, खर्च, व शिलक यांच्या सर्व यादी त्यानें **महाराजांपुढें** ठेविल्या. ह्या वेळीं सर्व सत्ता **महाराजांचे** हातांत

१ **सर जान मालकमकृत मध्यहिंदुस्थानाचा** इतिहास.

होती ही गोष्ट खरी, परंतु पुढें सातारच्या राजांस नातवानीची दशा येऊन त्यांची सत्ता अगदीं संपुष्टांत आली, व खरी खरी सत्ता पेशव्यांच्या हातांत गेली तरी पेशवे स्वामिभक्तिपराङ्मुख कधींही झाले नाहींत; ते दरवर्षी राज्याच्या वसुलाचा एकंदर हिशेब सातारच्या महाराजांस समजावून देत असत.

असो; वर सांगितलेल्या कामाकरतांच फक्त बाळाजी बाजीराव साताऱ्यास आला होता असें नाहीं, तर दुसऱ्याही कांहीं अत्यंत महत्वाच्या कामांकरतां त्या वेळीं त्याला स्वतः साताऱ्यास असण्याची जरूरी होती. बाळाजी बाजीरावानें रघूजी भोंसल्याचा बंगाल्यांत पराभव केल्यानंतर त्यानें आपला वकील पेशव्याकडे पाठविला, व त्याच्या मार्फत असें बोलणें लाविलें कीं, "आपण राजनीतीप्रमाणें जी कांहीं वर्तणूक करतां ती माझ्या व सर्व मराठे लोकांच्या फार हिताची आहे ही गोष्ट मला आतां चांगली समजूं लागली आहे, तर माझी आतां इतकीच विनंति आहे कीं, आपला व आमचा पूर्वीप्रमाणें स्नेह असावा." अशी वरवर पुष्कळ साखर पेरून आंतून साताऱ्यावर स्वारी करण्याची कडेकोट तयारी करून तो वऱ्हाडांतून निघाला होता, गुजराथेंतून दमाजी गायकवाडही साताऱ्यावर चाल करून येतच होता, शिवाय साताऱ्यास श्रीपतराव प्रतिनिधि जरी मरणोन्मुख होऊन पडला होता तरी त्याचा मुतालीक यमाजी शिवदेव हा बाळाजीचें वर्चस्व हाणून पाडण्यास टपून बसला होता. यमाजी शिवदेव मोठा हुशार असून दक्ष होता; व जरी रघूजी भोंसल्यास तो मिळाला नव्हता तरी दमाजी गायकवाडाच्या पक्षास त्याचें पुरें पाठबळ होतें. बाळाजी बाजीरावासारखा चतुर व दूरदर्शी पेशवा त्या वेळीं होता ह्मणूनच तो त्या अरिष्टांतून पार पडला. त्याला तें एकंदर कारस्थान समजून आलें, व ह्मणून त्यानें लगेच त्याच्या निरसनाचा प्रयत्न केला. आपल्याविरुद्ध उठलेल्या मराठे सरदारांपाशीं एक लढायाला तरी तयार झालें पाहिजे, किंवा बंगाल प्रांतावरचा आपला हक्क रघूजीस दिला पाहिजे, ह्या दोन गोष्टींपैकीं कोणती तरी

एक केल्याशिवाय तें अरिष्ट नाहींसें करण्याची त्याला तोडच उरली नव्हती. परंतु आपसांत बखेडे माजवून आपल्या लोकांच्या नाशास आपणच कारणीभूत व्हावें, व तसें झालें ह्मणजे बाहेरच्या दुसऱ्या शत्रूंस आपणांवर स्वारी करून आपला नाश करण्याचा मार्ग आयताच सुलभ करून द्यावा, हें **बा**ळाजीस योग्य वाटेना. तेव्हां **शाहू महा**राजांच्या मध्यस्थीनें त्यानें **र**घूजीशीं तह केला त्यांत असें ठरलें कीं, "पूर्वींच्या[1] **पे**शव्यांनीं संपादलेला **मो**काशाचा हक्क, स्वतः **बा**ळाजी **बा**जीराव, **बा**जीराव व **बा**ळाजी विश्वनाथ यांनीं जहागिरीदाखल मिळविलेला मुलूख, **कों**कण, व **मा**ळवा प्रांत यांचें आधिपत्य, **अ**लाहाबाद, **आ**ग्रा, **अ**जमीर, व **मों**गलाईतील **मं**गळवेढें यांची खंडणी, **पा**टणा प्रांतांतील तीन परगणे, **अ**र्काटच्या खंडणीपैकीं सालीना २० हजार रुपये, व याशिवाय **र**घूजीच्या अमलांतील कांहीं गांव यांचा अव्याहत उपभोग **पे**शव्यानें घ्यावा; व **र**घूजीनें **ल**खनौ, **पा**टणा, **पै**नबंगाला यांचा वसूल व खंडणी घ्यावी, शिवाय **व**ऱ्हाडपासून **क**टकपर्यंतची सर्व खंडणीही रघूजीनेंच गोळा करावी." ह्या तहामुळें **र**घूजीचा **पे**शव्याशीं विरोध राहिला नाहीं, व **द**माजी **गाय**कवाड अगदीं उघडा पडला. याप्रमाणें ज्या वादळापासून फार मोठा बखेडा होणार असें वाटत होतें तें अगदीं गडबड न होतां शांत झालें. **बा**ळाजीनें वरील तहांत आपले कांहीं हक्क **र**घूजीस दिले हें खरें; परंतु त्यांतच त्याचें राजनीतिनैपुण्य व दूरदर्शित्व चांगलें दिसून येतें. कारण त्या वेळापासून **र**घूजीची दृष्टि पूर्वेकडील प्रांतावर लागून, **पे**शव्याची सत्ता नाहींशी करावी व **सा**तारच्या गादीवर **शाहू महा**राजांच्या मागें आपण बसावें ही जी **र**घूजीची हांव ती नाहींशी[2] झाली.

वरील तहाचे वेळीं आणखी असें ठरलें कीं, **द**माजी **गा**यकवाड यानें **मा**ळव्यांतील खंडणी घेतल्याचा हिशेब **पे**शव्यास दाखवावा.

---

१ शाहू महाराजांची बखर (काव्येतिहाससंग्रह), व ग्रांटडफ.

२ एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाचा इतिहास.

दाभाड्याकडेही शाहू महाराजांचा बराच वसूल राहिला होता, परंतु ह्या वेळीं त्याची चौकशी झालेली दिसत नाहीं; तसेंच पेशवे व गायकवाड यांचा पुढें काय व्यवहार घडला त्याचाही कांहीं दाखला मराठी दप्तरांत सांपडत नाहीं; परंतु इतकी गोष्ट खरी आहे कीं, जरी त्या वेळीं दमाजीला गुजराथेंत जाणें जरूर होतें, तरी कांहीं दिवस त्याला तिकडे जातां आलें नाहीं.

हिंदुस्थानांत पेशव्याचा जो मुलूख होता त्याच्या नर्मदा, सोन व गंगा ह्या तीन नद्या ठळक मर्यादा होत्या. परंतु ह्या वेळीं बाळाजीला शाहू महाराजांकडून एक नवीन सनद मिळाली तींत, जय मिळवीत मिळवीत वरील मर्यादेच्या उत्तरेस जितकें लांब पेशव्यास जातां येईल तितकें लांब त्यानें जावें असें लिहिलें होतें[1].

मध्यंतरी कोंकणांत थोडीशी गडबड उडाली होती. बहुतेक कोंकणपट्टी मागेंच मराठ्यांचे ताब्यांत आली होती; परंतु गोवळकोट हें ठाणें हबशाचे ताब्यांत असल्यामुळें तो वारंवार शाहू महाराजांचे मुलखांत स्वाऱ्या करून गरीब रयतेस फार उपद्रव देत असे. महाराजांस हें वर्तमान समजलें तेव्हां त्यांनीं जिवाजी खंडेराव चिटणीस याच्या बरोबर सैन्य देऊन त्यास कोंकणांत रवाना केलें. नंतर तो व मानाजी आंग्रे यांनीं त्या किल्ल्यास वेढा घातला. हबशी यानें किल्ला फार दिवस लढविला, व फार निकरानें युद्ध केलें. पुढें किल्ला सर करण्यास ज्यास्त फौज पाहिजे असें चिटणिसांस वाटल्यावरून त्यानें ज्यास्त कुमक पाठविण्याविषयीं साताऱ्यास लिहिलें. ही कुमक येऊन पोहोंचतांच त्यानें हबशी याजवर हल्ला केला, व त्याचा पराभव करून किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण चढविलें. नंतर चिटणीस साताऱ्यास परत आल्यावर महाराजांनीं त्यांचा मोठा सन्मान करून त्यास कांहीं गांव इनाम दिले.

रघूजी भोंसले कर्नाटकांतून सन १७४२ त परत आला त्या वेळीं त्यानें महाराजांची आज्ञा घेऊन कर्नाटकचा सुभा बाबूजी नाईक

---

[1] ग्रांटडफ.

**बा**रामतीकर यास देवविला होता, व फक्त **त्रि**चनापल्ली व **श्री**रंगपट्टण एवढा मुलूख हुजूर ठेविला होता. त्या वेळीं वर सांगितलेल्या सुभ्या-बद्दल **ना**ईक यानें दरसाल ७ लाख रुपये द्यावे असें ठरलें होतें. **ना**ईक यास व्यवहार कांहींच माहीत नसल्यामुळें त्याच्यांत व तद्देशीय संस्थानिकांत कटकटी उत्पन्न झाल्या, व तें प्रकरण लढाईपर्यंत येऊन ठेपलें. **ना**ईक यानें आपल्या पदरीं ज्यास्त फौज वाढविली. परंतु पुढें जी लढाई झाली तींत **ना**इकांचा पराभव झाला, व तो **सा**ताऱ्यास पळून आला. त्यानें **म**हाराजांपाशीं विनंति केली कीं, "मला शिबंदी ज्यास्त ठेवावी लागल्यामुळें तिच्या खर्चाचा बोजा फार वाढला आहे; तर ह्या वेळीं महाराजांनीं कृपावंत होऊन ७ लाख रुपये मला द्यावे व माझ्यावरचा हा पेंच वारावा." ही गोष्ट ऐकून **म**हाराजांस फार राग आला. त्यांनीं **ना**इकास सांगितलें कीं, "तु-[1]ह्मांला जें काय करणें होतें तें आमचे आज्ञेनें करावयाचें होतें; संस्थानी लोक उलटले होते तर इकडे लिहिणें तुह्मांला जरूर होतें; ह्मणजे इकडून फौज रवाना करून त्यांचें पारिपत्य करतां आलें असतें. तुह्मीं कर्ज व शिबंदी कोणाचे हुकमानें वाढविली? शिवाय संस्थानी यांनीं **म**हाराजांचे सुभ्यास मोडलें हा अपलौकिक. झाली ती गोष्ट बरी झाली. आतां कर्ज कोणाचें किती व शिबंदीचा आकार हीं तावडतोब तयार करून द्यावीं. ह्मणजे दुसरा सुभेदार नेमून हा गवगवा बंद करतां येईल. ह्या हयगयीबद्दल सध्या तुह्मांस तुमचे कामावरून दूर केलें आहे." **बा**बूजी **ना**ईक यास वरील गोष्टीमुळें फार वाईट वाटून त्यानें सोमल खाल्ला. परंतु **म**हाराजांस ती गोष्ट कळतांच त्यांनीं त्याला दुधाचा उतारा देऊन त्याचा प्राण वांचविला; तथापि **क**र्नाटकचा सुभा त्यास सांगितला नाहींच. पुढें त्यांनीं **य**शवंतराव **पो**तनीस यास **क**र्नाटकच्या सुभेदारीवर नेमून तिकडील सर्व बखेडे मिटविले. हें वर्तमान सन १७४४ त झालें. **र**घूजी **भों**सले **बा**जीराव मरण पावल्यानंतर पेशवाईचीं वस्त्रें मिळावीं ह्मणून ज्याच्याविषयीं खटपट

१ एथें मूळ बखरींतील भाषा जशीची तशी घातली आहे.

करीत होता तोच हा **बाबूजी नाईक.** ज्याच्या हातून यःकश्चित् कर्नाटकच्या सुभ्याचें काम रेटलें नाहीं त्यानें मुख्य प्रधान होऊन एवढ्या थोरल्या मराठी राज्याचीं सूत्रें कशीं आवरून धरिलीं असतीं याची कल्पना सहज करतां येईल. हे नाईकसाहेब पेशवे झाले असते ह्मणजे मराठी राज्याचें लवकरच वाटोळें झालें असतें! परंतु **शाहू महाराज** कोणाचा किती वकूब व मर्दुमकी आहे हें पूर्णपणें ओळखून होते, व **बाळाजी**शिवाय दुसरा कोणीही मनुष्य एवढ्या जबाबदारीच्या कामाला लायक नाहीं असें त्यांना वाटल्यावरून त्यालाच त्यांनीं तो अधिकार दिला होता.

**रघूजी भोंसल्या**च्या मनांत **बंगाल्यां**तून आपली नष्ट झालेली सत्ता पुनः स्थापावी असें होतें. ह्मणून **बाळाजी**चा व त्याचा तह झाल्यानंतर त्यानें **भास्करपंता**बरोबर २० हजार फौज देऊन त्याला पुनः **बंगाल्यां**त पाठवून दिलें. पूर्वीं बादशाहाशीं **माळ्या**च्या संबंधानें केलेल्या शर्तींवरून ह्या वेळीं **अलिवर्दीखाना**ला **बाळाजी**नें मदत करणें जरूर होतें. परंतु **रघूजी**चा व त्याचा मध्यंतरीं दुसरा तह झाल्यामुळें त्याला बोलीप्रमाणें मदत करतां येईना; ह्मणून तो **दक्षि**णेंत स्वस्थ बसला. **भास्करपंत ओढ्या** प्रांतांतून **बंगाल्यां**त शिरला. **अलिवर्दीखाना**नेंही आपली फौज गोळा केली. परंतु आपण भ्यालों असें ढोंग करून त्यानें **भास्करपंता**शीं तहाचें बोलणें सुरू केलें, व पुढें तो व त्याचे २० मुख्य सरदार ह्यांना मेजवानीस बोलावून विश्वासघातानें त्यांचे खून केले. फक्त **रघूजी गायकवाड** नांवाचा एक सरदार मात्र जिवंत राहिला, कारण **भास्करपंता**नें त्याला छावणीच्या बंदोबस्ताकरतां मागें ठेविलें होतें. नंतर तो सरदार आपल्या सैन्यासह **वऱ्हाडां**त परत येण्यास निघाला. परंतु वाटेनें त्या देशांतील शेतकरी वगैरे लोकांनीं मराठ्यांचे पुष्कळ लोक ठार मारून टाकले.

ह्यानंतर कांहीं दिवस **रघूजी बंगाल्यां**त शिरला नाहीं; परंतु पुढें **बंगाल्यां**त जाण्याची त्याला आयतीच संधी मिळाली. **अलिव-**

र्दीखानाच्या सैन्यांत बरेच अफगाण लोक होते व त्यांच्यावर **मुस्तफा**खान ह्मणून एक त्यांपैकींच हुशार सरदार होता. ह्या लोकांवर **अ**लिवर्दीखानाचा मुख्यत्वेंकरून भरंवसा असे. परंतु कांहीं कारणावरून **अ**लिवर्दीखानाचा त्यांच्याशीं तंटा झाल्यामुळें त्यांनीं बंड केलें, तेव्हां त्याला **ओ**ढ्या प्रांतांतून पळून जावें लागलें. ही बातमी **र**घूजीस लागतांच त्यानें **ओ**ढ्या प्रांतावर स्वारी केली. त्यानें बराच मुलूख काबीज केला, व बाकीच्या मुलखाबद्दल ३० लाख रुपये द्याल तर मी **बं**गाल्यांतून परत जाईन असें तो **खा**नास ह्मणूं लागला. **खा**नाला अफगाण शिपायांचें बंड मोडावयाचें होतें ह्मणून त्यानें प्रथमतः **र**घूजीला थापा देऊन तें प्रकरण तसेंच रेंगाळत ठेविलें. परंतु बंडाची शांतता झाल्यावर त्यानें **र**घूजीस मोठ्या गर्वानें पत्र पाठविलें कीं, "तुमचें ह्मणणें आह्मांस मुळींच कबूल नाहीं." पुढें पावसाळा संपल्यावर त्या दोघांची लढाई जुंपली. प्रथमतः **क**ट्वा येथें **र**घूजीचा पराभव झाल्यामुळें कांहीं दिवस लढाई बंद पडली. ह्या वेळीं **र**घूजीला **व**ऱ्हाडांत परत यावें लागलें. कारण **गो**वळकोंड्याजवळच्या **दे**वगड नामक संस्थानचा राजा वारल्यामुळें त्याच्या मुलांत गादीविषयीं तंटे उपस्थित झाले होते. पुढें **व**ल्लीशाहा नांवाच्या त्याच्या एका मुलानें आपल्या दोन भावांस कैद करून **चां**दाच्या राजाच्या आश्रयानें गादी बळकावली. तो **र**घूजीस **चौ**थाई व **स**रदेशमुखी हे हक्क देईना, तेव्हां **र**घूजीनें त्याच्यावर स्वारी करून **दे**वगड व **चां**दा हीं दोन्ही संस्थानें घेतलीं.

मागें सांगितल्याप्रमाणें **र**घूजीनें **बं**गाल्यांत स्वारी केल्यानंतर कांहीं दिवसांनीं **बा**ळाजी **बा**जीराव **मा**ळव्यांत गेला. तेथून त्यानें दिल्लीच्या बादशाहास पत्र पाठविलें त्यांत असें लिहिलें होतें कीं, "बादशाहाला आह्मीं जें इमानवचन दिलें आहे त्यांत आमच्या कडून अंतर पडणार नाहीं. परंतु कांहीं अगत्याच्या कामांमुळें मला तूर्त तिकडे भेटीस येण्यास अवकाश नाहीं. नवाब **अ**लिवर्दीखान, **र**घूजी **भों**सले तिकडे गेले असतां कसे स्वस्थ बसले याचें फार आश्चर्य वाटतें." परंतु

बादशाहानें **बाळाजीस** उत्तरादाखल जें पत्र पाठविलें त्यांत त्यानें, **रघूजीला बंगाल्यांत** जाण्याविषयीं **बाळाजीनें** अडथळा केला नाहीं ह्मणून बराच दोष दिला. ह्या संबंधाचा पत्रव्यवहार पुढें न वाढवितां "**दक्षिणेंत** कांहीं जरूरीचें काम आहे तेव्हां मला तिकडे जाणें अवश्य आहे" असा बहाणा करून सन १७४९ त **बाळाजी दक्षिणेंत** निघून आला.

पुढच्या वर्षी ह्मणजे सन १७४६ त **बाळाजीनें** आपला चुलतभाऊ **सदाशिव चिमणाजी** ऊर्फ **भाऊसाहेब** व **महादाजीपंत पुरंदरे** याचा कारकून **सखाराम बापू**[1] यांच्याबरोबर मोठें सैन्य देऊन, **कर्नाटकांत** कांहीं देशमुखांनीं मराठ्यांचे हक्क बळकाविले होते ते परत घेण्याकरितां तिकडे त्यांस पाठवून दिलें. **भाऊसाहेब** वाटेनें मुलूख काबीज करीत व खंडण्या घेत **सावनूरपर्यंत** जाऊन पोहोंचला. तेथील नबाब प्रथमतः लढाईला उभा राहिला. त्याची व **भाऊसाहेबाची बाहादरभेंडा** एथें फार मोठी लढाई झाली, तींत नबाबाचा पराभव होऊन **भाऊसाहेबानें** तो किल्ला घेतला. नबाब तहास कबूल झाला तेव्हां त्याच्याकडे पन्नास हजारांचा मुलूख ठेवून बाकीचा सर्व मराठ्यांनीं घेतला. नंतर तिकडील सर्व व्यवस्था करून **भाऊसाहेब सातान्यास** परत आला. त्याची हुशारी व मर्दुमकी पाहून **शाहू महाराज** फार खुष झाले व **चिमणाजी आपास** जसें **बाजीरावाच्या** हाताखालीं दुय्यम नेमिलें होतें त्याप्रमाणें **भाऊसाहेबाला बाळाजीच्या** हाताखालीं त्यांनीं दुय्यम नेमिलें. **सदाशिवरावभाऊ** मोठा शूर व महत्वाकांक्षी होता, यामुळें पुढें तो फार प्रसिद्धीस आला.

सन १७४७ त **बाळाजी बाजीरावानें बुंदेलखंडच्या** राजापाशीं नवीन तह केला. पूर्वी **छत्रसाल** राजा जिवंत होता त्या वेळीं व तो

---

[1] ह्याचें नांव **सखाराम भगवंत बोकील**. प्रसिद्ध **पंतोजी गोपिनाथाचा** हा वंशज होय. ह्या **पंतोजी गोपिनाथानेंच अफजुलखानाचा** विश्वासघात करून त्याला **शिवाजीच्या** हातांत दिलें. **सखाराम भगवंत** हा **सखाराम बापू** या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध आहे.—**ग्रांटडफ**.

मेल्यावर **बा**जीरावास तिकडचा जो मुलूख मिळाला होता, त्याशिवाय ह्या नवीन तहाच्या योगानें **बा**ळाजीस १६॥ लाखांचा ज्यास्त मुलूख मिळाला, व **प**न्ना एथील हिऱ्याच्या खाणीचें निमे उत्पन्न प्रतिवर्षी **बा**ळाजीस मिळावें असें ठरलें.

नंतर सुमारें एक वर्ष **बा**ळाजीनें राज्याची अंतस्थ स्थिति सुधारण्यांत घालविलें. वरील मुदतींत त्यानें प्रत्येक खात्यांत बरेच फेरफार केले. विशेष ध्यानांत धरण्यासारखी गोष्ट ह्मटली ह्मणजे त्यानें शेतकीस मोठें उत्तेजन दिलें. त्यामुळें शेतकरी लोकांचा फार मोठा फायदा झाला. ह्या एकाच गोष्टीवरून **बा**ळाजी किती शहाणा होता हें स्पष्टपणें कळून येईल. राज्याची मुख्य संपत्ति ह्मटली ह्मणजे शेतकरी लोक होत हें तत्व **बा**ळाजीस चांगलें माहीत होतें. ज्या राज्यांत शेतकरी लोकांची हेळसांड झाली तें राज्य केव्हांनाकेव्हां तरी लयास गेलेंच पाहिजे. याचें ढळढळीत उदाहरण **औ**रंगजेबाच्या **द**क्षिणेंतील स्वारींत वाचकांपुढें आलेंच आहे.

सन १७४८ त **अ**हमदशाहा **अ**बदालीनें **हिं**दुस्थानावर पहिली स्वारी केली. त्यानें **मु**लतान व **ला**होर हे प्रांत प्रथमतः काबीज केले. नंतर तो आपल्या सैन्यासह **दि**ल्लीवर चाल करून आला. तेव्हां **म**हंमदशाहानें आपला मुलगा **अ**हमदशाहा व वजीर **क**मरुद्दीनखान यांच्याबरोबर मोठें सैन्य देऊन त्यांस **अ**बदालीवर पाठवून दिलें. उभयपक्षांची **स**रहिंद एथें सन १७४८ च्या मार्च महिन्यांत फार मोठी लढाई झाली. ह्या लढाईत मोंगलांस जय मिळाला, परंतु **क**मरुद्दीनखानास तोफेचा गोळा लागून तो ठार झाला. **अ**बदालीचा पराभव झाल्यामुळें तो आपल्या देशीं निघून गेला.

**स**रहिंदची लढाई झाल्यापासून एक महिन्याच्या आंतच **म**हंमदशाहा मरण पावला, व सन १७४८ च्या एप्रिल महिन्यांत त्याचा मुलगा **अ**हमदशाहा गादीवर बसला.[1]

**अ**हमदशाहा गादीवर आल्यावर तो आपली वजिरी **नि**जामउल्मु-

---

१ एल्फिन्स्टनकृत हिंदुस्थानाचा इतिहास.

ल्कास देऊं लागला. परंतु त्यानें सांगितलें कीं, "मी फार वृद्ध झालों आहें, याकरतां माझ्यानें तें काम आतां रेंटणार नाहीं." पुढें सन १७४८ त जून महिन्याच्या २९ व्या तारखेस निजामउल्मुल्क बऱ्हाणपूर एथें मरण पावला. त्या वेळीं त्याचें वय १०४ वर्षांचें होतें असें ह्मणतात.

निजामउल्मुल्काला एकंदर ६ मुलगे होते. तो वारला त्या वेळीं त्याचा वडील मुलगा गाजीउद्दीन हा दिल्लीस होता. तेव्हां त्याचा दुसरा मुलगा नासिरजंग ह्यानें आपल्या वडील भावाचा हक्क एकीकडे ठेवून आपण गादीवर बसला. पुढें निजामउल्मुल्काच्या मुलांत ह्या गादीविषयीं फारच तंटे माजले. परंतु त्यांचा संबंध मराठे लोकांशीं फारसा नसल्यामुळें ती हकीकत आह्मी एथें देत नाहीं.

सन १७४९ त हैदराबादच्या गादीच्या संबंधानें तंटे उपस्थित झाल्यामुळें निजामाची सर्व फौज त्या तंट्यांतच गुंतून गेली होती. अशा वेळीं बाळाजी बाजीरावाला मराठ्यांचें कल्याण करून घेण्याची चांगली संधि आली होती. परंतु त्याच वेळीं साताऱ्यासही कांहीं विशेष कारण उपस्थित झाल्यामुळें त्याला आपले सर्व बेत एकीकडे ठेवून साताऱ्यास यावें लागलें. तो प्रकार असाः—

सन १७४० त विरूबाई वारल्यामुळें शाहू महाराजांस फार दुःख झालें. कारण तिच्यावर महाराजांची फार प्रीति होती. नंतर त्यांचा तीन वर्षांचा एकुलता एक पुत्र वारल्यामुळें त्यांच्या दुःखाला पारावारच नाहींसा झाला. पुढें संतति होण्याकरतां महाराजांनीं आणखी एक लग्न केलें. ह्या राणीचें नांव गजराबाई[1] असें होतें. परंतु तिलाही मूल झालें नाहीं.

शाहू महाराजांच्या थोरल्या राणीचें नांव सकवारबाई असें होतें व धाकटीचें नांव सगुणाबाई होतें. सकवारबाई मोठी खंबीर बायको होती, व सर्व राज्याचीं सूत्रें आपल्या हातांत असावीं असें तिला वाटत असे. सगुणाबाई नेहमीं महाराजांच्या मर्जीप्रमाणें चालत

---

१ ह्या लग्नाची हकीकत फक्त शाहू महाराजांच्या बखरीखेरीज दुसऱ्या कोणत्याही इतिहासांत मिळत नाहीं.

असे यामुळें तिच्यावर त्यांची विशेष प्रीति होती. परंतु पोटीं पुत्र नसल्यामुळें ते नेहमीं उदासीन असत. मनुष्यावर संकटें येऊं लागलीं ह्मणजे मग त्यांना खळच नसतो. विरूबाईची महाराजांना कोठें विस्मृति पडत चालली आहे इतक्यांत सगुणाबाई क्षयाच्या भावनेनें आजारी पडली. दानधर्म, अनुष्ठान, औषधोपचार पुष्कळ केले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. तिच्या काळजीमुळें महाराज दिवसेंदिवस क्षीण होत चालले. पुढें तिला बरोबर घेऊन ते जेजूरीस देवीच्या दर्शनास आले. ह्या ठिकाणींही त्यांनीं दानधर्म व औषधोपचार पुष्कळ केले; परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं तें दुखणें विकोपास जाऊन सन १७४८ त सगुणाबाई कैलासवासी झाली. सगुणाबाईच्या वियोगामुळें महाराजांचें मन प्रपंचांतून अगदीं उडून गेलें व कांहीं दिवस त्यांना भ्रमही झाला होता. सकवारबाईची तापट प्रकृति त्यांना माहीत असल्यामुळें तिच्याकडून त्यांना किती सुख मिळणार हें ते जाणूनच होते. सगुणाबाईचे लोकोत्तर गुण त्यांच्यापुढें मूर्तिमंत उभे राहिल्यामुळें त्यांना दुसरें कांहीं सुचेना व दिसेना. ह्याच सुमारास मदारी ह्मणून एक जुना हत्ती होता, तो रात्रीस सुटून शनवारांतील[1] विहिरींत पडून मेला. हें वर्तमान महाराजांस कळलें तेव्हां त्यांना अतिशय वाईट वाटलें. राज्यांतील एक एक रत्न नाहींसें होत चालल्यामुळें त्यांना आतां आपला आयुर्भोग फार थोडा राहिला असें वाटूं लागलें. सगुणाबाई वारल्यानंतर महाराज सातारा आणि माहुली यांच्यामध्यें एक वाडी होती तेथें जाऊन राहिले. हिला पुढें वनवासवाडी असें नांव पडलें. ह्या वेळीं महाराजांबरोबर बाळाजी बाजीराव होता.

ह्या वेळीं बाळाजीवर फार मोठा प्रसंग आला होता. कोणत्या वेळीं त्याच्यावर काय अनर्थ गुजरेल याचा कांहीं नियम नव्हता. सातारच्या दरबारीं त्याच्या विरुद्ध बरीच मंडळी होती व त्यांचे

---

१ पुण्याप्रमाणें साताऱ्यासही निरनिराळ्या पेठांस निरनिराळ्या वारांचीं नांवें दिलेलीं आहेत.

त्याच्या विरुद्ध बेत चाललेच होते. महाराजांच्या मागें गादीवर कोण बसवावयाचा याचा निर्णय अद्याप झाला नव्हता. महाराजांची प्रकृति तर दिवसेंदिवस क्षीण होत चालली होती. त्यांचा शिकारीचा सर्व नाद सुटला, व आत्मचर्चा, पुराण, दानधर्म यांतच ते आपला सर्व काळ घालवूं लागले. त्यांच्या वयाला ६९ वर्षें होत तोंपर्यंत त्यांना दुखणें कसें तें माहीत नव्हतें. परंतु ह्या वेळीं त्यांना ताप येऊं लागला. ह्या दुखण्यांत आपला खास अंत होणार असें त्यांचें त्यांनाच वाटूं लागलें. त्यांनीं आपल्या सर्व प्रधानांस नेहमीं आपणांजवळ असण्याविषयीं आज्ञा केली. एके दिवशीं बाळाजी आदिकरून सर्व प्रधानांनीं, "पुढें राज्याची व्यवस्था कशी काय करावयाची" ह्मणून धैर्य धरून विचारलें. त्या वेळीं महाराजांनीं सांगितलें कीं, "पुत्र व्हावयाचा असता तर तसाच पुण्यवान् झाला असता, किंवा जो झाला होता तो तरी कां न वांचावा ? तेव्हां पुत्रसुख पाहण्याचें आमचे नशीबीं नाहीं असें ह्मटलें पाहिजे. दत्तपुत्र घ्यावा तर थोरली धनीन ( सकवारबाई ) राहिली ती मनस्वी; चित्तांत येईल तो मनसबा करतात. दत्तपुत्र घेऊन तुह्मां सर्वांच्या मसलतीनें राज्य करावें असें त्यांचे दैवीं नाहीं. संभाजी राजे आहेत त्यांनाही संतति नाहीं व तेही वृद्ध झाले. ते या राज्याचे धनीच आहेत, परंतु तुह्मां सर्वांस घेऊन राज्य संभाळावें अशी त्यांच्या अंगांत कर्तबगारी नाहीं. दत्तपुत्र घेतलाच पाहिजे. तेव्हां खानवटें, मुंगी, सिंगणापूर, हिंगणी ह्या सर्व ठिकाणीं बावजी[१] महाराजांचा वंशविस्तार आहे. तेव्हां त्यांपैकीं जो राजचिन्हांनीं युक्त असेल त्याला दत्तक घ्यावें असें आह्मांस वाटतें." सकवारबाईच्या मनास ती गोष्ट पटेना. तिचें असें ह्मणणें पडलें कीं, "मला वाटेल तो मी दत्तक घेईन." ह्या वेळीं ताराबाई सातारच्या किल्ल्यावर होती. तिनें शाहू महाराजांस कळविलें कीं, "बाहेरचा मुलगा पाहण्याची विशेष जरूरी मला दिसत नाहीं.

---

१ मालोजी भोंसले यांचे वडील. मालेसन ज्याला भोंसाजी असें म्हणतो तोच हा बावजी. मागें टीप १ पान १–२ पहा.

मागें माझा मुलगा **शि**वाजी वारला त्या वेळीं त्याची स्त्री **भ**वानीबाई गरोदर होती. तिला पुढें मुलगा झाला. त्याला मीं गुप्तपणें प्रथमतः **बा**जीराव **भ**गवंतराव **बा**वडेकर यांचे घरीं ठेविला होता. नंतर तो ९ वर्षांचा झाल्यावर त्याला मीं **पा**नगांवीं त्याची मावशी **द**र्याबाई **निं**बाळकर इच्या घरीं पाठवून दिलें, व तेव्हांपासून तो तिच्याच घरीं आहे. तेव्हां अस्सल वंशज जिवंत असतां बाहेरचा मुलगा दत्तक घेणें रास्त होणार नाहीं." **म**हाराजांस हें वर्तमान कळतांच त्यांनीं **य**-शवंतराव **पो**तनीस व **गो**विंदराव **चि**टणीस यांस **बा**वडेकरांकडे पाठवून पुरा शोध आणविला. नंतर त्या मुलाविषयीं खात्री झाल्यावर **म**हाराजांनीं आपल्या प्रधानमंडळास सांगितलें कीं, "अस्सल वंश असतां परका दत्तक घेऊन निभाव लागणार नाहीं. बखेडे माजतील. तेव्हां आमचे मागें त्या मुलास आणून गादीवर बसवावें व सर्वांनीं एकविचारानें राहून हें राज्य संभाळावें."[1] **स**कवारबाईला हें वर्तमान कळलें तेव्हां तिला फार राग आला, व तिनें निराळेंच राजकारण करण्याची मसलत चालविली. **ता**राबाईचा नातू राज्यावर बसला तर सर्व सत्ता **ता**राबाईच्या हातीं जाऊन आपणास तिच्या अंकित राहावें लागेल असें तिला वाटूं लागलें. तिनें एक निराळा मुलगा दत्तक घेण्याचा निश्चय केला. **ता**राबाईचा नातू **रा**जाराम[2] ह्याला आणण्याकरितां **गो**विंदराव **चि**टणीस यांच्या कारकुनास **बा**ळाजीनें ९०० स्वारांनिशीं **पा**नगांवीं पाठवून दिलें ही बातमी **स**कवारबाईस समजली तेव्हां तर तिच्या अंगाचा तिळपापड झाला! ती **पे**शव्याचा अतिशय द्वेष करूं लागली. तिला **प्र**तिनिधि **ज**गजीवनराव[3] व **य**माजी **शि**वदेव हे अनुकूल होते. तिनें आपला सर्व बेत **को**ल्हापु-

---

१ ह्या कलमांत एथपर्यंत ठिकठिकाणीं अवतरणचिन्हांत जो मजकूर आहे तो **का**व्येतिहाससंग्रहांतील **शा**हू **म**हाराजांचे चरित्रांतून घेतला आहे. २ ह्यास पुढें राज्याभिषेक झाल्यावर ह्याचें नांव **रा**मराजा असें ठेविलें. ३ **श्री**पतराव **प्र**तिनिधि सन १७४८ त वारला व तें पद त्याच्यामागें **ज**गजीवनराव यास मिळालें.

रच्या **संभाजीस** कळविला व त्याला आपल्याकडे वश करून घेतलें; तसेंच **पानगांवीं राजारामाचा** बंदोबस्त करण्याकरितां **खंडेराव** न्यायाधीश यास पाठविलें, व **साताऱ्च्या** किल्ल्यांतील शिबंदीस अनुकूल करून घेऊन त्या लोकांना **ताराबाईचा** बंदोबस्त करण्यास सांगितलें.

**महाराजांचें** दुखणें दिवसेंदिवस वाढत चाललें, व **सकवारबाई, बाळाजीच्या** तर्फेच्या मंडळीची व **महाराजांची** गांठच पडूं देईनाशी झाली. ह्या गोष्टीमुळें **महाराजांस** फार दुःख होऊं लागलें. आपल्या राज्याचें पुढें काय होईल हे विचार त्यांचे मनांत घोळूं लागले. **बाळाजी बाजीरावाशिवाय** एवढ्या राज्याला आवर घालण्याची दुसऱ्याची शक्ति नाहीं, असें **महाराजांस** वाटल्यावरून एके दिवशीं **बाळाजी** भेटीस आला तेव्हां, **गोविंदराव** चिटणीस याचे सल्यानें **महाराजांनीं बाळाजी बाजीराव** यास एक स्वदस्तूरची यादी करून दिली. त्या यादींत, "**कोल्हापूरचें** राज्य एक करूं नये. माझे पाठीमागें **राजारामास** दत्तक घेऊन राज्य चालवावें; तसेंच पूर्वींप्रमाणें सर्वांचें आहे तसें चालवून राज्याचें संरक्षण करावें." इत्यादि मजकूर लिहिला होता. त्याच वेळीं, "पूर्वींपासून ज्यांचे जे हक्क चालत आले आहेत ते जसेच्या तसे त्यांच्याकडे मी चालवीन" ह्मणून महाराजांनीं **बाळाजीकडून** लिहून घेतलें, व त्या संबंधानें त्याच्याकडून शपथही घेतली. नंतर **महाराजांनीं** वरील यादी[1] **बाळाजीच्या** स्वाधीन केली.

**शाहू महाराजांस** दुखण्यानें फारच घेरलें तेव्हां **सकवारबाई** त्यांस **साताऱ्यास** वाड्यांत घेऊन आली; व सर्व ठिकाणीं आपल्या तर्फेची मंडळी नेमून तिनें **महाराजांची** व दुसऱ्या कोणाची गांठ

१ ही यादी खुद्द **महाराजांनीं** लिहिली असें म्हणतात. ती एणेंप्रमाणें:—

"राजमान्य राजश्री प्रधान पंडित यांस आज्ञाः तुम्ही फौज धरने आज्ञा केली त्याच्या दैवीं नाहीं महाराजांस दुखने झालें नाहीं (?) बरें होत नाहीं. राज्यभार चालला पाहिजे तरी पुढें वंश बसवन कोलापुरचे न करनें चिटनिसास सर्व सांगितले तस करने वंस होईल त्याच्या आज्ञेंत चालने राजमंडळ चालवने चिटनीस स्वामीचे इसवासू त्याच्या विचारें राज्य राखने वंस होईल तो तु * * करनार् नाहीं सुदन असा."—**शाहू महाराज** यांचें चरित्र (का० सं०).

न पडे असा पक्का बंदोबस्त केला. एखादे वेळीं **बाळाजी** किंवा दुसरे कोणी सरदार **महाराजांचे** भेटीस आलेच तर तिचे कारकून नेहमीं जवळ बसलेले असल्यामुळें त्यांना **महाराजांशीं** विशेष बोलतां येत नसे. पुढें **सकवारबाईनें**, **बाळाजी बाजीराव** व **गोविंदराव चिटणीस** यांस वाड्यांत आले ह्मणजे ठार मारावें असा बेत केला होता. परंतु **पेशव्याच्या** दक्षतेमुळें तो शेवटास गेला नाहीं. **सकवारबाईचे** असे बेत चालले असतां **बाळाजीही** स्वस्थ बसला नव्हता. **गोपाळराव यादव**, **बाजीराव यादव**, **चिंतो वामन सागांवकर**, **मोरो शिवदेव थिटे**, **रुस्तुमराव बांकनीस** वगैरे मंडळीस **कोल्हापुराकडील** बंदोबस्त करावयास त्यानें सांगितलें; व **आनंदराव जाधव** हवालदार, व **जोतीबा अनंत** सुभेदार यांस सांगून **साताऱ्च्या** किल्ल्याचा बंदोबस्त करविला. ह्या सर्वांनीं मिळून **महाराजांची** आज्ञा पार पाडण्याचा निश्चय केला. **बाळाजीचे** प्रयत्न हाणून पाडण्याविषयीं **सकवारबाईचे** सारखे प्रयत्न सुरू होतेच. तिनें एके दिवशीं आपला सर्व बेत **महाराजांस** सांगितला. त्यावरून **महाराजांनीं** तिला प्रश्न केला कीं, "हें तुमचें राजकारण पार पाडून नेणारीं विश्वासू माणसें तुमच्यापाशीं कोण आहेत?" तेव्हां तिनें **प्रतिनिधि**, **यमाजी शिवदेव** आदिकरून मंडळीचीं नांवें सांगितलीं. पुढें "तुमच्याजवळ फौज कोठें आहे?" असा प्रश्न केला तेव्हां तिनें **प्रतिनिधीस** सांगून सात आठ हजार फौज गोळा केली. त्या वेळीं आपल्यामागें कांहीं तरी मोठा घोंटाळा होईल असें **महाराजांस** वाटून त्यांनीं **बाळाजीस** "फौज गोळा करण्याचा हा समय आहे" असें सांगितलें. त्यावरून त्यानें तत्काळ चौतीस हजार फौज गोळा केली, व तो फार सावधगिरीनें व दक्षतेनें राहूं लागला. **महाराजांनीं** आपल्या अंतकाळीं **रघूजी भोंसले**, **यशवंतराव दाभाडे**, **गायकवाड** वगैरे मंडळीस आपल्या भेटीस बोलाविलें होतें. **ताराबाईस** कैद करण्याकरतां **सकवारबाईनें अंताजी शिवदेव** व कांहीं लोक पाठविले; परंतु **बाळाजीनें** किल्ल्याचा बंदोबस्त अगोदरच क-

रून ठेविल्यामुळें त्या लोकांचें कांहींएक चाललें नाहीं. तिनें कोल्हापुरच्या संभाजीसही सैन्य घेऊन येण्याविषयीं लिहिलें, व तो फौज घेऊन निघालाही होता. परंतु संभाजीच्या कारभाऱ्यानें "ह्या खटल्यांत आपणास यश येणार नाहीं" असें सांगितल्यावरून त्यानें तो नाद सोडून दिला. अंतकाळ अगदीं समीप आला असें पाहून महाराजांनीं आपल्या सर्व प्रधानांस व सरदारमंडळीस जवळ बोलावून त्यांस, "राज्यास धनी पुत्र करून, सर्वांनीं आज्ञेत चालून राज्य देवब्राह्मणांचें हें एकविचारें चालवावें" असा बोध केला. पुढें थोड्याच दिवसांत ह्मणजे शके १६७१ मार्गशीर्ष वद्य ३ शुक्रवारीं ह्मणजे तारीख ९ डिसेंबर सन १७४८ रोजीं महाराज कैलासवासी झाले.

त्या वेळीं सर्व शहरांत मोठा हाहाकार उडून गेला. सर्व सरदारमंडळीचीं तोंडें सुकून गेलीं. जिकडेतिकडे रडारड एकसारखी चालली. बाळाजी बाजीरावाला जें दुःख झालें तें तर सांगतां येत नाहीं. परंतु ती वेळ दुःख करीत बसण्याची नव्हती. सकवारबाईच्या पक्षाची मंडळी या वेळीं मोठी धामधूम उडवील असें त्यास पूर्णपणें माहीत होतें. ह्मणून त्यानें आपली सर्व फौज एकदम शहरांत आणली व प्रथमतः सर्व शहराची नाकेबंदी केली. त्याचप्रमाणें जगजीवनराव प्रतिनिधि व यमाजी शिवदेव यांस अगोदर कैद करून त्यांस ताबडतोब पुरंदर व कावनई या किल्ल्यांवर अनुक्रमें मोठ्या बंदोबस्तानें पाठवून दिलें. बाळाजीनें सकवारबाईचा बाप कुवरजी शिरके यास बोलावून सांगितलें कीं, "बाईसाहेबांची मर्जी कशी आहे ? महाराजांसारखें रत्न आज हरपलें. पुढें राज्यकारभार चालविणें त्या संबंधानें मुलगा दत्तक घेऊन राज्यकारभार चालवावा, अशी महाराजांची आह्मांस आज्ञा झालीच आहे. आतां बाईसाहेब ह्याच आमचे महाराज असें आह्मी समजतों. तेव्हां आह्मां सर्वांस घेऊन राज्यकारभार चालविण्याची

१ मराठी साम्राज्याची छोटी बखर परिशिष्ट १. ग्रांटडफ कुवरजी शिरके याला सकवारबाईचा भाऊ असें म्हणतो, पण त्याला मराठी बखरींत कोठें आधार मिळत नाहीं.

मर्जी आहे किंवा सहगमन करण्याचा विचार आहे याची नीट चवकशी करावी, ह्मणजे त्याप्रमाणें व्यवस्था करावयास ठीक पडेल." कुवरजीनें सर्व वर्तमान सकवारबाईस कळविलें, तेव्हां पूर्वी आपण पेशव्याच्या विरुद्ध मसलती केल्या आहेत व तोच आतां मुख्य कारभारी होऊन ताराबाईचा नातू राजाराम यास गादीवर बसविणार व आपणास त्याच्या व ताराबाईच्या आज्ञेंत रहावें लागणार, असें मनांत येऊन तिला फार दु:ख झालें. आपण केलें काय व हें झालें काय! प्रतिनिधि व यमाजी शिवदेव यांच्यावर माझा पूर्ण इतबार, परंतु ते अगोदरच पेशव्याचे कैदी होऊन पडले आहेत. आपण त्यांच्या नादीं लागून विनाकारण फसलों. आजपर्यंत पेशव्याशीं विरुद्ध वागत आलों; बरें, विरुद्ध वागून मनाप्रमाणें कार्य तरी घडून आलें, तेंही नाहीं; मिळून दोन्हींकडून फजिती. यापुढें जिवंत राहण्यांत कांहीं शोभा नाहीं असें तिचें तिलाच वाटूं लागलें. तेव्हां तिनें सहगमन करण्याचा निश्चय केला व बाळाजीस परत निरोप पाठविला कीं, "जाली गोष्ट ती वरीच जहाली. महाराज गेले, आह्मांस रहावयाचें नाहीं. तुह्मीं सर्व महाराजांची आज्ञा जहाली असेल तसें करून राज्य करावें."

नंतर दोन पालख्या तयार करून प्रधानपंत वगैरे सरदार मंडळी वाड्यांत आली. दोन्ही पालख्यांतून सर्व राजोपचार, वस्त्रें, अलंकार, जवाहीर वगैरे घालून व त्यांत शाहू महाराजांचें शव व सकवारबाई यांस बसवून संपूर्ण मंडळी कृष्णावेण्यासंगमीं माहुली एथें आली. तेथें यथाशास्त्र सर्व विधि होऊन व मोठा दानधर्म करून सकवारबाईनें सहगमन केलें. त्यांचें उत्तरकार्य मालोजी भोंसले

१ या संबंधानें डफ साहेब असें म्हणतो कीं, "पेशव्याच्या दक्षतेमुळें आपला सर्व बेत फसला असें पाहून सकवारबाईला मोठा राग आला, तशांत आगींत तेल ओतावें त्याप्रमाणें 'आपण सहगमन करण्याचा बेत रहित करून आम्हां सर्वांस घेऊन राज्य करावें असा लुच्चेगिरीचा निरोप पाठविला, त्यामुळें तिला दुप्पट राग आला. इतकेंही करून तो स्वस्थ बसला नाहीं. त्यानें सक-

मुंगीकर यांनीं केलें. ज्या ठिकाणीं सकवारबाई सती गेली त्या

---

वारबाईचा बंधु कुवरजी शिरके यास बोलावून आणिलें व त्याला असें सांगितलें कीं, 'सकवारबाई सती गेली नाहीं तर तुमच्या शिरके कुलाला मोठा कलंक लागणार आहे, तुम्हीं हरप्रयत्न करून आपल्या भगिनीस सती घालवावी व तसें जह्याल्यास तुम्हांस कोंकणांत मोठी जहागीर देऊं. सकवारबाई सती गेली तर तुमच्या शिरके कुलाचाच काय, परंतु संपूर्ण मराठी राज्याचा बोज राहील.' अशा निंद्य कृतीनें बाळाजी बाजीरावानें सकवारबाईस सती घालविली." डफ साहेबाचा बाळाजीवरील हा आक्षेप आह्मांस बरोबर वाटत नाहीं. शिवाय मराठ्यांच्या बखरींत यास कोठेंच आधार मिळत नाहीं. सकवारबाई आपल्या खुषीनें सती गेली असावी असें आम्हांस वाटतें. कारण साधारण नेहमींच्या व्यवहारांत आपल्या समोर अशीं शेंकडों उदाहरणें येतात कीं, एखाद्यानें एखादें जबाबदारीचें कृत्य शिरावर घेतलें व तें त्याच्या हातून शेवटास गेलें नाहीं व त्यांत त्याच्या प्रतिपक्षीयांचा जय झाला तर तें हृदयशल्य त्यास सहन होत नाहीं. आपण यापुढें जगांत राहिलों तर आपली नाचक्की होणार असें त्यास वाटूं लागतें व लज्जेनें काळें झालेलें तोंड पुढें जगाला दाखवायाला तो असमर्थ असतो; व तशा स्थितींत जिवंत राहण्यापेक्षां मरण बरें असें त्यास वाटून तो आपल्या जीविताचा शेवट करून घेतो. मग हें तर बडें राजकारण. संपूर्ण मराठी राज्याचीं सूत्रें आपण खेंचावीं अशी सकवारबाईची महत्वाकांक्षा, तेवढ्याकरतां तिचे अश्रांत परिश्रम, प्रतिनिधि, यमाजी शिवदेव, गायकवाड, कोल्हापुरचे संभाजी राजे वगैरेंचें तिला पुरें पाठबळ जवळ आठ दहा हजार फौज, बाळाजी बाजीरावाचा खूनही करण्यास जी प्रवृत्त झाली होती, असें डफसाहेब स्वतः लिहितो; इतकी जय्यत तयारी व इतकीं मोठमोठीं कारस्थानें करून जेव्हां तिला जय मिळाला नाहीं तेव्हां तिला राग येणार ही गोष्ट सिद्धच आहे. शिवाय आतां पाठीमागें राहून आपली छी थू करून घ्यावी त्यापेक्षां मरणाची जी ही उत्कृष्ट संधि आली आहे ती आपण फुकट घालवूं नये असें तिला वाटलें असावें व तसें वाटणें हेंच साहजिक आहे; आणि त्याच कारणामुळें ती आपल्या खुषीनें सती गेली असावी. "सकवारबाई सती गेली तर तुमच्या शिरके कुलाचाच काय, परंतु संपूर्ण मराठी राज्याचा बोज राहील" असें बाळाजीनें कुवरजी शिरके यास सांगितलें असें डफसाहेब म्हणतो, परंतु सकवारबाई जिवंत राहिली असती तर तो बोज कोणत्या रीतीनें गेला असता याचें कांहींच कारण तो देत नाहीं. सकवारबाई सती गेली नाहीं तर शिरके कुलाला कलंक लागण्यासारखी गोष्ट सकवारबाईच्या हातून कां-

ठिकाणीं महाराजांचें पाषाणाचें लिंग व सकवारबाईची मूर्ति हीं स्थापन केलीं. आज या गोष्टीस जवळ जवळ १५० वर्षें होत आलीं व दर वर्षी कृष्णा व वेण्या या नद्यांस महापूर येऊन मोठमोठे दगड वाहून जातात, परंतु तें लिंग व ती मूर्ति हीं आज मितीस जेथल्या तेथें कायम आहेत. ह्या ठिकाणीं आमच्या प्रताप-शाली, शूर, व उदार अशा चरित्रनायकाचा वृत्तांत संपला. आतां चरित्रलेखनाच्या पद्धतीप्रमाणें त्याचा थोडासा उपसंहार लिहून आह्मी आमचे वाचकांची रजा घेऊं.

---

हींच झालेली दिसत नाहीं. आतां महत्त्वाकांक्षेच्या नादीं लागून आपण मराठी राज्य चालवावें अशाविषयीं तिनें प्रयत्न केला ही गोष्ट खरी, परंतु त्याच्या योगानें शिरके कुलाला कलंक लागण्याचें कांहीं कारण नाहीं. शाहू महाराज मोंगलांचे कैदेंतून सुटून दक्षिणेंत आले त्या वेळीं ताराबाईनें त्यांचा गादीवरचा हक्क उडविण्याचा विलक्षण प्रयत्न केला, हा तोतया आहे अशी त्यांच्याविषयीं कंडी पिकविली, परंतु शेवटीं तिला त्या कामांत यश आलें नाहीं, ह्या गोष्टीव-रून मोहिते कुलाला कलंक लागला असें देखील कोणी म्हणणार नाहीं. तेव्हां बाळाजी बाजीरावानें सकवारबाईस कुवरजी शिरके यास सांगून कलंकाचे निमित्तानें मुद्दाम सती घालविली असेल असें आह्मांस वाटत नाहीं.

## भाग १०.

## उपसंहार.

शाहू महाराजांच्या कारकीर्दीचा गोषवारा—त्यांचा स्वभाव.—त्यांचीं औदार्याचीं कृत्यें.—पेशवे आपल्याशीं किती निष्ठेनें वागतात हें पाहण्याकरितां त्यांनीं योजिलेल्या युक्त्या.—बाळाजी बाजीरावाची महाराजांचे ठायीं लीनता. —पेशव्यास महाराजांनीं दिलेली सनद.—महाराजांच्या कारकीर्दीच्या अखेरीस मराठी राज्याचा विस्तार.

शाहू महाराजांचा जन्म इ० स० १६८० च्या डिसेंबर महिन्यांत झाला, इ० स० १७०८ त ते साताऱ्च्या गादीवर बसले, व ४० वर्षें राज्योपभोग घेऊन इ० स० १७४८ च्या डिसेंबर महिन्याच्या ९ व्या तारखेस ते कैलासवासी झाले. अशा प्रकारचा भाग्यशाली राजा शिवाजी महाराजांचे मागें दुसरा कोणीही झाला नाहीं. त्यांची बाल्यदशा व तारुण्याचा निमे भाग मोंगलांच्या कैदेंत गेला ही गोष्ट खरी; परंतु त्या ठिकाणीं औरंगजेब व बेगमसाहेब यांनीं त्यांना फार ममतेनें वागविल्यामुळें त्यांचा तो काळ मोठ्या ऐषआरामांत गेला. परंतु आपण कोण, हल्लीं आहों कोठें, आपल्या पूर्वजांनीं काय काय पराक्रम केले, सांप्रत आपली स्थिति काय आहे हे विचार, जसजसे ते मोठे होत गेले तसतसे त्यांच्या मनांत येऊं लागले, व आपली परतंत्रता पाहून त्यांना तो ऐषआराम विषतुल्य वाटूं लागला. या संबंधाचा उल्लेख राजाराम वारला त्या वेळीं आह्मीं केलाच आहे.

औरंगजेबाच्या मनांत महाराजांस त्यांच्या गादीवर नेऊन स्थापावें असें होतें, परंतु त्याच्या हयातींत ती गोष्ट घडून आली नाहीं. इ० स० १७०७ त औरंगजेब मरण पावल्यावर त्याच्या मुलांत गादीविषयीं जे तंटे माजले त्या धामधुमींत महाराजांची सुटका झाली. औरंगजेबाचा जेष्ठ पुत्र बाहादुरशाहा याच्याशीं लढाई करण्याचे उद्देशानें ज्या वेळीं त्याचा भाऊ अजिमशाहा आपल्या फौजेसह नर्मदा नदी उतरून पलीकडे गेला, त्या वेळीं त्यानें, शाहू महाराज त्याचे बरोबर होते त्यांस

झुल्फिकारखान याचे सल्ल्यानें मुक्त केलें. ही जी मुक्तता केली ती अजिमशाहास महाराजांविषयीं दया उत्पन्न होऊन त्यानें केली असें मुळींच नाहीं. त्यानें ती आपल्या फायद्याकरितां केली. त्या वेळीं मराठ्यांच्या गादीवर ताराबाईचा पुत्र शिवाजी हा होता व राज्याचा सर्व कारभार ताराबाई पहात असे. मोंगलांचें लष्कर दक्षिणेंतून निघालें नाहीं तोंच मराठे मोंगलांच्या मुलखास उपद्रव देऊं लागले. तेव्हां अजिमशाहानें असें मनांत आणलें कीं, या वेळीं शाहूची मुक्तता केली तर मराठ्यांचे आपसांत तंटे लागतील, व तसें झालें ह्मणजे आपल्या मुलखाला हल्लीं ते जो त्रास देत आहेत तो त्यांना देतां येणार नाहीं. अजिमशाहाचा तो हेतु चांगलाच साधला. ताराबाईनें शाहू महाराजांस राज्य प्राप्त होऊं नये ह्मणून ज्या खटपटी व जीं कारस्थानें केलीं त्यांचें वर्णन योग्यस्थलीं आलेंच आहे. त्या वेळीं अभिमानाच्या भरीस न पडतां व आपल्या महत्त्वाकांक्षेला वेसण घालून ताराबाईनें महाराजांशीं सल्ला केला असता तर मुसलमानांच्या जुलमापासून हिंदुस्थान देश फार लौकर मोकळा होऊन जिकडेतिकडे मराठ्यांचें एकछत्री राज्य झालें असतें यांत संशय नाहीं.

शाहू महाराज जरी औरंगजेबाच्या जनानखान्यांत लहानांचे थोर झाले होते, व त्यामुळें जरी त्यांना मुसलमान लोकांप्रमाणें ऐषआरामाची चटक लागली होती, तरी त्यांच्या पूर्वजांचें क्षात्रतेज त्यांच्या अंगांत वसत होतें. ताराबाईवर त्यांनीं ज्या मोहिमा केल्या त्यांत तेच प्रमुख होते व त्या वेळीं त्यांनीं मोठ्या शौर्यानें तिच्या पक्षाचा मोड केला. परंतु लढाईचा प्रसंग न आणतां सामदानानें आपला कार्यभाग करून घेणें त्यांना जास्त आवडे; व अगदीं प्रारंभीं धनाजी जाधव यास याच युक्तीनें त्यांनीं ताराबाईच्या पक्षांतून फोडलें. धनाजी त्या वेळीं महाराजांस वश झाला नसता तर मराठी राज्यावर आपला हक्क स्थापित करणें त्यांना बरेंच जड गेलें असतें. इ० स० १७०८ त सातान्यास महाराजांना राज्याभिषेक झाल्यावर कांहीं वर्षें त्यांनीं आपल्या राज्याचा कारभार मोठ्या दक्षतेनें व सुयंत्रपणें

चालविला. परंतु या दगदगीपासून आपण केव्हां मोकळे होऊं असें त्यांस वाटूं लागलें होतें.

ते मनुष्याची पारख फार लवकर करीत असत. धनाजीचा कारकून बाळाजी विश्वनाथ याची अलौकिक बुद्धि व चातुर्य पाहून महाराज फार खुष झाले व त्यांनीं त्याला आपल्याकडे मागून घेतलें. महाराजांच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं मराठी राज्यांत बरेच बखेडे माजलेले होते. ते मोडण्याकरतां महाराजांनीं जातीनिशीं बरेच उपाय केले. परंतु त्यांपासून ह्मणण्यासारखा फायदा झाला नाहीं. पुढें त्यांनीं तें काम बाळाजी विश्वनाथास सांगितलें. त्यानें जिवापाड परिश्रम करून दमाजी थोरात, कृष्णराव खटावकर यांसारख्या पुंड व वंडखोर लोकांचें पारिपत्य केलें व कान्होजी आंग्र्यासारखे हुशार व शूर सरदार महाराजांचे पक्षास अनुकूल करून घेतले. ह्या गोष्टींमुळें तर महाराजांची त्याच्यावर इतकी मर्जी बसली कीं, सन १७१४ त बहिरोपंत पिंगळे यास कमी करून त्यांनीं बाळाजी विश्वनाथास आपला पेशवा किंवा मुख्य प्रधान नेमिलें, व राज्याचा मुख्य इतबार त्याच्यावर टाकून आपण राज्याच्या दगदगीपासून बरेच अलग राहूं लागले. बाळाजी विश्वनाथ पेशवा झाल्यानंतर त्यानें मराठ्यांची सत्ता बरीच वाढविली. त्याच्या मागें त्याचा पुत्र बाजीराव यानें तर मराठ्यांच्या कीर्तीनें सर्व हिंदुस्थान देश भरून टाकला. फार काय सांगावें? दिल्लीचा बादशाहा सुद्धां मराठ्यांस वचकून राहूं लागला! बाजीरावाच्या मागें बाळाजी बाजीरावानेंही मराठ्यांच्या सत्तेचा ज्यास्त फैलाव केला, व सर्व हिंदुस्थानभर मराठ्यांचा—विशेषतः पेशव्यांचा—सारखा दरारा बसला.

एवढी सत्ता पेशव्यांकडे आली तरी ते आपला सेवाधर्म विसरले नाहींत. एकदा महाराजांनीं, पेशवे आपल्याशीं कोणत्या रीतीनें वागतात याची परीक्षा करण्याकरतां १० हजार फौजेनिशीं बाळाजी बाजीराव यास भेटीस बोलाविलें. बाळाजी फौजेसह साताऱ्यास आल्यावर, "इतकी फौज घेऊन येण्याचें कारण काय" ह्मणून त्यास

**म**हाराजांनीं विचारणा केली. तेव्हां **बा**ळाजीनें सर्व फौज मागें ठेवून पांच खिजमतगारांसह तो **म**हाराजांचे भेटीस आला. **म**हाराजांस त्याची परीक्षाच पाहणें होतें सबब **बा**ळाजी आल्याची वर्दी मिळतांच ते शिकारीस निघून गेले. पुढें **बा**ळाजीस ती बातमी कळतांच तोही **म**हाराजांचे दर्शनास त्यांचे मागोमाग निघून गेला. चोपदारानें **बा**ळाजी आल्याची वर्दी दिली तेव्हां कांहीं वेळपर्यंत **म**हाराजांनीं त्याच्याकडे पाहिलें नाहीं. नंतर **बा**ळाजीस गोटांत जाऊन उतरण्यास सांगून **म**हाराजांची स्वारी **सा**ताऱ्यास परत आली. पुढें एके दिवशीं दरबार बरखास्त झाल्यावर **म**हाराज वाड्यांत जाऊं लागले तेव्हां त्यांनीं आपले चरणसंपुष्ट मधल्या दालनांत टाकून दिले व ते तसेच अनवाणी पुढें चालूं लागले. खिजमतगार मंडळी जवळ नव्हती तेव्हां **बा**ळाजीनें ते उचलून घेऊन **म**हाराज मागील चौकांत जात आहेत तोंच त्यांचे चरणांपाशीं ठेविले! ही त्याची नम्रता पाहून ते फार खूष झाले.

पुनः एके प्रसंगीं **बा**ळाजी **बा**जीराव सात आठ हजार फौज बरोबर घेऊन **म**हाराजांचे भेटीस **सा**ताऱ्यास आला, व परस्पर भेटी झाल्यावर डेऱ्यांत जाऊन उतरला. दुसरे दिवशीं **चि**टणीस यांस बोलावून आणून त्यांना, "तुमचें प्रधानपद दूर केलें आहे याकरतां हुजरे पाठविले आहेत त्यांचे बरोबर शिक्केकट्यार व जरीपटका हीं जामदारखान्यांत पाठवून द्यावीं" असा हुकूम लिहिण्यास **म**हाराजांनीं आज्ञा केली. नंतर एका हुजऱ्यास बोलावून तो हुकूम तावडतोब **बा**ळाजीकडे पाठवून दिला. त्या वेळीं **बा**ळाजी स्नान करीत होता. हुजऱ्यानें पत्र हातीं देतांच तें शिरसावंद्य करून व आंतील मजकूर वाचून **बा**ळाजीनें लगेच शिक्केकट्यार व जरीपटका हीं त्याचे स्वाधीन केलीं, व लहानशी राहुटी देऊन तो आपला खासगी शागीर्दपेशा बरोबर घेऊन तींत जाऊन राहिला; व त्या दिवशीं त्यानें तेथेंच जेवण केलें. नंतर **बा**ळाजीनें तेथून विनयपूर्वक **म**हाराजांस पत्र पाठविलें कीं, "आज्ञा झाली त्याच वेळीं स्वामींच्या चरणांपाशीं आलों असतों, परंतु

ह्या ठिकाणीं फौज आहे ती कोणाचे स्वाधीन करावी याची आज्ञा झाली नाहीं सबब येतां आलें नाहीं. त्याची आज्ञा झाली ह्मणजे सत्वर चरणांपाशीं निघून येतों." त्या वेळीं "सलतनत (फौजफांटा वगैरे) कारकून येतील त्यांचे स्वाधीन करावी" असें त्यास **महाराजांनीं** लिहून कळविलें. सर्व मुत्सद्दी मंडळीस **पेशव्याच्या** संबंधानें फार वाईट वाटलें. **बाळाजीच्या** हातून एवढा मोठा असा कोणता अपराध झाला हें त्यांस कळेना. **महाराजांची** मर्जी **पेशव्यावर** फारच खपा झाल्यामुळें त्याच्याविषयीं प्रत्यक्ष रदबदली करण्याचा प्रथमतः कोणासच धीर होईना. तेव्हां त्यांनीं राणीवशांतून त्यांस सांगवून तिकडून **बाळाजीचा** अपराध एकवार त्यास माफ करावा अशी **महाराजांस** प्रार्थना केली. परंतु त्यांनीं "प्रधानपद **बाळाजीकडून** काढून **पिंगळे** यांस देणें आहे" असें त्यांस सांगितलें. हें प्रकरण आतां खास विकोपास जाणार अशी जेव्हां सर्व मुत्सद्दी मंडळीची खात्री झाली, तेव्हां त्यांनीं मोठा हिय्या करून **महाराजांस** समक्ष प्रार्थना केली कीं, "**महाराजांस** जें करणें असेल तें विचारपूर्वक करावें; **बाळाजीकडून** **महाराजांनीं** पेशवेपद काढलें अशी बातमी **हिंदुस्थानांत** जाऊन पोहोंचली तर त्यापासून काय घोंटाळा होईल तो सांगतां येत नाहीं; कारण तिकडील बहुतेक सरदार व रजपूत राजे हे **बाळाजीचे** हितचिंतक आहेत; तेव्हां ते प्रसंगीं काय घोंटाळा करतील याचा कांहीं नियम नाहीं. **पेशव्याचे** हातून कांहीं अपराध झाला असल्यास तो **महाराजांनीं** पोटांत घालावा. कदाचित् **बाळाजीवर** दया करणेंच नसेल तर प्रथमतः **महाराजांनीं** **हिंदुस्थानचा** तरी नीट बंदोबस्त करावा व मग काय करणें असेल तें करावें." परंतु तिकडेही **महाराजांनीं** फारसें लक्ष दिलें नाहीं, व "आह्मांस तें पद **बाळाजीकडे** ठेवणें नाहीं" असेंच सांगितलें. **बाळाजीनें**, आठ दिवस **महाराजांकडून** कोणी कारकून वगैरे येतील ह्मणून वाट पाहिली, परंतु कोणीच आलें नाहीं; तेव्हां त्यानें **चिटणीस** यांचे मार्फत विनंति केली कीं, "आम्ही एथें एकटे आहों, चर-

णांपाशीं येण्याची आज्ञा व्हावी, किंवा दुसरी कांहीं कामगिरी सांगावी." तेव्हां चिटणीसाचे मार्फत बाळाजीस महाराजांनीं प्रश्न केला कीं, "तुह्मांकडे तुमचें पद कायम ठेवल्यास नजर काय देतां." त्यावरून बाळाजीनें सांगून पाठविलें कीं, "मी एथें एका राहुटीनिशीं वेगळा राहिलों आहें, सलतनत सरकारची सरकारांत आली. आह्मी एथेंच पायांपाशीं आहों. घर व सर्व जें काय आहे तें सरकारांत नजर आहे." नंतर एके दिवशीं हुजरे पाठवून बाळाजीस भेटीस बोलाविलें. त्या वेळीं हस्त जोडून बाळाजीनें महाराजांची प्रार्थना केली कीं, "मी सर्वस्वी अपराधी आहें. पायांपाशीं कोणती सेवा करावयाची त्याची आज्ञा व्हावी. विनंति एवढीच कीं, या चरणांचा वियोग होऊं नये." बाळाजीची अशा प्रकारची एकनिष्ठा पाहून महाराज फार खूष झाले. त्यांनीं त्याच क्षणीं शिक्केकट्यार व जरीपटका हीं त्याचे स्वाधीन केलीं, व "तुमची निष्ठा कशी आहे तें पाहण्याकरतां हें सर्व केलें, तुह्मी बाजीरावाचे पुत्र व बाळाजी विश्वनाथाचे नातू खरे. तुमची सेवा व निष्ठा पाहून बहुत संतोष झाला," असें त्याचें समाधान करून त्यांनीं त्याला बहुमानाचा पोषाग दिला व पुण्यास जाण्यास आज्ञा दिली.[१]

शाहू महाराज मोठे दानशूर होते व त्या संबंधानें त्यांचें नांव अद्यापि निघत आहे. त्यांच्या देणग्यांचा आजतागायत कांहीं लोक उपभोग घेत आहेत. याचकानें आपली इच्छा प्रकट केली व महाराजांनीं ती परिपूर्ण केली नाहीं असें कधींच झालें नाहीं. एकदां कृष्णावेण्यासंगमीं माहुलीस महाराज स्नानास गेले असतां, एका गरीब ब्राह्मणानें आपणास रुपया दोन रुपये मिळतील या आशेनें, महाराज स्नान करीत असतां कांहीं स्नानसंबंधी मंत्र ह्मटले. महाराजांनीं स्नान झाल्यानंतर त्या ब्राह्मणास, "भटजी महाराज, आपली काय इच्छा आहे?" ह्मणून प्रश्न केला. तेव्हां "मला कांहीं तरी वस्त्रदान द्यावें" अशी त्यानें विनंति केली. महाराजांनीं त्या ब्राह्मणास

१. शाहू महाराज यांचें चरित्र (का० सं०).

एक गांव देऊन संतुष्ट केलें. अशा रीतीनें अगणित याचक जन त्यांनीं संतुष्ट केले.

आपणांवर ज्याचे लेशमात्र उपकार झाले त्याचे ते उपकार महाराज कसे फेडीत असत याचा मासला खालील उदाहरणावरून चांगला दिसून येईल. महाराज एकदां मृगयेस गेले असतां एका हरणाच्या मागें लागून फार थकले. आसपास बरोबरच्या मंडळीपैकीं कोणीही दिसेना. उन्हाच्या प्रखरतेमुळें व मृगयेच्या श्रमामुळें त्यांच्यानें एक पाऊलही पुढें टाकवेना ह्मणून ते एका झाडाखालीं विश्रांतीस बसले, व क्षुधा फार लागल्यामुळें त्यांचा जीव कासावीस झाला. इतक्यांत एक बाई आपल्या नवऱ्याची न्याहारी घेऊन शेतावर चालली होती. तिला हांक मारून त्यांनीं तिच्या जवळची न्याहारी मागितली. बाईनें, हा कोणी थोर मनुष्य क्षुधेनें व्याकुळ झाला आहे असें पाहून लगेच ती त्यांना दिली. नंतर महाराजांनीं पोटभर न्याहारी केल्यावर त्या बाईला तिच्या नवऱ्यासह साताऱ्यास बोलाविलें, व तीं दोघें साताऱ्यास आल्यावर महाराजांनीं त्यांना एक गांव इनाम दिला.

महाराजांच्या देणग्यांविषयीं अशी विलक्षण गोष्ट सांगतात कीं, ते मृगयेला गेले असतां एखादा याचक आला व त्याला एखादी सनद करून देणें झालें तर ते ती झाडाच्या पानावर तेथल्या तेथें करून देत, व याचकांनीं तीं पत्रें पेशव्यांस दाखविल्यावर ते त्यांस सहीशिक्यानिशीं त्यांच्या सनदा करून देत.

महाराजांच्या संबंधानें दुसरी एक विलक्षण गोष्ट अशी आहे कीं, एकदां ते मृगया करीत असतां एका हरणाच्या मागें लागून घोर अरण्यांत शिरले. फक्त त्यांचा आवडता कुत्रा "खंड्या" मात्र त्यांच्या बरोबर होता. महाराज जातां जातां एका वाघाच्या गुहेच्या तोंडाशीं गेले. वाघानें त्यांस पाहतांच तो चवताळून गेला व आपलें शेपूट जमिनीवर जोरानें आपटून त्यानें महाराजांवर उडी घातली. महाराज बेसावध असल्यामुळें त्यांना प्रतिकाराचा कांहींएक इलाज करतां

१ शिवकाव्य, सर्ग ८.

आला नाहीं. आज आपण खास प्राणास मुकतों असें त्यांस वाटलें. इतक्यांत त्यांचा इमानी कुत्रा खंड्या यानें वाघाच्या मागें जाऊन त्याचें वृषण धरलें व त्याला ठार मारलें. त्या वेळीं त्यांचे प्राण खंड्यानें वांचविले ही गोष्ट ते कधींही विसरले नाहींत. पुढें त्यांनीं त्या कुत्र्यास पालखी करून दिली व नेहमीं त्यास ते आपणांबरोबर पालखींत हिंडवीत असत. शिवाय त्यांनीं त्या कुत्र्याच्या नांवानें एक लहानशी जहागीरही करून दिली होती. तो कुत्रा मेला त्या वेळीं त्याला माहुली एथें नेऊन पुरलें. त्याचें थडगें अद्याप तेथें आहे.

महाराज मोठे चतुर होते; तसेंच समयसूचकता हा गुण त्यांच्या ठिकाणीं विशेष वास करीत असे. एकदां जयपुरचा राजा जयसिंग यानें अश्वमेध यज्ञ करून ब्राह्मणांस अतोनात दानधर्म केला, व त्याच वेळीं त्यानें एक लाख रुपये एका आपल्या हुशार सरदाराबरोबर देऊन त्यास, महाराजांचे राज्यांत जे विद्वान् ब्राह्मण असतील त्यांस ते देण्याकरतां साताऱ्यास पाठवून दिलें. तो साताऱ्यास आल्यावर महाराजांस भेटला व "आमचे महाराज ब्राह्मणांस अशा प्रकारचा फार मोठा दानधर्म करतात, आपल्याकडेही अशाच प्रकारचा दानधर्म होतो कीं काय" असा त्यानें महाराजांस प्रश्न केला. त्यानें तो प्रश्न बुद्धिपुरःसर महाराजांकडे कमीपणा आणण्याकरतां केला होता; परंतु महाराजांनीं त्याच वेळीं त्याला असें चोख उत्तर दिलें कीं, "जयसिंगानें अश्वमेध करून ब्राह्मणांस मोठा दानधर्म केला यांत त्यानें विशेष काय केलें तें मला समजत नाहीं, मीं तर आपलें सर्व राज्य ब्राह्मणांच्या हवालीं केलें आहे!"[1]

भूतदया ह्मणजे शत्रु व मित्र यांचे ठिकाणीं सारखा भाव हा एक अलौकिक गुण महाराजांचे अंगीं होता. एकदां अशी गोष्ट झाली कीं, महाराज शिकारीस गेले आहेत असें उदाजी चव्हाण यास समजतांच त्यानें दोन मारेकरी महाराजांस ठार मारण्याकरतां पाठवून दिले. ते दोघे रानांत महाराजांची वाट पहात लपून बसले.

---

१. शिवकाव्य, सर्ग ८.

पुढें ते **महाराजांस** मारण्याचे हेतूनें बाहेर पडले त्या वेळीं असा चमत्कार झाला कीं, त्यांनीं **महाराजांस** पहातांच त्यांच्या हातचीं शस्त्रें गळून पडलीं! नंतर त्या दोघांस **महाराजांच्या** लोकांनीं पकडून त्यांजपुढें आणिलें. पण **महाराजांनीं** त्यांची पूसतपास करून कांहींएक शिक्षा न करतां सोडून दिलें!

ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून **महाराजांची** सेवा केली त्यांना त्यांना त्यांनीं सुखी केलें. प्रजेचें यथान्याय पालन केलें. धर्मसंस्थापना, तीर्थक्षेत्र, देवब्राह्मण, सत्पुरुषांचीं स्थानें, अग्राहार, पूजानैवेद्य व गांवोगांवच्या देवतांचे नंदादीप, पूजा यांच्या खर्चाबद्दलच्या नेमणुका करून दिल्या. **धावडशीचें** संस्थान त्यांनींच स्थापन केलें.

**शाहू महाराजांचें** बहुतेक आयुष्य मोठ्या सुखानें गेलें. त्यांस शेवटीं शेवटीं मात्र फार दुःख झालें. त्यांची कनिष्ठ पत्नी **सगुणाबाई** अकालीं वारल्यामुळें कांहीं दिवस त्यांना भ्रम झाला होता. त्या भ्रमांत ते उघडेबोडके फिरत असत. परंतु कांहीं दिवसांनीं तो त्यांचा भ्रम नाहींसा झाला.

**शाहू महाराज** मोठे मुत्सद्दी होते हें खरें, परंतु लहानपणापासून मुसलमानी दरबारांत राहिल्यामुळें स्वतः कोणतेंही काम अंगावर घेऊन करायाचा त्यांस मोठा कंटाळा असे. त्यांच्या अंगांत हा जो आळस भरला होता त्याचा परिणाम त्यांना कांहींच दिसून आला नाहीं. त्याचीं फळें त्यांच्या मागून **साताराच्या** गादीवर जे राजे बसले त्यांना मात्र भोगावीं लागलीं. त्यांनीं सर्व राज्याचीं सूत्रें आपल्या हातांत ठेविलीं असतीं व आपल्या अष्टप्रधानांच्या—त्यांतून विशेषतः पेशव्यांच्या—हातांत जेवढा अधिकार ठेवणें योग्य झालें असतें तेवढाच ठेविला असता, तर पुढें **साताराचे** राजे जे नामधारी होऊन बसले तसे बसले नसते. परंतु लहानपणापासून त्यांना श्रम करण्याची संवय नसल्यामुळें त्यांना ह्या संबंधानें फारसें दूषण देतां येत नाहीं. ऐषआराम भोगण्याची इच्छा व राज्याच्या दगदगीचा कंटाळा या दोन गोष्टींमुळें त्यांनीं आपल्या राज्याचा सर्व कारभार **पेशव्याच्या** हातीं दिला; व तो त्याच्या-

च हातीं दिला ह्या गोष्टींत त्यांचा फार मोठा शहाणपणा दिसून येतो. कारण हाच अधिकार त्यांनीं **प्र**तिनिधि किंवा **र**घूजी **भों**सले यांसारख्या महत्वाकांक्षी व मत्सरी पुरुषांच्या हातांत दिला असता तर मराठ्यांचे आपसांत तंटे माजून त्यांच्या राज्याला फार लवकर अपाय झाला असता. मराठ्यांची सत्ता **शाहू म**हाराजांच्या कारकीर्दींत जी पसरली व त्यांच्या पश्चात् ती जी वैभवाच्या शिखरास जाऊन पोहोंचली त्याचें सर्व श्रेय **बा**ळाजी **वि**श्वनाथ, पहिले **बा**जीराव व **बा**ळाजी **बा**जीराव यांसच दिलें पाहिजे.

**बा**ळाजी **वि**श्वनाथ व **बा**जीराव यांच्या संबंधानें आह्मांस जें काय लिहिणें होतें तें आह्मीं यथास्थलीं लिहिलेंच आहे. आतां **बा**ळाजी **बा**जीरावाच्या संबंधानें चार शब्द लिहिणें जरूर आहे.

ह्या चरित्रांत **बा**ळाजीची फक्त ९ वर्षांची कारकीर्द आली आहे. परंतु तेवढ्याच काळांत त्याच्यावर वेळोवेळीं जीं संकटें आलीं व त्यांच्या निरसनाचे त्यानें जे उपाय केले त्यांवरून पहातां त्याच्या अंगच्या अलौकिक गुणांची व त्याच्या बुद्धिमत्तेची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. तो आपल्या बापाइतका शूर नव्हता हें खरें, परंतु धिमेपणानें मुत्सद्दीपणाची अक्कल लढवून आपला कार्यभाग कसा साधून घ्यावा ह्याचा धडा त्याच्या जवळच शिकावा! व या गोष्टीच्या संबंधानें तो आपल्या बापापेक्षां कांकणभर ज्यास्तच होता असें ह्मणण्यास हरकत नाहीं. **र**घूजी **भों**सले, **द**माजी **गा**यकवाड, **दा**भाडे यांसारखे पराक्रमी वीर त्याचा उच्छेद करण्याविषयीं अव्याहत प्रयत्न करीत होते; परंतु त्या महावीरानें त्यांचें कांहींएक चालूं दिलें नाहीं. त्यानें आपल्या पुढच्या बारा वर्षांच्या कारकीर्दींत फार महत्वाचीं अशीं जीं कामें केलीं तीं सर्व तरवारीचे जोरावर केलीं नाहींत; तर मुत्सद्दीपणाची अक्कल लढवूनच केलीं.

**शाहू म**हाराजांना अंतकालीं आपलें राज्य पुढें सुरळीत कसें चालेल याविषयीं मोठी काळजी उत्पन्न झाली. पोटीं औरस संतति नसल्यामुळें व एकंदर **भों**सले-कुळांत एवढा मराठी राज्यश-

कट हांकणारा कोणीही पराक्रमी वीर नसल्यामुळें त्यांना आपल्या राज्याच्या संबंधानें पुढें काय व्यवस्था करावी याचा विचार करणें जरूर पडलें. त्यांनीं आपले अष्टप्रधान व सरदार यांपैकीं कोणाच्या तरी गळ्यांत संपूर्ण राज्याचीं सूत्रें अडकविण्याचा विचार केला, व **बा**ळाजी **बा**जीरावाइतका दुसरा शहाणा पुरुष आपल्या राज्यांत नाहीं असें पाहून त्यांनीं लगेच आपल्यामागें, **बा**ळाजीनें आपल्या राज्याचा कारभार चालवावा अशा अर्थाची त्यास सनद करून दिली. खऱ्या गुणांची पारख **म**हाराज कशी करीत असत याचें प्रत्यंतर ह्या निवडणुकीच्या प्रकारावरून चांगलें दिसून येतें. **ग्रां**टडफ, **ए**ल्फिन्स्टनप्रभृति इंग्रज इतिहासकार, "**बा**ळाजीला जी ही सनद मिळाली, ती खरोखर **शा**हूनें दिली कीं नाहीं, व तिच्यावर जी सही आहे ती **शा**हूनें आपल्या समजुतीनें केली कीं नाहीं, इत्यादि गोष्टींविषयीं अद्याप गोंधळ आहे," असें ह्मणतात. त्या ग्रंथकारांना अशी शंका येण्याचें कारण काय असावें तें आह्मांस कळत नाहीं. त्या संबंधानें आमचे विचार असे आहेत कीं, **शा**हू **म**हाराजांनीं **बा**ळाजीस जी ही सनद करून दिली ती पोक्त विचार करूनच दिली; व ती त्यालाच दिली ह्मणून फार उत्तम झालें. कारण **शा**हू **म**हाराजांना औरस संतति नसल्यामुळें, कोणाचा तरी एक मुलगा धरून आणून त्याला दत्तक घेऊन त्याच्या हातांत संपूर्ण राज्याचीं सूत्रें देणें ही गोष्ट, त्या काळीं मराठ्यांचे आपसांत जे कलह सुरू होते व एकंदर **हिं**दुस्थानची जी स्थिति होती तिच्याकडे पाहिलें तर, फार चुकीची झाली असती. **द**माजी **गा**यकवाड, **को**ल्हापुरकर **सं**भाजी राजे, **य**माजी **शि**वदेव, जगजीवनराव **प्र**तिनिधि वगैरे मंडळी **शा**हू **म**हाराजांची थोरली राणी **स**कवारबाई हिला अनुकूळ होती; व ती **बा**ळाजीस प्रतिकूळ असून तिच्या मनांतून आपण स्वतः दत्तक घेऊन राज्यकारभार चालवावा असें होतें. **बा**ळाजीची कर्तबगारी **म**हाराज जाणून होते, व त्याच्या मदतीशिवाय **स**कवारबाई आपणच राज्यकारभार चालवूं लागली तर आपल्या राज्यांत पुढें केवढा घोंटाळा

माजेल याचें स्वरूप त्यांच्या पूर्णपणें ध्यानांत आलें होतें. शिवाय एवढें मोठें मराठी राज्य चालविण्याची शक्ति सकवारबाईच्या अंगीं नाहीं हेंही ते जाणत होते. तेव्हां वर सांगितलेला घोंटाळा माजूं नये, व एकदा राज्याची जी घडी बसली होती ती बिघडूं नये ह्मणूनच त्यांनीं पेशव्यास संपूर्ण राज्याच्या अधिकाराची सनद करून दिली. दुसरी गोष्ट अशी कीं, त्या वेळीं जर महाराजांनीं बाळाजीस ती सनद करून दिली नसती, तर मराठ्यांचे त्या वेळीं आपसांत कलह माजले असते व त्यांच्या राज्यांत परकीय लोकांचें त्याच वेळीं पाऊल शिरकलें असतें; आणि बाजीरावासारख्या महापराक्रमी वीरांनीं जिवापाड परिश्रम करून जें राज्य संपादिलें होतें त्याच्या लयाचें त्याच वेळीं बीजारोपण झालें असतें. ती वेळच अशी होती कीं, मराठी राज्याची लगाम कोणा तरी खंबीर पुरुषाच्या हातांत देणें जरूर होतें. "ब्राह्मणांनीं तें पद मोठ्या धूर्तपणानें मिळविलें" असें कांहीं इंग्लिश ग्रंथकारांचें मत आहे, परंतु हें त्यांचें ह्मणणें बरोबर दिसत नाहीं. कारण बाळाजी त्या वेळीं मुख्य प्रधान होता हें खरें, परंतु त्याच्या अंगांत राज्य चालविण्याचा वकूब नाहीं असें जर शाहू महाराजांना वाटलें असतें तर त्यांनीं ती सनद बाळाजीला न देतां, त्यांना जो कोणी लायक वाटला असता अशा एखाद्या मराठ्याला किंवा परदेशस्थाला दिली असती. बाळाजी ब्राह्मण होता ह्मणून त्या ग्रंथकारांनीं तसें ह्मटलें, पण तोच मराठा किंवा परदेशस्थ असता तर तोही वरील आक्षेपास पात्र झाला असता. आतां इतकी गोष्ट कोणीही कबूल करील कीं, बाळाजी बाजीरावासारखा हुशार व दूरदर्शी पेशवा त्या वेळीं नसता किंवा तो असून त्याला शाहू महाराजांनीं ती सनद दिली नसती, तर मराठ्यांचें राज्य पुढें जें साठ सत्तर वर्षें राहिलें तेंही राहिलें नसतें.

शाहू महाराजांच्या अव्वलपासून अखेरपर्यंतच्या सर्व काळांत मराठ्यांची सत्ता सारखी वाढत चालली होती. ते सिंहासनारूढ झाले त्या वेळीं फारच थोडा मुलूख मराठ्यांच्या खास अमलाखालीं होता.

परंतु ते कैलासवासी झाले त्या वेळीं मराठ्यांची सत्ता फार मोठ्या प्रदेशावर पसरली होती. सर्व **गु**जराथ व **मा**ळवा या प्रांतांचा अधिकार मराठ्यांच्या हातांत होता. **बुं**देलखंडाचा बराच भाग त्यांना **छ**त्रसाल राजा व त्याचे पुत्र यांच्याकडून मिळाला होता. शिवाय त्यांनीं दुसरीं लहानसान बरींच **र**जपूत संस्थान जिंकून घेतलीं होतीं, व दुसरीं बरींच **र**जपूत संस्थानें मराठ्यांस खंडणी देत होतीं. **कों**कणपट्टीचा बहुतेक भाग त्यांनीं आपल्या अमलाखालीं आणला होता. **म**हाराष्ट्रांत तर त्यांची सत्ता पूर्वीपासून होतीच. **है**दराबादच्या **नि**जामानें प्रथमतः कांहीं दिवस त्यांना दाद दिली नाहीं, परंतु **बा**जीरावानें त्याचीं हाडें खिळखिळीं करून टाकलीं होतीं, यामुळें तो चौथाई व सरदेशमुखी यांचा पैसा मराठ्यांस बिनतक्रार देत असे. आपण मराठ्यांच्या विरुद्ध गेलों तर ते आपला तेव्हांच फडशा करून टाकतील असें **नि**जामउल्मुल्क चांगलें समजून होता. तो मरायाला टेंकला त्या वेळीं त्यानें **ना**सिरजंगास जो उपदेश केला त्यांत प्रथमतः तो त्याला असें सांगतो कीं, "**द**क्षिणचे सुभेदारास सर्व प्रकारें **म**हाराष्ट्रराजांशीं स्नेह राखावा हें उचित." यावरून त्याला मराठ्यांचा केवढा दरारा होता हें स्पष्टपणें दिसून येतें. **बं**गाल प्रांताचा बराच भाग मराठ्यांकडे होता व बाकीच्या प्रांतांतून त्यांना खंडणी मिळत असे. त्याचप्रमाणें सर्व **क**र्नाटकचा सुभा त्यांनीं आपल्या ताब्यांत आणला होता. अशा रीतीनें **शा**हू **म**हाराजांच्या मरणकालीं मराठ्यांची सत्ता **हिं**दुस्थानच्या बऱ्याच भागावर पसरली होती. **दि**ल्लीच्या दरबारीं मराठ्यांचें चांगलें वर्चस्व होतें. परंतु तिकडे मराठ्यांचा अंमल त्या वेळेपर्यंत बसला नव्हता. तो पुढें **रा**घोबादादा ऊर्फ **रा**घो **भ**रारी यानें बसविला. परंतु तें पाहायाला **शा**हू **म**हाराज जिवंत राहिले नाहींत ही मोठी दुःखाची गोष्ट समजली पाहिजे!

अशा रीतीनें ४१ वर्षें राज्योपभोग घेऊन आपल्या वयाच्या ६९ व्या वर्षी आमचे शूर, धीर, उदार **म**हाराज कैलासवासी झाले; व त्यांच्याबरोबरच **सा**तारच्या राजांचें वैभव नष्ट झालें; कारण त्यांच्या

मागें साताऱ्च्या गादीवर जे राजे बसले ते केवळ नामधारी असून सर्व मराठी राज्याचा कारभार पेशवे पाहत असत. असो, प्रस्तुत चरित्रावरून एक ढळढळीत गोष्ट आपल्या नजरेपुढें येते ती ही कीं, खरा जो पक्ष असतो त्याला आरंभीं जरी अनेक अपाय होत गेले तरी "सत्यमेव जयते" या न्यायानें शेवटीं त्या पक्षाचाच जय व्हावयाचा; व अशाच अर्थाचें प्रसिद्ध कवि तुकाराम यांचें एक वाक्य आहे तें लिहून आम्ही आमच्या वाचकांची रजा घेतों.

हिरा ठेवितां ऐरणीं, वांचे मारितां जो घणीं,
तोचि मोल पावे खरा, करणीचा होय चुरा.

तुकाराम.



# सूची.

## स.

ह.

